# अपराध निर्मूलनाचे इस्लामी उपाय

लेखक

**मौलाना मुहम्मद जरजीस करीमी**

भाषांतर

**सय्यद ज़ाकिर अली**

# अनुक्रमणिका

"अल्लाह, असीम कृपावंत व दयावंतच्या नावाने"

# प्रस्तावना

सध्याच्या काळात अपराधी वृत्तींनी अख्ख्या जगाला आपल्या भयानक विळख्यात जखडले आहे. प्रत्येक समाजास याची विषारी लागण लागली आहे. समाजाचा प्रत्येक वर्ग अपराधी वृत्तींच्या जीवघेण्या रोगाने ग्रस्त आहे. स्त्री, पुरुष, लहान मुलांपासून केस पिकलेल्या म्हाताऱ्यांपर्यंत सर्वांचीच अवस्था बिकट आहे. गुन्हेगारीमध्ये शिक्षित-अशिक्षित सगळेच सारखे आहेत. विकासशील आणि अतिप्रगत देशसुद्धा मागास देशांच्या रांगेत उभे आहेत. गुन्हेगार आणि कायद्याचे रक्षक दोघांचेही हात कृष्णकृत्याने बरबटले आहेत. विशेष बाब अशी की अपराधांच्या नवनवीन पद्धती विकसित होत आहेत. ज्या बाबी अपराध आणि गुन्हेगारी रोखण्यासाठी शोधल्या गेल्या, त्याच बाबींच्या आधारे नवनवीन अपराधी क्लृप्त्या वापरण्यात येत आहेत. कायदा, पोलीस, न्यायसंस्था, कौटुंबिक आणि सामाजिक व्यवस्था आणि गुन्हे-प्रतिबंधक संस्थासुद्धा परिस्थितीपुढे हतबल झाल्या आहेत. असे वाटते की समस्त मानवतेनेच गुन्हेगारीच्या या भयानक देवतेपुढे मान तुकविली आहे.

अशा या दयनीय आणि शोचनीय परिस्थितीत अपराधी आणि गुन्हेगारीची गांभीर्याने कारण मीमांसा होण्याची गरज होती, तसेच याचे मूळ शोधून नष्ट करण्याची नितांत आवश्यकता होती. मात्र सर्वकाही व्यर्थ. ही गुन्हेगारी इतक्या अमर्यादपणे फोफावण्याचे मूळ कारण काय? गुन्हेगारी रोखण्यात येणाऱ्या अपयशांचे नेमके कारण काय? गुन्हेगारी रोखण्याचे एखादे साधन अजूनही बाकी आहे काय, की भात्यातले सगळे बाण संपलेत? जर असेल तर तो रामबाण उपाय कोणता? हेच ते प्रश्न आहेत, ज्यांची उत्तरे आपण या पुस्तकात अभ्यासणार आहोत. या पुस्तकात गुन्हेगारीवर कशी मात करता येईल आणि कशा प्रकारे यशस्वी तोडगा काढता येईल, यासाठी कोणती यशस्वी उपाययोजना आखण्यात आली आहे, याविषयी समाधानाकारक चर्चा करण्यात आली आहे.

हे पुस्तक लिहून बराच काळ लोटला आणि साहजिकच त्या काळी असलेल्या गुन्हेगारीचा आलेख देण्यात आला होता. लक्षणीय बाब अशी आहे की, गुन्हेगारीचा आलेख उतरण्याऐवजी वाढलेलाच आहे. त्यामुळे समस्या आणखीनच गंभीर झाली.

मी प्रकाशन संस्थेचे अध्यक्ष माननीय जलालुद्दीन उमरी (अध्यक्ष : जमाअते इस्लामी हिंद) यांचे मन:पूर्वक आभार व्यक्त करतो की, त्यांनी हे पुस्तक तयार होत

असताना पूर्णपणे काळजी वाहिली. संस्थेचे सचिव माननीय डॉ. फ़ज़लुर्रहमान फरीदी यांचेही अगदी मन:पूर्वक आभार मानतो की, त्यांनी या पुस्तकातील बरीच प्रकरणे आपल्या 'जिंदगी नव' या मासिकातून प्रकाशित केली आणि माझे मनोबल वाढविले. याशिवाय मौलाना सुलतान अहमद इस्लाही आणि डॉ. मुनव्वर हुसैन फलाही (र) यांचेही आभार व्यक्त करतो, कारण त्यांनी या पुस्तकासंबंधी मला मोलाचे सहकार्य केले. सोबत माननीय डॉ. मुहम्मद रज़िउल इस्लाम साहेबांनाही विसरता येणार नाही. कारण त्यांनी या पुस्तकाविषयी मला यथायोग्य सल्ल्यांनी उपकृत केले. साहित्यिक भाषेचा वापर करण्यासंबंधी माननीय डॉ. ताबिश मेहदी साहेबांनी विशेष सहकार्य केल्याने त्यांचेही आभार मानणे आवश्यक आहे. त्याच प्रमाणे माता-पित्यांसाठीसुद्धा ईश्वरदरबारी प्रार्थना आहे की, हे पुस्तक लिहिण्याच्या पुण्याईत त्यांनासुद्धा ईश्वर सहभागी ठरवो.

या पुस्तकाच्या माध्यामाने जगातील गुन्हेगारी नष्ट होवो आणि मला मोक्ष मिळो, हीच ईश्वरदरबारी पाणावलेल्या डोळ्यांनी प्रार्थना करतो. (तथास्तु)

मुहम्मद जरजीस करीमी
२८ सप्टेंबर २००४

*प्रकरण पहिले*

# वर्तमानकाळात गुन्हेगारीचे स्वरुप, कारणे व परिणाम

## १) वर्तमानकाळातील गुन्हेगारीचे स्वरुप

वर्तमान काळातील गुन्हेगारीचे भीषण तांडव पाहून केवळ नागरिक, विचारवंत, पोलीस यंत्रणा व न्यायसंस्थांच्या झोपा उडाल्या, असे नव्हे तर या भयानक परीस्थितीची जाणीव स्वत: गुन्हेगारांना आणि गुन्हेगारी जगताशी धागेदारे असणाऱ्यांनासुद्धा बऱ्याच प्रमाणात आहे. गुन्हेगारीचे भरपूर चेहरे आहेत. समस्त समाजावर हिचा क्रूर विळखा पडलेला आहे. वैयक्तिक जीवनापासून सामाजिक जीवनापर्यंतची सर्वच क्षेत्रे यामुळे ढवळून निघाली आहेत. नैतिकता, अर्थकारण, राजकारण असो की युद्धभूमी असो, सर्वच ठिकाणी हिचे भयानक सावट पडलेले आहे. शिक्षित, अशिक्षित, मुले, मुली, तरुण, म्हातारे, स्त्री, पुरुष, सर्वच या गुन्हेगारीच्या कचाट्यात सापडले आहेत. एवढेच नव्हे तर शासन व शासकवर्ग तर यामध्ये सर्वांत जास्त बरबटलेले दिसते, नव्हे शासन स्वत: गुन्हेगारीच्या फोफावलेल्या विषारी जंगलास खतपाणी घालीत आहे.

काळजी वाढविणारी दुसरी विशेष बाब अशी की, गुन्हेगारी करण्याच्या नवनवीन पद्धतींचा शोध लावण्यात येत आहे. उदाहरणार्थ, व्यभिचार करणे एक लैंगिक अपराध आहे. मात्र वर्तमानकाळात हा अपराध नवीन पद्धतीने करण्यात येतो, बलात्कार, सामूहिक बलात्कार, लग्नाचे आमिष देऊन महीनोन् महिने आणि वर्षानुवर्षे करण्यात येणारा पाशवी बलात्कार, अल्पवयीन मुलींचा आणि मुलांचा क्रूर लैंगिक छळ, या स्वरुपाचे अपराध राजरोसपणे होत आहेत. मागच्या काळात एखाद्याची हत्या करून जास्तीतजास्त त्याचे शिर धडावेगळे करण्यात येत असे. मात्र आज क्रौर्याने इतके भयानक आणि उग्र स्वरुप धारण केले आहे की, खुन्याचे समाधान केवळ शिर धडावेगळे केल्याने होत नसून तो मृताच्या शवाचे तुकडे तुकडे करून त्याच्या प्रत्येक तुकड्याशी खेळून आपल्या अघोरी भावना थंड करतो. विविध प्रकारे हत्या करून मृतांचे शव आगीत जाळतो. एवढेच नव्हे तर हत्या करण्याच्या अशा विचित्र आणि विक्षिप्त पद्धती आपल्यासमोर येत आहेत की, यापूर्वी अशा प्रकारची कोणी कल्पनासुद्धा करू शकत नसे, शिवाय आजही या भयानक पद्धतीं पाहून मनाचा थरकाप उडतो. पुढील मजकुरात गुन्हेगारीची विविध स्वरुपे स्पष्ट करून ताज्या बातम्यांच्या आधारे तिची भयानकता विषद केली जात आहे.

## लैंगिक अपराध

वंशवृद्धीसाठी निसर्गाने मानवांमध्ये (आणि पशू-पक्ष्यांतसुद्धा) एक विशेष शक्ती प्रदान केली व याच शक्तीस आपण लैंगिक शक्ती असे म्हणतो. कायदा आणि नैतिकतेच्या मर्यादेत या शक्तीचा वापर करणे अपराध नसून अगदी एक पुण्यकर्म होय. मात्र नैतिकता, कायदा आणि सामाजिक नियमांना धाब्यावर बसवून लैंगिक स्वैराचार केला तर हा घोर आणि शिक्षा-पात्र अपराध आहे. वर्तमानकाळात पाश्चात्यसंस्कृतीच्या प्रभावाखाली मानवतेची लक्तरे वेशीला टांगण्यात आली, भौतिकवाद आणि चंगळवादाचे नग्न भूत नवीन पिढीच्या ऊरावर नग्न तांडव करू लागले. समस्त मानवजातीसमोर स्वैर व्यभिचाराशिवाय जगण्याचा कोणताच हेतु दिसत नाही. लाज-लज्जेच्या मर्यादा कधीच्या नष्ट झाल्या. नैतिकतांची पवित्र बंधने कधीच तुटलीत. एवढेच नव्हे तर आता कायद्यात्मक आणि वैधानिक संरक्षणसुद्धा स्वैर-व्यभिचारास मिळू लागले. स्वातंत्र्याच्या नावावर आणि आधुनिकतेच्या मस्तीत चारित्र्य आणि शीलतेची पार राखरांगोळी झाली. पिसाळलेल्या नाग-नागिणीप्रमाणे नर-नारी एकदुसऱ्यांवर तुटून पडले. खाऊ की डसू अशा स्वरूपाच्या कामवासनेस बळी पडलेली ही नवीन पिढी आपल्या जीवनाचे सार हरवून बसली. कामदेवतेसमोर शीलतेची अशी कंदूरी झाली आणि पाहता-पाहता सर्वकाही संपून गेले. नैतिकता आणि लाज-लज्जावरच वासनांध पिसाळलेल्या लांडग्यांनी सामूहिक पाशवी बलात्कार केला आणि शरीराचे लचके तोडून रक्तबंबाळ केले. अशा प्रकारे लैंगिक शक्तीचा गैरवापर अथवा लैंगिक वासनांची पूर्तता इतक्या भयानक स्वरूपात होत आहे की, आत्म्याचा तळतळाट होतो, काळीज फाटून जाते.

अमेरिकेमध्ये एका सर्व्हेच्या अहवालानुसार, मागील वर्षाच्या तुलनेत बलात्कार आणि बलात्काराच्या प्रयत्नांत साठ टक्क्यांनी वाढ झाली. गुन्हेगारीच्या आकडेवारीनुसार, १९९१ च्या वर्षभरात २६,१२,१५० फौजदारी गुन्ह्यांची नोंद झाली, यांपैकी बलात्कार आणि बलात्काराचा प्रयत्न करण्याच्या अपराधांची संख्या ही २,०७,६१० इतकी होती. या ठिकाणी ही बाब विसरता कामा नये की, अमेरिकेमध्ये दोन्ही पक्षांच्या राजीमर्जीने झालेले यौनसंबंध कायद्याने अपराध ठरत नाही, तरीही लैंगिक अपराधांत इतकी जबर वाढ झालेली आहे.

रशियाची परिस्थितीसुद्धा अगदी दुर्दैवी आणि मनाचा थरकाप उडविणारी आहे. संयुक्त राष्ट्रसंघाने प्रकाशित केलेल्या अहवालानुसार, रशियामध्ये दर सहा मिनिटांत एका स्त्रीवर बलात्कार होतो. या पीडित स्त्रियांपैकी २५ टक्के १८ वर्षांपेक्षा कमी वयाच्या कुमारिका असतात.

जगामध्ये उत्पादन विकास क्षेत्रात आपला झेंडा मिरविणाऱ्या चीनमध्ये १९९४ सालच्या अहवालानुसार, लैंगिक अपराधास्तव २,८८,००० लोकांना अटक झाली.

जगातील सर्वांत महान लोकशाही असलेला भारत देशसुद्धा याबाबतीत खूप पुढारलेला आहे. दर ४५ व्या मिनिटाला एका स्त्रीचा कामवासनेच्या या क्रूर देवतेसमोर बळी जातो. अर्थातच दर २४ तासांत ३२ महिलांवर बलात्कार होतो. हा अहवाल 'नॅशनल क्राइम रेकॉर्ड ब्यूरो'ने सादर केलेला आहे. याच अहवालानुसार, दर २६ व्या मिनिटाला एका मुली वा महिलेशी गैरवर्तन करण्यात येते, दर ५२ व्या मिनिटास एका महिलेशी जबरी संभोग करण्यात येतो. मागील चार वर्षांच्या काळात केवळ दिल्ली या राजधानीच्या शहरात ७०३ अल्पवयीन मुलींवर बलात्कार करण्यात आला. १९९४ साली देशाच्या इतर भागांत १० हजारांच्या वर महिलांवर बलात्कार करण्यात आला आणि २२ हजार स्त्रियांशी गैरवर्तन करण्यात आले.

या मजकुरावरून असा गैरसमज होता कामा नये की, केवळ इतक्याच देशांमध्ये हे अत्याचार होतात. परिस्थिती मात्र खूप गंभीर आहे. प्रत्येक देशात जवळपास हीच परिस्थिती आहे. शिवाय याचे प्रमाण कमी होण्याऐवजी वाढतच आहे. ही बाबसुद्धा खूप चिंतनीय आहे की गुन्हेगारांमध्ये विचित्र अघोरी वृत्ती आणि क्रौर्य वाढत आहे. उदाहरणार्थ, रशियामध्ये एका क्रूर माणसाने ५३ तरूण-तरुणींची केवळ यासाठी क्रूरपणे हत्या केली की तो त्यांच्याशी लैंगिक वासना भागवू शकला नाही, एवढेच नव्हे तर बिचाऱ्या मयतांच्या मृत शरीराशी गमन करून आपली लैंगिक वासना पूर्ण केली. याचप्रमाणे दिल्लीत एका क्रूर पित्याने आपल्या पोटच्या मुलीवरच बलात्कार केला आणि मग तिचे डोके पलंगाच्या पट्टीवर आपटून आपटून तिचा अत्यंत क्रूरपणे वध केला. (संदर्भ : दैनिक क़ौमी आवाज उर्दू, २४ एप्रिल १९९५) त्याचप्रमाणे एका नराधमाने, ज्याच्या तीन बायका आणि एक सोळा वर्षांची मुलगी असताना आपल्या शेजाऱ्याच्या सात वर्षीय बालिकेवर बलात्कार करून तिचा वध केला. (संदर्भ : दैनिक क़ौमी आवाज उर्दू, २ऑगस्ट १९९५) अल्पवयीन मुलींवर बलात्कार करून त्यांचा क्रूरपणे वध करण्याच्या घटनांनी आजकाल कळस गाठला. दररोज वर्तमानपत्रांत या बातम्या येतच असतात. इतक्यावरच न थांबता परिस्थिती इतकी गंभीर झाली की रक्ताचे पवित्र नातेसुद्धा बाटू लागलेले आहे. गुलगी काय आणि बहीण काय आणि जवळचे नाते असलेल्या स्त्रिया काय? सर्वच अशा नराधमांच्या वासनेच्या आगीत बळी जात आहेत. याबाबतीत

सामूहिक बलात्कार आणि अल्पवयीन मुला-मुलींमध्येसुद्धा फोफावणारा लैंगिक व्यभिचार व त्यांचे लैंगिक शोषण, हीसुद्धा खूपच चिंतेची आणि झोप उडविणारी बाब आहे. अल्पवयीन मुलांवर लिंगपिसाट नराधमांचे संकट तर आहेच शिवाय त्यांच्यातसुद्धा लैंगिक व्यभिचार फोफावत आहे. १९१० साली एकट्या दिल्लीत अर्थात पश्चिम दिल्लीत ११० अल्पवयीन मुलांनी लैंगिक अपराध केले, पैकी २४ जणांवर बलात्कार करण्याचा आरोप दाखल करण्यात आला. त्याचप्रमाणे आणखीन एकदा सात तरुणांनी मिळून एका अल्पवयीन मुलीवर कित्येक महिने बलात्कार केला.

(संदर्भ : दैनिक क़ौमी आवाज, उर्दू, २० मार्च १९९५)

आपल्या भारतात २० लाख महिला वेश्याव्यवसाय करतात. यावरून वर्तमान जगातील लैंगिक गुन्हेगारीचे स्वरुप किती भयानक आहे, याचा अंदाज येतो.

## महिलांवरील अत्याचार

स्त्रियांवर केवळ लैंगिक अत्याचारच होत नसून इतरही आणखीन भयानक स्वरुपाचे अत्याचार होतात. बळजबरी, अतिरेक, घरगुती हिंसा, मानसिक शोषण, मारझोड, हुंड्यासाठी शारीरिक आणि मानसिक छळ, क्रूर हत्या आणि पळवून नेण्याच्या तसेच त्यांना आत्महत्येस प्रेरित करण्याच्या अमानवी व अमानुष घटनांचा येथे विशेष उल्लेख करावा लागेल.

तसे पाहता स्त्रियांवरील अत्याचार जगातील प्रत्येक देशात होत आहेत, मात्र हुंड्यासाठी त्यांचा शारीरिक आणि मानसिक छळ करण्याच्या तसेच हुंड्यासाठी त्यांचा अमानुष वध करण्याच्या घटना सार्क देशांत आणि विशेषत: भारतातच सर्वांत जास्त प्रमाणात घडत आहेत. १९९८ साली ५० स्त्रियांची हुंड्यासाठी हत्या करण्यात आली. (संदर्भ : राष्ट्रीय सहारा, न्यु दिल्ली, १६ जून २०००) एका अहवालानुसार, भारतात दरवर्षी एक कोटी ५० लाख मुलींचा जन्म होतो, पैकी ५० लाख मुली पंधरा वर्षांच्या वयातच ठार करण्यात येतात. या मृत्यूदरात एकतृतियांश इतक्या मुलींचा मृत्यू वयाच्या पहिल्याच वर्षी होतो आणि याचे कारण मुलींशी भेदभावाची मानसिकता होय.

(संदर्भ : राष्ट्रीय सहारा, न्यु दिल्ली, ७ ऑगस्ट १९९५)

आणखीन एक मनाचा थरकाप उडविणारी वास्तविकता आहे आणि ती म्हणजे भ्रूणहत्या. १९८४ साली देशात ४० हजार भ्रूणहत्या करण्यात आल्या. केवळ यासाठीच की जन्म घेणारे मूल ही मुलगी आहे.

(संदर्भ : राष्ट्रीय सहारा, २४ जुलै १९९५ आणि १३ मार्च १९९५)

सासरवास तर जणू देशाची क्रूर परंपराच आहे, मात्र या आधुनिक काळातसुद्धा या परंपरेस कोणताही तडा गेला नाही. स्त्रीला घराची लक्ष्मी समजणाऱ्या भारतीय संस्कृतीत मात्र स्त्रीची अशी दयनीय अवस्था निश्चितच काळीज फाडणारी आहे, शिवाय जगातील इतर देशांपेक्षा सर्वांत जास्त भारतातच ही पाचवीला पुजलेली साडेसाती आहे. सासरघरी होणाऱ्या छळाचे प्रमाण १९९४ साली ३० हजार एवढे होते. शिवाय १९९३ साली हे प्रमाण एका हजाराने कमी होते. १९९४ साली त्यात एका हजाराची लक्षणीय वाढ झाली. १९९२ साली ११ हजारापेक्षा जास्त स्त्रियांना पळवून नेण्यात आले होते तर १९९३ मध्ये हीच संख्या १२ हजाराच्या वर गेली.

(संदर्भ : राष्ट्रीय सहारा, ६ ऑगस्ट १९९५)

'एमनेस्टी इंटरनॅशनल'च्या अहवालानुसार असे जाहीर करण्यात आले की, जगाच्या पाठीवरील कोणत्याही देशांत स्त्रियांची कदर करण्यात येत नाही. सर्वच समाज आणि सर्वच वंशातील स्त्रियांचे मानव-अधिकार अत्यंत अमानुष आणि क्रूरपणे पायाखाली चिरडण्यात येत आहेत. १३५ पानांच्या या अहवालामध्ये हे स्पष्ट करण्यात आले आहे की, पूर्ण जगामध्ये स्त्रियांचा वध करण्यात येत आहे, त्यांच्या शरीराचे लचके तोडण्यात येत आहेत, त्यांचे क्रूरपणे लैंगिक शोषण होत आहे, त्यांचा अमानुष छळ करण्यात येत आहे, त्यांच्यावर लैंगिक अत्याचार होत आहेत. या अहवालात बोस्निया, रवांडा आणि मॅक्सिकोचे संदर्भ देऊन स्पष्ट करण्यात आले आहे की, अगदी सामान्य प्रकरणातसुद्धा अन्याय व अत्याचारांची सर्वांत जास्त झळ स्त्रियांनाच पोहोचते. विशेष आणि मोठ्या प्रकरणांची तर कल्पना न केलेलीच बरी. मात्र दुर्दैवाची बाब अशी की, जगातील प्रत्येक शासन स्त्रियांवरील अत्याचारांसमोर हतबल झालेले अगर गुपचूपपणे तमाशा पाहताना दिसत आहे. (संदर्भ : राष्ट्रीय सहारा, ७ मार्च १९९५)

## मुलांवरील अत्याचार

'मुले म्हणजे देवाघरची फुले!' असे आपण म्हणतो, ऐकतो. असो! मात्र अत्याचारांनी अंतिम कळस गाठलेला दिसतो. लहान-लहान आणि कोवळी मुलेसुद्धा या अमानुष अत्याचारांना बळी पडली. अल्पवयीन मुला-मुलींवर भयानक प्रकारचे लैंगिक अत्याचार होत असल्याचे आताच आपण पाहिले. संयुक्त राष्ट्रसंघाच्या एका अहवालानुसार, जगातील अत्यंत प्रगत आणि न्याय, स्वातंत्र्याच्या गप्पा मारणाऱ्या खुद्द अमेरिकेत तीन लाख अल्पवयीन मुली वेश्या व्यवसाय करीत आहेत. या अल्पवयीन मुलींपैकी बऱ्याच मुली अगदी १५ वर्षांपेक्षा कमी वयाच्या आहेत. आशियामध्ये तब्बल

दहा लाख मुली वेश्या व्यवसाय करतात. याविषयी आणखीन जास्त चिंतनीय बाब अशी की, सामान्यत: त्या आपल्या जवळच्या नातेवाईकांच्या वासनांना बळी पडतात. शिवाय बलात्काराच्या घटनासुद्धा अल्पवयीन मुलींबरोबरच जास्त प्रमाणात घडतात आणि त्यातल्या त्यात अतिअल्पवयीन मुलीच याला जास्त बळी पडतात. तुम्ही धैर्य कराल तर आणखीन एक दुर्दैवी अवस्था सांगावीशी वाटते की, काही महिन्यांच्या मुलींचासुद्धा नराधमांनी बलात्कार केल्याच्या बऱ्याच घटना घडत असतात. शिवाय मागील पानांत आपण भ्रूणहत्येचे विदारक चित्र पाहिलेच आहे. स्त्रीशी भेदभावाची मानसिकता फोफावल्यामुळे आपल्या भारतात दर सहापैकी एक मुलगी केवळ याकरिताच ठार करण्यात येते की ती मुलगा नसून मुलगी आहे.

(संदर्भ : राष्ट्रीय सहारा, २२ फेब्रूवारी, ७ एप्रिल, २५ मे, २४ जुलै, १ ऑगस्ट १९९५)

अमेरिकेच्या एका मानवाधिकार संस्थेने स्पष्टपणे आपल्या अहवालात लिहिले की, ब्राझिलमध्ये पाच लाखांपेक्षाही जास्त मुले देहविक्री करीत आहेत. या अहवालात दावा करण्यात आला आहे की, मुलांच्या लैंगिक शोषणासंबंधी कोणत्याही तपासकार्यात अडथळा निर्माण करणाऱ्या रॅकेटमध्ये दलाल, पोलिस, स्थानिक अधिकारी गुंतलेले आहेत. हे रॅकेट मुलांच्या लैंगिक शोषणाचे तपासकार्य होऊ देत नाहीत. याशिवाय मुलांवरील अत्याचार आणि हिंसा व शोषणामध्येसुद्धा लक्षणीय वाढ झालेली आहे.

(संदर्भ : राष्ट्रीय सहारा, १६ मार्च १९९५)

पाकिस्तानामध्ये साठ लाखापेक्षा जास्त मुले सतरंज्या, चादरी आणि कपड्यांच्या कारखान्यात अक्षरश: गुलामासारखे राब-राब राबत आहेत. शिवाय विटभट्ट्या, कपड्यावरील रंगकाम, लोहारकाम, चामडी रंगविण्याचे काम, बेकरी, हॉटेल्स आणि गवंड्याचे काम मुलांकडून करून घेण्यात येत आहे. (संदर्भ : राष्ट्रीय सहारा, १९ एप्रिल १९९५) (सविस्तर अभ्यासासाठी 'बालमजूरी आणि इस्लाम' ही छोटीशी पुस्तिका आवश्य वाचावी) आपल्या भारताची अवस्थासुद्धा काही कमी दयनीय नाही. मूल हे फूल आहे, असा जयघोष करणाऱ्या आणि मुलांच्या अधिकारांचे रक्षण करण्याच्या गप्पा मारणाऱ्या आपल्या भारतातसुद्धा प्रत्येक तीन मजुरांपैकी एक मजूर हे 'मूल' आहे. यापैकी ७० टक्के मुले केवळ १०० रुपये महिन्याला मिळण्याच्या आशेने काम करतात, तसेच तीन टक्के मुलांना केवळ १५० रुपये महिन्याकाठी मिळतात. खाजगी क्षेत्रात (प्रायव्हेट सेक्टरमध्ये) काम करणाऱ्या दहा कोटी मुलांपैकी २० लाखांपेक्षा जास्त मुलांना अत्यंत अवजड आणि खडतर काम करावे लागते. (संदर्भ : राष्ट्रीय सहारा, १९ मे १९९५)

कामाच्या वेळेस त्यांना मारझोड करण्यात येते आणि बऱ्याच वेळा त्यांचे लैंगिक शोषणसुद्धा होते. वेठबिगारीची परिस्थिती तर आणखीनच बिकट आणि जीवघेणी आहे.

(संदर्भ : राष्ट्रीय सहारा, ८ मार्च १९९३)

मुलांना पळवून नेणे, त्यांची खरेदी-विक्री करणे, ओलीस ठेवून त्यांच्या पालकांकडून खंडणी वसूल करणे वगैरेसारखे सर्रास अपराध करून अमाप पैसा मिळविण्याचे कारस्थान चालू आहे. परिस्थिती इतकी दयनीय झाली आहे की मुलांच्या भविष्याचे काय होईल, हा प्रश्न आज आ वासून उभा आहे.

## दहशतवाद वा आक्रमकता

अर्थातच खून करणे, हिंसा भडकावणे, आतंक माजविणे, वंश नष्ट करणे, युद्ध व तंटे उभे करणे वगैरेसारख्या सर्वच बाबींना दहशतवाद अगर आक्रमकता म्हणावे लागेल. वर्तमानकाळात या अपराधाने समस्त देशाला आपल्या क्रूर आणि निष्ठूर विळख्यात घेरले आहे. वैयक्तिक हत्या आणि खून करण्यापासून सामुदायिक हत्या व हिंसानी कळस गाठला आहे. आज कोणाचेही प्राण सुरक्षित आहे, असे म्हणता येणार नाही. पाण्यासारखे रक्त वहात आहे. मानवी प्राणाची काहीच किंमत राहिली नाही. केवळ शत्रूच नव्हे तर रक्ताच्या नात्याचे लोकसुद्धा जिवाचे वैरी झालेत. बाप मुलाचा वैरी, मुलगा बापाचा वैरी, भाऊ भावाचा, बायको नवऱ्याची आणि नवरा बायकोचा वैरी झाला.

जगाच्या प्रत्येक कानाकोपऱ्यात हाहाकार माजला आहे. या साडेसातीमध्ये आज प्रगत समजले जाणारे देश इतर देशांपेक्षा दोन पावले पुढेच आहेत. अमेरिकेत १९९१ मध्ये २६,१२,१५० फौजदारी अपराध घडले आहेत आणि या गुन्ह्यांत सतत वाढच होत आहे. एका सर्व्हेच्या अहवालानुसार, मागील दहा वर्षांच्या काळामध्ये हिंसात्मक अपराधांमध्ये ६५ टक्के वाढ झाली आहे आणि आश्चर्याची बाब अशी आहे की, बऱ्याच वेळा हे अपराध नवीन पिढीच्या हातून घडत असतात व यातही दिवसेंदिवस वाढच होत आहे. कारण आता मात्र तेथे चार कोटी मुले तारुण्याच्या उंबरठ्यावर पाऊल ठेवत आहेत.

(संदर्भ : राष्ट्रीय सहारा, २१ फेब्रूवारी १९९५)

अहिंसा, शांती वगैरेचे पोवाडे आपल्या देशातसुद्धा खूप गाण्यात येत असतात. मात्र या देशात दर १५ मिनिटांनी एक हत्या होत असते. (संदर्भ : तहजीबुल अखलाक़, अलीगढ, डिसेंबर १९९२ चे संपादकीय) १९९१ पूर्वी अडीच वर्षांत पंजाबमध्ये ७६०० लोकांची हत्या करण्यात आली. जम्मू-काश्मीरमध्ये १९९१ ते १९९७ पर्यंत

२० हजार लोकांची हत्या करण्यात आली तसेच १५०० लोकांना पळवून नेण्यात आले. इतर भागात झालेल्या खुनांची आकडेवारी आमच्याकडे उपलब्ध नाही. मात्र परिस्थितीचे गांभीर्य लक्षात येण्याकरिता एवढी माहिती पुरेशी आहे. देशातील जातीय दंगलीमध्ये हजारो निरपराधांचा बळी जातो. जुलै १९९१ पूर्वी अडीच वर्षांच्या काळात दोन हजारांपेक्षा जास्त लोक ठार झाले. (संदर्भ : कौमी आवाज, १८ जुलै १९९१, २४ ऑगस्ट १९९५) मागील शतकात दोन्ही महायुद्धांत आणि त्यानंतर झालेल्या इतर युद्धांत झालेला रक्तपात सर्वांनाच माहीत आहे. उदाहरणार्थ, दोन्ही महायुद्धांत मिळून कमीतकमी आठ कोटी लोक ठार झाले. (संदर्भ : लेनिनची कथा, सोव्हिएत यूनियन प्रकाशन संस्था) याचप्रमाणे रवांडा येथील नरसंहार, इराक व ईराणचे युद्ध. यामध्ये लाखो लोकांचा हकनाक बळी गेला. हे सर्व दहशतवादी अपराध होय. वैयक्तिक हत्यांच्या प्रकरणांत तर क्रौर्याने इतके गंभीर स्वरुप धारण केले की, अगदी कल्पनेनेच मनाचा थरकाप उडतो. एकाच हत्या-प्रकरणात एका माथेफिरूने एकास गोळी घालून त्याचे मृत शरीर तंदूरमध्ये (सविस्तर अहवाल पाहावा १९९५) याचप्रमाणे एका नराधमाने आपल्या मुलीची हत्या पलंगाच्या पट्टीवर डोके आपटून-आपटून केली. (क़ौमी आवाज, उर्दू, २४ जुलै १९९५) एका स्त्रीने आपल्या पाच मुलांची हत्या केली. (संदर्भ : क़ौमी आवाज, उर्दू, १४ सप्टेंबर १९९५) आणखीन एका क्रूर स्त्रीने एका तीन वर्षीय मुलाची हत्या करून त्याची छाती आणि पोट फाडून त्याचे यकृत आणि हृदय काढले. (संदर्भ : क़ौमी आवाज, उर्दू, १६ मार्च, १९९५) याचप्रमाणे आणखीन एका मातेने आपली तिन्ही मुले तिसऱ्या मजल्यावरून फेकून ठार केली. (संदर्भ : क़ौमी आवाज, उर्दू, २ जुलै १९९५) अशा घटना आजही सर्रासपणे सुरुच आहेत. दररोज नवनवीन स्वरूपाच्या या भयानक घटना वर्तमानपत्र, दूरदर्शन व इतर प्रसारेमाध्यमांतून पाहायला मिळतात.

## आर्थिक अपराध

हत्या करणे, प्राणांचा बळी घेणे, या अपराधानंतर आर्थिक शोषण करण्याच्या घोर अपराधाचा उल्लेख करावा लागेल. आजच्या आधुनिक काळात संपत्ती आणि पैसा अडका इतका महत्त्वाचा झाला की, याच्यासमोर कशाचीही किंमत राहिली नाही. पैशासाठी वाटेल ते करण्याची आज लोकांची मानसिकता बनली आहे. व्यक्तिगत जीवनापासून ते राज्य आणि देशपातळीपर्यंत संरक्षणाची भिस्त ही आर्थिक स्थैर्यावर आहे. म्हणूनच जगातील मोठमोठ्या क्रांती पैशांसाठीच घडल्या आणि मोठमोठ्या शासकांचे धाबे दणाणले, नव्हे सत्ताधाऱ्यांची सत्ता पालट झाली. आजही पैशांच्याच बळावर सरकार

बनते आणि पडते. प्रत्येक देशाचा संबंध आर्थिक स्तरावर एकदुसऱ्यांशी अशा प्रकारे जुळलेला आहे की, आज हे संबंध तोडणे अशक्य होऊन बसले आहे.

दुसरीकडे संपत्तीच्या या असामान्य महत्त्वामुळे असंख्य लोकांचे अतोनात शोषण होत आहे. लोकांना आणि विशेषतः मजुरांना गुलामीच्या बेड्यांत जखडण्यात येत आहे. या मजुरांमध्ये केवळ पुरुषच नसून स्त्रिया आणि मुलांचादेखील समावेश आहे. राजकारण करण्यासाठी दुष्काळसदृश परिस्थिती निर्माण करणे, जीवनावश्यक वस्तुंचा कृत्रिम तुटवडा करून त्यांच्या किंमतीत भरमसाठ वाढ करून साऱ्या जनतेला वेठीस धरणे, हेसुद्धा आर्थिक अपराधांमध्येच मोडते. संयुक्त राष्ट्र संघाच्या मजूर-संघटनेच्या एका अहवालानुसार, संपूर्ण जगात जे लोक मजुरी करीत आहेत, त्यांना खूपच अल्पशा मजुरीवर ठराविक वेळेपेक्षा जास्त काळ आणि शारीरिक क्षमतेपेक्षा जास्त कष्टाचे काम करावे लागते, असे आढळून आले. (संदर्भ : क़ौमी आवाज, २४ जून १९९५)

भारत, पाकिस्तान आणि याव्यतिरिक्त थायलंड, सुदान, हैती, पॅरो, ब्राझिल, मॉर्टिनियासारख्या देशांतसुद्धा वेठबिगारीची गंभीर समस्या भेडसावत आहे. जागतिक कष्टाच्या संस्थेचा अहवालसुद्धा चिंतित करणारा आहे. त्यात म्हटले गेले की, अगदी सहा वर्षे वयाच्या मुलांनासुद्धा मजुरीवर जुंपण्यात येत असून तब्बल १७-१७ आणि १८-१८ तास त्यांना राब-राब राबविण्यात येते व परिणामी त्यांना शिक्षण घेणे शक्य होत नाही. एवढेच नव्हे तर या कोवळ्या जिवाना मारझोड़ करणे, त्यांची खरेदी-विक्री करणे, पळून जाण्याचा प्रयत्न केल्यास त्यांना शारीरिक पीडा देण्याचे प्रकार सर्रासपणे चालतात. त्यांचे मालक त्यांचे लैंगिक शोषणसुद्धा करतात. नंतर त्यांना वेश्यालयांवर विकण्यात येते. (संदर्भ : क़ौमी आवाज, ८ मार्च १९९३)

संयुक्त राष्ट्र संघाच्या एका अहवालात म्हटले आहे की, चीनमध्ये पुरुषांना दहा तास काम करावे लागते, मात्र स्त्रियांच्या दररोजच्या कामाची मुदत ही १२ तास आहे, शिवाय याहीपेक्षा मोठे दुर्दैव असे की, त्यांच्या कष्टाचा त्यांना योग्य मोबदलासुद्धा मिळत नाही. (संदर्भ : क़ौमी आवाज, २५ जुन १९९५) स्त्रियांबरोबर अन्याय केवळ चीनमध्येच होतो असे नसून साऱ्या जगात अन्यायाने परिसीमा गाठली आहे. स्त्री ही प्रत्येक आर्थिक क्षेत्रात असून जगात तीन परिवारांपैकी एका परिवाराचा खाजगी खर्च हा स्त्रीच चालविते. तसेच अन्न उत्पादन क्षेत्रातसुद्धा त्यांचा मोलाचा वाटा आहे. त्याच स्वयंपाक करतात आणि जेवायला वाढतात. शिवाय घरातील बऱ्याच स्त्रिया सर्वांच्या नंतर जेवतात आणि मिळेल तेवढेच खातात. ती सुरुवातीस आपल्या पती आणि मुलां-बाळांना जेऊ घालते आणि मग नंतरच उरले-सुरले अन्न स्वतः खाते. असा प्रकार बऱ्याच ठिकाणी पाहायला मिळतो. (संदर्भ : क़ौमी आवाज, ९ सप्टेंबर १९९५)

जीवनावश्यक वस्तुंच्या किंमती भरमसाठ वाढवून वारेमाप पैसा कमाविण्याच्या लालसेने पिसाळून वस्तुंचा कृत्रिम तुटवडा करणे किंवा रसद गोठवून टाकणे हासुद्धा एक घोर आर्थिक अपराध आहे. १९३१ ते १९३४ च्या काळामध्ये ब्राझिलमध्ये तब्बल पाच कोटी ६० लाख मन एवढी कॉफी याच अपराधास्तव नष्ट करण्यात आली. त्याचप्रमाणे जपानमध्ये १९३२ साली सात लाख २० हजार मोती केवळ यासाठी जाळून टाकण्यात आले की, रसद महाग होत असल्याने यांच्या किंमतीत घट होत होती. एवढ्या मोठ्या संख्येत मोती भस्म केल्यामुळे रसदीच्या किंमती अचानक ३० टक्क्यांनी वाढल्या. (संदर्भ : इस्लाम का नज़रिए मिल्कियत - उर्दू, लेखक : डॉ. नजातुल्लाह सिद्दीकी, पृष्ठ २१४) अमेरिकेमध्ये तीन कोटी लोक आजही योग्य प्रमाणात अन्न मिळत नसल्याने हलाखीचे जीवन जगत असतानासुद्धा दररोज ४३ बीलियन किलो अन्न नष्ट करण्यात येते. (संदर्भ : टाइम्स ऑफ इंडिया, ०४ जुलै १९९७)

## सामाजिक अपराध

अपराधाचा एक प्रकार तो आहे, ज्याचा कुप्रभाव लप्रत्यक्ष समाजावर पडतो. उदाहरणार्थ, स्पृश्यास्पृष्यता, लाच-लुचपत, हुंडा घेणे वे देणे, आत्महत्या, चोरी, अपहरण, इतरांची संपत्ती हडपणे वगैरे. हे सर्व सामाजिक अपराधच होत. या १५ वर्षांच्या काळात यासारख्या अपराधांमध्ये दहा पटीने वाढ झाली आहे. १९८३ साली हुंड्यासाठी नववधूंना जाळून ठार करण्याची केवळ ४२८ प्रकरणे होती. मात्र १९९८ साली हुंडाबळींची संख्या ६९१७ वर पोचली.

(संदर्भ : दैनिक राष्ट्रीय-सहारा-दिल्ली, १६ जून २०००)

देशात वार्षिकरित्या ८० हजार कोटी रुपयांचा लाच-लुचपत भ्रष्टाचार आणि काळ्या पैशांची उलाढाल होते. (संदर्भ : राष्ट्रीय सहारा - दिल्ली १६ जून २०००) दरवर्षी ८० हजार लोक आत्महत्या करतात. (संदर्भ : राष्ट्रीय सहारा - दिल्ली २२ जुलै १९९१) दर दीड मिनिटाला एक चोरी, दर मिनिटाला एक वाटमारी, दर चौदा मिनिटांना एक दरोडा पडतो. (संदर्भ : दैनिक राष्ट्रीय सहारा, दिल्ली, २ नोव्हेंबर १९९०) त्याचप्रमाणे अपहरण आणि स्मगलिंग (काळा धंदा) धूमधडाक्यात चालू आहे.

भारतातील सरकारी बँकांमध्ये धोकेबाजीच्या आरोपांमध्ये या चार वर्षांच्या काळात ११४९ कर्मचाऱ्यांना नोकरीवरून काढून टाकण्यात आले. याव्यतिरिक्त ३४७५ लोकांनाही लहानसहान शिक्षा आणि दंड देण्यात आले. (संदर्भ : तेहज़ीबुल अखलाक, डिसेंबर १९९२) त्याचप्रमाणे इतरांची संपत्ती अवैधरित्या बळकावून

पचविणे करणे वगैरेसारखे अपराध शिगेला पोचले आहेत. उदाहरणार्थ, १९९२ पासून १९९६ पर्यंत भारतातील विविध विभागात जे घोटाळे झालेत, त्याचा तपशील असा आहे. १९९२ साली ५,००० कोटी रुपयांचा साखर घोटाळा, १९९४ साली ६५० कोटी रुपयांचा चारा घोटाळा, १९९५ साली ६०० कोटी रुपयांचा हाऊसिंग घोटाळा, १९९५ साली १७ कोटी ४० लाख रुपयांचा हवाला कांड आणि ६५ कोटी रुपयांचा झारखंडचा पक्षाला लाच देण्याचे कांड व तीन कोटींचा यूरिया घोटाळा, १९९६ साली एकूण ६,४६८ कोटी ४० लाख रुपयांच्या घोट्याळ्यांचा अजून तपास सुरू आहे. शिवाय आणखीन एकेक प्रकरण बाहेर येतच आहे.

(संदर्भ : टाइम्स ऑफ इंडिया, २१ जून १९९६)

## राजकीय अपराध

सर्वांनाच माहीत आहे की, राज्य काय असते, राज्य कसे चालविण्यात येते, सत्ता कशी मिळवावी लागते आणि मग यासाठी राजकारण कसे खेळण्यात येते. राजकारणात म्हणे सर्वकाही माफ असते. वैध-अवैधच्या भानगडीत पडायचे नसते. नैतिकता आणि चारित्र्याच्या नुसत्या गप्पा मारून आणि अश्वासनाची खिरापत वाटून, आरोप-प्रत्यारोपाच्या फैरी झाडून, अमाप काळा पैसा खर्च करून राजसिंहासन मिळते. सगळे राजकारणच गुंडांच्या व गुन्हेगारांच्या हाताचे बाहुले झाले. राजकारणाची अक्षरश: ससेहोलपट होत आहे. जनतेचा नेत्यांवर विश्वास राहिला नाही. देशाच्या विकास आणि प्रगतीच्या नावावर सगळ्या देशालाच देशोधडीला लावण्यात येत आहे. ही अवस्था फक्त भारताचीच नव्हे तर समस्त जगालाच याची कीड लागलेली आहे. परिस्थिती एवढ्यावरच थांबलेली नाही, तर राजकारणात डावपेच खेळणाऱ्याची पाठ थोपटण्याचा रीतसर लाळघोटेपणा सुरू आहे. राजकारण्यांचा आज इतका वचक आहे की, कधीकधी कायद्यालासुद्धा त्यांच्यासमोर नमते घ्यावे लागतेच, शिवाय बरेच नेते आपला स्वार्थ साधण्यासाठी कायदा खिशात घालून बिनधास्त वावरतात. ही समस्या आता इतकी गुंतागुंतीची झाली आहे की, आता हे ठरविणेदेखील अवघड झाले की नेता मोठा की, न्याय मोठा. एखादा अपराध सामान्याने केला की गुन्हा ठरावा आणि तोच अपराध एखाद्या नेत्याने केला की, गुन्हा ठरू नये, इतकी परिस्थिती बिकट होऊन बसली. साधारणत: एवढेच म्हणता येईल की, राजकारणाची पोळी भाजून घेण्यासाठी कायद्याला धाब्यावर बसवून जे कृत्य करण्यात येते, त्यास आपण राजकीय अपराध म्हणावे. सत्तेसाठी आणि स्वार्थासाठी वाट्टेल ते करण्याची जी मानसिकता राजकारण्यांची

बळावली, त्याचाच भयानक परिणाम अवघ्या देशाला आज भोगावा लागत आहे. जो नेता सर्वांत जास्त घपले-घोटाळे करण्यात पटाईत आहे, तो सर्वांत जास्त मोठा नेता होत आहे. ही अवस्था आज केवळ भारतातच नव्हे तर अगदी जागतिक पातळीवर दिसून येत आहे. त्याचप्रमाणे राजकारण करण्यासाठी अगर राजकीय खेळी खेळण्यासाठी आजकाल सर्रासपणे जातीयवादाचे विषारी डाव खेळणे, धर्माचा राजकारणासाठी सर्रास वापर करणे, समाजात दूही पसरवून दंगली घडविणे आणि मग सत्ता हस्तगत करणे, या घटना मात्र आता रोजच्याच झाल्या आहेत.

सद्यस्थितीमध्ये राजकारणासाठी हा फॉर्म्यूला सगळ्यात सोपा झाला की, वंश-वर्ण, प्रांत आणि भाषावाद उभा करून जनतेचे शोषण करावे आणि सत्ता भोगावी. एवढेच नव्हे तर काही देशात तर वर्ण-वंशाच्या आधारांवर भीषण रक्तपात करण्यात आला. उदाहरणासाठी बोस्निया आणि चेचनियाचे उदाहरण देता येईल. काही देशांमध्ये धर्माच्या नावावर वारंवार दंगली घडवून हजारो निष्पापांच्या रक्ताने होळी खेळून सत्तेची असुरी तहाण भागविण्यात येते. भारतामध्ये मुस्लिम समुदायाबरोबर हेच होत आहे. याचप्रमाणे म्यानमारमध्ये मुस्लिमांविरुद्ध, पाकिस्तानात मुहाजिरीन (स्थलांतरित) विरुद्ध, अफ्रिका आणि अमेरिकेत कृष्णवर्णीयांविरुद्ध जे काही होत आहे, ते राजकीय अपराधांमध्येच मोडते.

## सामरिक अपराध

निश्चितच युद्ध म्हणजे मानवीय प्राणांचा बळी जाणे, रक्ताचे पाट वाहणे, संपत्तीची राखरांगोळी होणे, मुले अनाथ आणि स्त्रीया विधवा होणे, या बाबी आल्याच, शिवाय कधीकधी युद्धाशिवाय पर्यायसुद्धा नसतो. मात्र यासाठीसुद्धा जागतिक पातळीवर काही नियम घालून देण्यात आलेले आहेत आणि या नियमांची पायमल्ली करणे म्हणजेच सामरिक अपराध होय. उदाहरणार्थ, युद्ध हा अगदी शेवटचा पर्याय आहे. समस्या या उभय पक्षातील समन्वय आणि संवादाने निश्चितच सुटू शकतात. मात्र जाणूनबुजून युद्धसदृश परीस्थिती निर्माण करणे आणि त्यात निष्पाप नागरिकांचा बळी घेणे, स्त्रियांच्या शरीरांचे लचके तोडणे, जैविक अस्त्रांचा वापर करून नागरिकांच्या प्राणांचा बळी घेणे, अनुशक्तीचा वापर करून शहरेच्या शहरे नष्ट करणे, युद्धकैद्यांचा अमानुष छळ करणे, हे सर्वकाही सामरिक अपराध होय. मागील शतकात घडलेल्या दोन महायुद्धांच्या परिणामांचे भोग आजही मानवता भोगत आहे. खरे पाहता ही युद्धे न करताही समस्या सोडविता

आल्या असत्या. तरीसुद्धा सत्यद्वेषाने पिसाटलेल्यांनी मानवजातीवर भयानक युद्धे लादून जो घोर अपराध केला, त्याचे प्रायश्चित्त होणे कधीच शक्य नाही. आजही त्या महायुद्धांच्या आठवणी नागासाकी आणि हिरोशिमाचे नाव काढताच अंगावर शहारे आणतात. पराभूत सैन्यांच्या महिलांच्या अब्रूचे धिंडवडे कशा प्रकारे काढण्यात आले आणि किती भयानक रक्तपात करण्यात आला, याची कल्पना न केलेलीच बरी. बोस्निया आणि चेचनियात झालेल्या रक्तपाताची आणि तेथील निष्पाप स्त्रियांचा सामुदायिक बलात्कार करण्याची कल्पना न केलेलीच बरी.

सामरिक अपराध म्हणजे केवळ बळजबरीचे युद्ध लादणेच नव्हे, तर यासाठी जीवघेणे अस्त्र तयार करणे, सामरिक तयारी करणेसुद्धा अपराध आहे. वर्तमानकाळात प्रगत अगर अतिप्रगत देशात अस्त्रनिर्मितीची जी जीवघेणी स्पर्धा सुरु आहे, हे याचे उत्तम उदाहरण होय. आज परीस्थितीत काही देशांजवळ इतके विनाशक अस्त्र आणि बॉम्ब आहेत की केवळ एकाच बाँबच्या वापरांमुळे समस्त जग नष्ट होऊ शकते. यदा-कदाचित असे घडले तर या अपराधाच्या परिणामाची कल्पना करणेही शक्य नाही.

आज अवघे विश्व नष्टतेच्या उंबरठ्यावर उभे आहे. एका अहवालात म्हटले आहे की, आज पूर्ण जगामध्ये दहा कोटी दारूगोळ्यांची भुयारे तयार करून ठेवण्यात आलेली आहेत. अगदी एका इशाऱ्यात कोट्यवधी प्राणाचा बळी जाऊ शकतो.

(संदर्भ : क़ौमी आवाज, २३ सप्टेंबर १९९५)

रशियामध्ये स्टॅलीनच्या काळात कैद्यांवर विष-प्रयोग करण्यात येत असे. त्याच्या गुप्त पोलिसयंत्रणेच्या प्रयोगाशाळेत तयार करण्यात आलेल्या विषारी पदार्थांची तीव्रता पाहण्यासाठी त्याचा कैद्यांवर प्रयोग करून अभ्यास करण्यात येत, सामान्य कैद्यांना विषारी पदार्थांची इन्जेक्शन्स दिली जात आणि यावरून अनुमान लावण्यात येत असे की, कोणते विष जास्त तीव्र आहे. (संदर्भ : क़ौमी आवाज, २८ जुलै १९९५) त्याचप्रमाणे दुसऱ्या महायुद्धात चीनी नागरिकांवर शस्त्रक्रिया करण्याचे प्रयोगसुद्धा जपानमध्ये करण्यात आले. (संदर्भ : क़ौमी आवाज, २४ जुलै १९९५) ही सर्व उदाहरणे सामरिक अपराधांची आहेत. इराकमध्येसुद्धा मागील दहा-पंधरा वर्षांपासून आर्थिक आणि लष्करी नाकेबंदी केल्यानंतर तेथील लाखो नागरिक अमेरिकेच्या अत्याचारास बळी पडले. लक्षावधी निष्पाप मुलांचा औषधाअभावी मृत्यू झाला आणि हे सर्वकाही संयुक्त राष्ट्रसंघाच्या अन्यायी व अत्याचारी निर्णयामुळे घडले.

## नैतिक अपराध

नैतिक अपराध म्हणजे असे अपराध ज्यामुळे अपराध करणाऱ्या व्यक्ती अगर तिच्या नातेवाइकांची नैतिकता प्रभावित होत असते किंवा जे अपराध नैतिकतेशी संबंधित असतात. उदाहरणार्थ, आत्महत्या, मद्यपान, मादक पदार्थांचा वापर करणे वगैरे होय.

भारतात दरवर्षी ८० हजार लोक आत्महत्या करतात. सिगारेट, बिडी आणि तंबाखू सेवनाने होणाऱ्या रोगास दहा लाख लोक बळी पडतात. जागतिक आरोग्य संस्थेच्या एका अहवालानुसार हे स्पष्ट झाले की, जर मादक द्रव्याचा वापर करण्याची हीच अवस्था असली तर काही दशकांमध्ये दरवर्षी एक कोटी लोक मरण पावतील. अर्थातच दर तीन सेकंदास एका व्यक्तीचा मृत्यू होईल. दुसरीकडे मादक पदार्थांच्या सेवनास नवीन पिढीच बळी पडली आहे आणि ही समस्या दिवसेंदिवस गंभीर स्वरूप धारण करीत आहे. एका सर्व्हेच्या रिपोर्टमध्ये ही धक्कादायक माहिती बाहेर पडली की, पंधरा ते वीस वर्षे वयातील तरूण-तरूणी या समस्येच्या विळख्यात जास्त सापडलेले आहेत. (संदर्भ : क़ौमी आवाज २१ ऑक्टोबर १९९५, २४ एप्रिल १९९५)

संपूर्ण जगावर एड्‌स्‌सारख्या अत्यंत भयानक रोगाने आपला विळखा अवळला. हे तर झाले, शिवाय जे एड्‌स्‌च्या रोगाने पछाडलेले आहेत, ते जाणूनबुजून इतर लोकांना एड्‌स्‌चे भक्ष्य बनविण्याचे अमानुष पातक करीत आहेत. यामुळे ही समस्या अत्यंत भीषण स्वरूप धारण करीत आहे. उदाहरणार्थ, आयर्लंडमध्ये एका एड्‌स्‌ग्रस्त महिलेने वैफल्यग्रस्त होऊन जाणूनबुजून इतर लोकांशी लैंगिक व्यभिचार केला, त्यांनाही एड्‌स्‌ग्रस्त करून आपली असुरी कामना पूर्ण केली. अशा मार्गाने तिने ८० जणांत एड्‌स्‌चे विषाणू स्थलांतरित केले. त्याचप्रमाणे एका एड्‌स्‌ग्रस्त तरूणाने तेरा मुलींशी लैंगिक समागम करून रोगाची लागण लावण्याचे नैतिक अपराध केले.

## सारांश

अर्थातच अपराधांसंबंधी जे काही येथे लिहिण्यात आले, त्यावरून अपराधांचे केवळ एक ढोबळ स्वरूप समोर येते. नसता वस्तुस्थिती अशी आहे की अपराधांची आकडेवारी आणि भीषणता याहून कितीतरी पटीने जास्तच आहे. तिचे परिपूर्ण वर्णन करणे शक्यसुद्धा नाही. केवळ ढोबळ अनुमानासाठी ही आकडेवारी आणि वृत्तान्त आहे. वर्तमानकाळात फोफावलेल्या अपराधी वृत्तींची भीषणता यावरून स्पष्ट होते की, इलेक्ट्रॉनिक आणि वृत्त प्रसारमाध्यमाचा अधिकांश भाग हा गुन्हेगारी जगाच्या बातम्यांनी व्यापलेला आहे. एवढेच नव्हे तर न्यायालयात दिवाणीपेक्षा फौजदारी प्रकरणेच जास्त दिसतात.

## प्रकरण दुसरे

# अपराधांची कारणे

मागील पानांवर अपराधांचे जे अत्यंत विदारक चित्र रेखाटण्यात आलेले आहे, त्यांची बरीच कारणे आहेत. अपराधावर अंकुश लावण्यासाठी आपल्याला प्रथम त्यांच्या कारणांचा सुगावा घेणे आवश्यक आहे. कारण अपराधांप्रमाणेच त्यांची कारणेसुद्धा जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांशी संबंधित असतात. यांची कारणमीमांसा केल्यावर हे स्पष्ट होते की, काही अपराधाची कारणे ही क्षणिक आणि काहीची स्थायी स्वरुपांची असतात. त्याचप्रमाणे काही अपराधांचा संबंध व्यक्तीशी तर काहींचा संबंध पूर्ण समुदायाशी असतो. अर्थातच काही अपराध व्यक्तिगत तर काही अपराध सामुदायिक स्वरूपांचे असतात. काही अपराधांचा संबंध सामान्यजणांशी तर काहीचा संबंध विशेष आणि जवाबदार व्यक्तींशी असतो. काही अपराध अज्ञानातून घडतात, तर काही अपराध ज्ञान आणि कायद्याच्या आधारांवर होतात. काही अपराधांच्या आधारांवर इतर बरेच अपराध घडतात, एकूण अपराधांची सीमा जेवढी जास्त आणि अमर्याद असेल, त्याच प्रमाणात त्यांची कारणेसुद्धा अमर्याद असतात. वस्तुस्थिती अशी की, कोणताही अपराधी एका विशिष्ट पार्श्वभूमीनुसार अपराध करतो आणि त्याचे कारण त्याच्या विशिष्ट परिस्थितीत लपलेले असते. जोपर्यंत यांची कारणमीमांसा करण्यात येणार नाही, तोपर्यंत त्याविषयी बोलता येणार नाही. आपण पुढे काही विशिष्ट कारणांची मीमांसा करणार आहोत.

## आधुनिक विचार आणि सिद्धान्त

तसे पाहिल्यास मानव अस्तित्वात आल्यापासून आजपर्यंत अपराध आणि दुराचार होत आहेत. मात्र वर्तमानकाळात मानवाने जे सिद्धान्त आणि विचारधारा समोर आणली आहे, त्यामुळे पूर्ण मानवताच अपराधी वळणावर चालत आहे. अपराधी वृत्ती आता तिच्या अंगवळणीच लागली. धर्म, समाज, नैतिक मूल्ये आणि चारित्र्यासारख्या बाबी आता इतिहास जमा झाल्या आहेत. नवीन विचारसरणीच्या नावावर बिनबुडाचे सिद्धान्त मांडून चारित्र्याची आणि नीतिमूल्यांची सर्रास होळी करण्यात येत आहे. यात अपराधी विचारधारांना दिवसेंदिवस महत्त्व प्राप्त होत असून न्याय, सत्य व सदाचारांची मुळी किंमतच राहिली नाही. या ठिकाणी सविस्तरपणे चर्चा न करता आपण थोडक्यात अशा महत्त्वाच्या बाबींवर नजर टाकू या, ज्यांच्या बळावण्यामागे 'आधुनिकता' नावाच्या या भुताटकीने कसा स्वैराचार माजविला आहे.

मागील काळात अज्ञान आणि अशिक्षितपणा, अंधश्रद्धा आणि मार्गभ्रष्टतेचे भयंकर जाळे असूनसुद्धा त्या काळात समाजात एका वरिष्ठवर्गाची कल्पना होती आणि

समाजावर या वर्गाची पकड होती. शिवाय इतर सर्वच त्यांच्यासमोर मान तुकवित होते. आपल्या कृत्यांचा, कर्मांचा त्यांच्यासमोर जाब देण्याची वृत्ती अगर जाणीव लोकांमध्ये होती. मात्र या आधुनिक काळातील आधुनिक विचारसरणीमुळे मानवाच्या अंत:करणातून ईश्वराची, देवधर्माची कल्पनाच लुप्त झाली. अर्थाच धर्माची बंधने तुटली, नैतिकता नष्ट पावली आणि मानव हा स्वातंत्र्याच्या नावाखाली स्वैराचारी बनला. ज्याअर्थी ईश्वराचीच कल्पना नसेल तर भय कोणाचे आणि पाप-पुण्याचा जाब द्यायचा कोणासमोर? अशी एक विचारधारा लोकांत व विशेषत: नवीन पिढीमध्ये रुजली.

ईश्वराच्या, देवधर्माच्या कल्पनेनंतर दुराचारापासून मानवास परावृत्त ठेवणारी शक्ती म्हणजे माणसाचे अंत:करण होय. त्याचे अंत:करण नेहमीच पापी, अन्यायी व अत्याचारी वर्तनामुळे त्यास धिक्कारत असते. एखादे पाप घडले, एखाद्यावर अन्याय वा अत्याचार केला अगर एखादा गुन्हा घडला तर माणसास मानव-स्वभावामुळे पश्चात्ताप होतो आणि मन धिक्कारत असते. मात्र आधुनिक विचारधारणेने त्याच्या अंत:करणालाच अपराधी आणि पापी बनविले आहे. माणुस आधुनिकतेमुळे अगदी भावनाशून्य झाला आहे, असे 'फ्राइड' या मानसशास्त्रज्ञानेसुद्धा म्हटले आहे. त्याने म्हटले आहे की, स्वाभाविक भावना जेव्हा चिरडण्यात येतात, स्वार्थपूर्तीसाठी भावनांवर दबाव टाकण्यात येतो आणि बाह्य शक्तींच्या आक्रमणांपासून स्वत:चा बचाव करण्यासाठी मनावर ताबा ठेवण्याच्या नावावर अन्यायपूर्वक दबाव टाकण्यात येतो, तेव्हा मानवाची वृत्ती अतिविचित्र होऊन बसते.

हे झाले मानवी अंत:करण यानंतर समाज माणसाला दुराचारापासून आणि अन्याय व अत्याचारांपासून परावृत्त ठेवत असतो. या बाबतीत 'फ्राइड' याने असे लिहिले की, समाज आणि समाजाच्या रूढी व परंपरांमुळेसुद्धा मानव अपराधीवृत्ती वा इतरांवर अन्याय व अत्याचार करण्याचे धाडस करीत नाही. ईश्वर झाला, देवधर्म झाला, अंत:करण झाले, समाज झाला. आता उरला फक्त कायदा जो अपराधांवर अंकुश ठेवतो. या बाबतीतसुद्धा आधुनिक विचारसरणीने गरळ ओकली आहे. या आधुनिक विचारसरणीने म्हटले की, गुन्हेगार हा शिक्षेस नव्हे तर सहानुभूतीस पात्र असतो. कारण गुन्हेगार गुन्हा करीत नाही, तर परिस्थितीला बळी पडून तो गुन्हा करतो. तेव्हा शिक्षा द्यायची असेल तर त्या समाजास द्या, ज्यामुळे ही परिस्थिती उद्भवली आणि त्या भल्या माणसास ना-ना परंपराच्या ज्या अमानुश बंधनात जखडले असेल त्या निष्ठूर परंपरांना फाशी द्या. अर्थातच अशा या विचारसरणीमुळे गुन्हेगारीस आळा बसण्याऐवजी उलट खतपाणी मिळत आहे. अपराध्यांची पाठ थोपटून त्यांना परत गुन्हा करण्यासाठी उभे करण्याचाच हा विलक्षण प्रकार होय.

## आर्थिक कारणे

पैशाचे महत्त्व कोणाला बरे माहीत नाही? सर्वांनाच याची नितांत आवश्यकता आहे. आजच्या काळात तर सर्वांत जास्त पैशांलाच महत्त्व आहे. आज पैशांच्याच आधारावर जीवनाचे अस्तित्व टिकलेले आहे. काहीजण आर्थिक माध्यमांवर जास्तीतजास्त ताबा मिळवू इच्छितात, तर दुसरीकडे अशी अवस्था आहे की, सामान्यजणांना जीवनाचा गाडा कसाबसा रेटण्यासाठी दोन पैशे मिळविण्याकरिता जिवाचे रान करावे लागत आहे. अशा या अवस्थेत अपराध घडत असताना त्याचे तीन पैलू स्पष्ट होतात. प्रथम आर्थिक दारिद्र्य, द्वितीय आर्थिक विषमता आणि तृतीय म्हणजे अर्थार्जनासाठी होत असलेली जीवघेणी स्पर्धा. या तीन पैलूंवर आपण जरा सविस्तरपणे चर्चा करु या.

### १) आर्थिक दारिद्र्य

लोकांमध्ये असलेले अठराविश्वे दारिद्र्य म्हणजेच पाचवीला पुजलेली साडेसाती, आणि हीच साडेसाती बऱ्याच अपराधांची जननी आहे, असे म्हटले तर मुळीच वावगे ठरणार नाही. या जननीने असंख्य अपराधांना डुकराच्या गलिच्छ पिल्लांप्रमाणे जन्म दिला. शिवाय या अपराधांच्या आणखीन तीन शाखा निघतात. एवढेच नव्हे तर हे आरिष्ट इतके भयानक आणि रौद्र स्वरुपाचे आहे की, यामुळे मोठमोठे त्यागी पुरुष आणि महात्मे व धर्मात्मेसुद्धा खचून जाऊन निधर्माच्या आणि सत्य-द्रोहाच्या मार्गी लागून तसेच वाममार्गाची वाट धरून आपल्या ईशपरायणता आणि संयम व धैर्याची नग्न धिंड काढतात. कारणही तेवढेच गंभीर आहे. गरिबीने त्रस्त होऊन आणि दारिद्र्याने विवश होऊन माणूस मोठमोठे अपराध करतो आणि कधीकधी आपली ईमानदारी आणि श्रद्धासुद्धा विकतो, असे प्रेषित मुहम्मद (स) यांनीसुद्धा म्हटले आहे. आधुनिकतेचा जोरजोराने डंका वाजत असलेल्या या वर्तमान विज्ञानयुगात वेठबिगारी, आपसातील तंटे-बखेडे, चोऱ्या-डकाईती, वाटमारी हुंड्याची मागणी, लाचलुचपत, घोटाळे, भ्रष्टाचार, मटका-सटका, दारू व मद्यविक्री, देहव्यापार, आत्महत्या, रक्तपात रोगराई वगैरेसारखे भयानक अपराध याच गरिबीची ऊग्र आणि किळसवाणी अवलाद होय.

जगातील लोकसंख्येचा महत्तम भाग गरिबी आणि दारिद्र्यास बळी पडलेला. एवढेच नव्हे तर परिस्थिती इतकी बिकट आहे की, आज असंख्य लोक जीवनाच्या मूलभूत गरजांपासूनच वंचित आहेत. दुर्दैव एवढ्यावरही थांबत नाही, तर युद्ध आणि महायुद्ध तसेच नैसर्गिक आपत्तींनी यांच्यावर आणखीनच क्रूर प्रहार केला आहे.

जागतिक बँकेच्या एका सर्वेक्षणातून स्पष्ट झाले आहे की, आजच्या या चंगळवादी काळामध्ये आणि मंगळावर स्वारी करण्याच्या ज्ञान-विज्ञान व संशोधनाच्या काळामध्ये, पंचतारांकित हॉटेल्समध्ये मौज करण्याच्या काळामध्ये, डान्स बारमध्ये बारबालांवर कोट्यवधी रुपये उधळणाऱ्यांच्या काळांमध्ये दररोज ७५ कोटी स्त्री, पुरुष आणि निष्पाप मुले उपाशीपोटी असतात व यांपैकी निम्मेजण दारिद्र्यरेषेच्या अगदी खालच्या पातळीपेक्षाही खाली जीवन कंठित आहेत. सर्वेक्षण अहवालात म्हटले गेले आहे की, जगामध्ये जीवनावश्यक वस्तुंची रेलचेल असूनही पोटाची आग शमविण्यासाठी लोकांना जीवघेना संघर्ष करावा लागत आहे.

**२) विषमता**

एकीकडे दारिद्र्याची क्रूर कहाणी तर दुसरीकडे मात्र श्रीमंतीचा माज. या वर्तमान जगात अधिकतम संख्या गरिबांची आहे, मात्र अशा लोकांचीही कमतरता नाही की, ज्यांच्याकडे प्रचंड पैसा आणि संपत्तीची रेलचेल आहे. याच पैशाच्या बळावर ते शासन आणि सत्तेला आपल्या बोटांवर खेळवितात, याच पांढऱ्या आणि काळ्या धनाच्या जोरावर तो इतरांच्या हातापायांत आर्थिक गुलामींच्या बेड्या घालतात. याच विषम परिस्थितीची करणी आहे की आज गरीब आणि श्रीमंतामध्ये संघर्ष उफाळलेला आहे. याच संघर्षाचा परिणाम विभिन्न अपराधी कर्मांच्या स्वरुपात समोर येत असतो. श्रीमंतवर्ग गरिबांच्या विवशतेचा पूर्ण लाभ घेऊन त्यांचे सर्वतोपरी शोषण करीत असतो. शिवाय आपल्या असुरी आणि अघोरी स्वैर कामनांच्या पूर्ततेसाठी अत्यंत निर्दयीपणे पैशांची उधळपट्टी करतो, तर दुसरीकडे गरिबांना दिवसाकाठी एकवेळची पोटाची खळगी भरण्यासाठी दुर्गंधीयुक्त कचऱ्याच्या ढिगारांतून सडके अन्न खावे लागते. श्रीमंतांच्या कुत्र्यांसाठी जे स्नानगृह असते आणि झोपायला प्रशस्त बेडरूम, खायला बिस्किटे आणि बागडायला जे प्रशस्त हिरवे लॉन असते, त्यासाठी येणाऱ्या खर्चात लक्षावधी गरिबांच्या मुलांचा अन्न व औषधावाचून होणारा मृत्यू टाळता येऊ शकतो. अर्थातच,

'मुखी कुणाच्या पडते लोणी, कुणा मुखी अंगार!'

कवितेच्या या ओळीप्रमाणे मानवजातीची सध्या अवस्था झाली आहे. मात्र याच विषम परिस्थितीमुळे गरिबांच्या मनात श्रीमंतांविषयी क्षोभाची आणि सुडाची आग खदखदत असते, असंतोष धुमसत असतो, या क्षोभ, असंतोष आणि द्वेशातूनच वैफल्याची भावना निर्माण होते आणि ना-ना प्रकारे नैतिक वा सामाजिक अपराध घडत असतात.

### ३) स्पर्धा

हेवा, क्षोभ आणि द्वेश व मत्सर हा केवळ गरीबवर्गातच नव्हे तर यापेक्षाही जास्त श्रीमंतांत असतो. जास्तीतजास्त संपत्ती आपल्या ताब्यात घेण्याच्या पिसाळ भावनेस बळी पडून श्रीमंतांमध्येच अगदी जीवघेणी स्पर्धा सुरू आहे. प्रत्येक श्रीमंत दुसऱ्या श्रीमंतास आपल्यापेक्षा हीन आणि तुच्छ ठरविण्याचा अटापिटा करीत आहे. यासाठी प्रत्येक प्रकारच्या वैध-अवैध आणि अघोरी नीतींचा व पद्धतींचा सर्रास वापर करण्यात येत आहे. इतरांपेक्षा आपल्याजवळ जास्त संपत्ती असावी आणि हे साध्य करण्यासाठी कोणत्याही आणि कितीही खालच्या पातळीपर्यंत जाण्याची मानसिकता आज श्रीमंतांमध्ये फोफावली आहे. आपल्या स्पर्धकास पराभूत करण्यासाठी श्रीमंतांमध्ये आज जीवघेणा संघर्ष सुरु आहे. एवढेच नव्हे तर आपल्या स्पधर्कांचा काटाच काढून टाकण्याच्या असंख्य घटना घडत असतात. पैशांच्या बळांवर राजकीय प्रभाव प्राप्त करण्यात येतो, व याच्या आधारेच मोठ्या प्रमाणात घपले-घोटाळे आणि विविध अपराध घडतात. एकूणरित्या आर्थिक विषमता आणि स्पर्धेमुळे असंख्य अपराध घडत असतात.

## धार्मिक आणि नैतिक कारणे

या बाबतीत प्रामुख्याने चार गोष्टी उल्लेखनीय आहेत. प्रथम भौतिकवाद, द्वितीय नैतिक मूल्यांचा ऱ्हास, तृतीय अश्लीलता व व्यभिचार आणि चतुर्थ मादक पदार्थांचा वापर. पुढे याच चार विशेष बाबींवर सविस्तर चर्चा करू या.

### १) भौतिकवाद

धर्म कशासाठी आहे? तर याचे सरळ आणि सडेतोर उत्तर असे की, धर्म हा मानवकल्याण, आत्मशुद्धी आणि नैतिकतेसाठी आहे. यामुळे समाजात नैतिक मूल्ये वाढीस लागतात आणि जर प्रामाणिकपणे याचा अंगिकार केला तर समाजातून अन्याय आणि अपराधांचे समूळ उच्चाटन होऊ शकते. नसता मानवांमध्ये भौतिकवाद अगर चंगळवाद निर्माण होऊन त्याच्या जीवनाचा उद्देश केवळ वैध-अवैध मार्गाने पैसाच कमाविणे एवढाच शिल्लक उरतो आणि मग तो नैतिक मूल्यांना व्यावहारिक जीवनातून हद्दपार करतो. यानंतर त्याच्यात अघोरी भावना आणि स्वैर कामनांची अतिरेकी प्रवृत्ती बळावते. या अघोरी भावना, स्वैर कामना व अभिलाषांच्या देवतेस प्रसन्न करण्यासाठी वाटेल ते करतो. पाहिजे त्या गोष्टीचा बळी देतो. वर्तमान परिस्थितीत याच दयनीय अवस्थेला माणूस बळी पडला आहे. अशा परिस्थितीला साम्यवाद आणि पाश्चात्य संस्कृतीने मनसोक्त खतपाणी घातले. याची अनुभूती या सिद्धान्ताच्या कैवारी आणि

खंदे समर्थक असलेल्या देशांमध्ये घडणाऱ्या अपराधी घटना पाहिल्यावरून येते. आज या भौतिकवादामुळे मानवता नष्टतेच्या क्रूर जबड्यात जखडलेली आहे. माणसाने धर्माची बंधने तर तोडून टाकली मात्र याच्या भयानक परिणामांची जवाबदारी घ्यायला कोणीही पुढे धजावत नाही. तरीसुद्धा एवढे मात्र निश्चित की डोळे बंद केल्याने सत्य लपत नसते आणि हेच सत्य उघड्या डोळ्यांनी पाहण्याचे धाडस करावेच लागेल. घोर अपराधांच्या भयानक स्वरुपात आज हे सत्य आपल्यासमोर आ वासून उभे आहे, ते नाकारणे शक्य नाही.

## २) नैतिक मूल्यांचा ऱ्हास

हा भौतिकवादाचा परिणामच म्हणावा लागेल की, आज नैतिक मूल्यांचा ऱ्हास होत असताना आपल्याला सर्वत्र दिसत आहे. वर्तमानकाळात ही अवस्था किती विदारक आहे, हे वेगळे सांगायची गरज नाही. स्नेह, त्याग, प्रेम, ममत्व आणि दया व मायेच्या ठिकाणांवर स्वार्थ, अप्पलपोटेपणा, वैरभाव व निष्ठूरतांसारख्या विद्रूप भावनांनी अतिक्रमण केले आहे, माणसा-माणसांतील नैतिक संबंधांची बंधने तुटत आहेत, रक्ताच्या नात्यांत दुही निर्माण झाली आहे, पारिवारिक आणि सामाजिक मूल्ये विखुरली आहेत, बंधुभाव नष्ट होऊन त्या ठिकाणी द्वेश, मत्सर आणि वैर निर्माण झाले आहे, कालचा जीवाभावाचा मित्र आज वैरी झाला आहे. संपूर्ण वातावरणच दूषित झाले आहे. ज्या समाजाची ही अवस्था असेल, त्या समाजात कशा प्रकारची मूल्ये वाढीस लागतील, याची कल्पना करणे अशक्य नाही. अशा समाजात मुलगाच बापाचा गळा चिरून टाकील, पोटच्या मुलीशी व्यभिचार करण्यात पित्याला लाज वाटणार नाही, घपले-घोटाळे, लूटमार, रक्तपात, चोऱ्या-माऱ्या, व्यभिचार आणि अशा स्वरुपांचे सगळेच अपराध सहजच होतील, जे आज होत आहेत.

## ३) अश्लीलता आणि व्यभिचार

माणूस जेव्हा धर्मद्वेष्टा होतो, नैतिक मर्यादांची बंधने झुगारून देतो, नीतिमत्ता ठोकरून लावतो, तेव्हा तो माणूस राहत नसून माणसाच्या रूपात एक भयानक श्वापद होतो. मग तो आपल्या शरीरावरील शिष्टाचाराचा पोषाख काढून टाकतो, त्याच्यातून लाज-लज्जा आणि शरम निघून जाते. त्याच्या मनातून ईश्वराची आणि समाजाची धाक निघून जाते आणि तो शिष्टाचार आणि चारित्र्याची होळी करून अश्लीलतेचा नग्न शिमगा अगदी निर्लज्जपणे खेळतो. मनगटावर चुना लावून बोंबलत असतो की, पाहा ! मी कशा स्वरुपाचा माणूस आहे. स्वैराचार हा माझा जन्मसिद्ध हक्क असून माझ्यावर कसलेच

बंधन नाही. याचे उत्तम उदाहरण म्हणजे पाश्चात्य संस्कृतीतील शिगेला पोचलेली अश्लीलता आणि व्यभिचार होय. या संस्कृतीने सर्वांच्याच शरीरावरून कपडे हिसकावून, ओरबडून सर्वांनाच नग्न करून सोडले. त्यातल्यात्यात अश्लील साहित्य, चित्रपट सृष्टी आणि टी.व्ही.च्या प्रसारमाध्यमांनी व्यभिचाराच्या धगधगत्या ज्वालांत भरपूर तेल ओतले आणि यामुळे हा वणवा इतका भडकला की, या भीषण आगीत केवळ प्रौढ स्त्री-पुरुषांचीच नव्हे तर अल्पवयीन मुला-मुलींचीसुद्धा राखरांगोळी झाली. याच कारणांमुळे त्यांच्यात लैंगिक व्यभिचार आणि अपराधी वृत्ती बेशरमाच्या झाडासारखी सुसाटपणे फोफावली आहे.

### ४) मादक पदार्थांचा वापर

अपराधी कर्म घडविण्यामध्ये मादक पदार्थांचासुद्धा मोलाचा वाटा आहे. शिवाय मादक पदार्थांचे सेवन करणेसुद्धा एक घोर अपराध तर आहेच मात्र यातून आणखीन बरेच अपराध जन्म घेतात. बऱ्याच वेळा यामुळे बलात्कार आणि हत्यासारखे अपराधही घडतात. यांच्या सेवनामुळे माणसाचे आरोग्य, विचारबुद्धी आणि नैतिकता तळास जाते.

मादक पदार्थांचा वापर स्त्रिया आणि मुलांमध्ये सर्रासपणे होत असल्यानेसुद्धा अपराधांचा आलेख शिगेला पोचला आहे. एका सर्वेक्षणाच्या धक्कादायक अहवालानुसार, जगातील ४० टक्के महिला तंबाखूचे सेवन करतात. (संदर्भ : क़ौमी आवाज, १० एप्रिल १९९५) चीनमध्ये असा माणूस शोधूनही सापडत नाही, ज्याच्या हाती सिगारेट नसेल. एवढेच नव्हे तर दहा-दहा वर्षांची मुले सिगारेट घेण्यासाठी आपल्या चॉकलेटची पाकिटे विकतात. (संदर्भ : क़ौमी आवाज, १ ऑगस्ट १९९५) या सर्वच परिस्थितीला पाहता हा अनुमान लावता येतो की, जगात मादक द्रव्यांचा वापर करणारे किती मोठ्या संख्येत आहेत आणि याचे किती भयानक परिणाम भोगावे लागत लागतात.

## सामाजिक कारणे

याविषयी चर्चा करण्यापूर्वी आपण दोन भागांत चर्चा करण्याचे ठरवू या. प्रथम शहरी वा नागरी जीवन आणि द्वितीय म्हणजे सामाजिक मूल्यांचा ऱ्हास.

### १) शहरी जीवन

अपराधांचा आलेख उंचावण्यात नागरी अथवा शहरी भागाचासुद्धा मोठा वाटा आहे. 'नॅशनल क्राइम ब्यूरो' च्या एका अहवालानुसार स्पष्ट करण्यात आले की, लहान शहरे आणि ग्रामीण भागाच्या तुलनेत मोठमोठ्या शहरांमध्ये चार पटीने जास्त गुन्हे

घडतात. कारण शहरी भागांत अपराध घडण्यासाठी भरपूर संधी असते. एवढेच नव्हे तर काहीजणांचे पोटपाणी अपराधी कांडावरच चालते. दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी की, पोटापाण्याची व्यवस्था करण्यासाठी ग्रामीण भागातून शहराकडे येणारा सुशिक्षित आणि अशिक्षित बेरोजगारांचा लोंढा शहरी संस्कृतीने प्रभावित होतो आणि शहरी जीवन जगण्याच्या लालसेपोटी चोरी, डकाईती, चोरटा व्यापार, दहशतवादी कारवाया आणि हत्या व लूटमार करण्याचा मार्ग अवलंबतो.

काही शहरांत अथवा महानगरांच्या ठिकाणी विशेष प्रकारचे अपराध घडतात. उदाहरणार्थ, दिल्लीमध्ये खून, अपहरण व बलात्कार आणि धोका देणे तसेच शस्त्रांचा अवैध व्यापार, मुंबईत डकाईती, लूटमार, चोरी, सट्टा, दहशतवादी कारवाया, तसेच भारतीय पासपोर्टच्या कायद्यांचे उल्लंघन, बेंगलोरमध्ये नकली नोटांचा धंदा, हुंडा मागणी आणि खून करणे, चेन्नईमध्ये देहव्यापार, चित्रपट सृष्टीच्या नावावर नग्न आणि अश्लील चित्रपटांची निर्मिती, जयपूरमध्ये मादक पदार्थांचा व्यापार इतर शहरांच्या तुलनेत जास्त प्रमाणात होत असतो.

### २) सामाजिक मूल्यांचा ऱ्हास

शहरांमध्ये दिवसेंदिवस फोफावणाऱ्या अपराधांचे आणखीन एक कारण आहे आणि ते म्हणजे तेथे सामाजिक मूल्यांचा ऱ्हास, जो जवळपास झालाच आहे. आपसातील संबंध आणि सहकार्य, तसेच पारिवारिक व्यवस्था पूर्णत: कोलमडली आहे. स्नेह, बंधुभाव आणि ममत्व पार हरवून गेले व त्या ठिकाणी स्वार्थ, वैरभाव आणि दुरावा निर्माण झाला आहे. यामागे काही आर्थिक आणि सांस्कृतिक कारणेसुद्धा आहेत. मात्र अपराध घडण्यामागे वर उल्लेखलेली परिस्थितीच जास्त प्रमाणात जबाबदार आहे.

(संदर्भ : क़ौमी आवाज, १४ ऑगस्ट १९९५)

## राजकीय आणि वैधानिक कारणे

या मथळ्याचेही आपण दोन भाग करु या. प्रथम राजकीय अपराध आणि द्वितीय पोलिसांची अरेरावी.

### १) राजकारणातील अपराध

मागे आपण पाहिलेच आहे की, आजकाल राजकारण हे अपराधी वृत्तींच्याच हातातले बाहुले बनले आहे. शिवाय अशी परिस्थितीसुद्धा आहे की, राजकारणाच्या

खंबीर पाठिंब्याशिवाय अपराध घडत नाहीत. अपराधांच्या आधारावर राजकारण चालते की, राजकारणाच्या पाठिंब्यावर अपराध घडतात, हा एक संशोधनाचा विषय होय. काही असो, एवढे मात्र निश्चित की आज सगळे राजकारण अपराधी वृत्तीने ढवळून निघाले आहे. मोठा अपराध करायचा असेल आणि कोणतेही श्रम न करता प्रचंड संपत्ती मिळवायची असेल तर राजकारणात एंट्री मारावीच लागते. कारण राजकारण्यांची कॉलर पकडण्यासाठी सहसा पोलिसही धजावत नाही. शिवाय बेकायदेशीर सरकारी संरक्षण त्यास मिळते. म्हणूनच गुन्हेगारी जगातील मोठमोठे गुन्हेगार राजकारणाकडे वळले. लोकांना दमदाटी करून, दहशतीचा मार्ग अवलंबून आणि वेळ पडल्यास पोलिंग बूथ कॅप्चर करून गुंड आणि अपराध्यांनी मस्तपैकी राजकारणात एंट्री मारली आणि मोठमोठे अपराध करायला मोकळे झाले. एका सर्वेक्षणाचा अहवाल असा आहे की, आपल्या भारत देशात ३८ टक्के राजकारणी गुन्हेगार आहेत.

(संदर्भ : टाइम्स ऑफ इंडिया, ३१ जानेवारी १९९९, पृष्ठ क्र.१३)

## २) पोलिस पेशातील गुन्हेगारी

चांगल्या माणसाने कधीच पोलिस स्टेशनची पायरी चढू नये, असे म्हटले जाते, ते बरोबरच आहे. पोलिस खात्यातील मोठमोठ्या अधिकाऱ्यांना अपराधी घटकांची माहिती असूनसुद्धा ते सर्रासपणे डोळेझाक करतात. कधीकधी स्वार्थापोटी आणि राजकीय दबावापोटीसुद्धा पोलिस अपराध्यांच्या गंभीर अपराधांवर स्वतःच पडदा टाकतात. बऱ्याच वेळा गुन्हेगारांना सोडून निरपराधांनाच पोलिसी दंडुकेशाही बळीचा बकरा बनवित असते. (संदर्भ : टाइम्स ऑफ इंडिया, २१ जून १९९९, पृष्ठ क्र. १९)

पोलिसांच्या अशा वर्तनामुळे अपराध्यांचे चांगलेच फावते. शिवाय गुन्हा नसताना शिक्षा भोगणाऱ्यांमध्ये अपराधी भावना निर्माण होते. पोलिसांकडून अपराधांचा नायनाट करण्यात बरेच अडथळेसुद्धा आहेत. उदाहरणार्थ, त्यांना योग्य प्रशिक्षण आणि शस्त्रे वेळेवर उपलब्ध होत नाही. शिवाय महत्त्वाचा हा मुद्दासुद्धा आहे की, पोलिस खात्यामध्ये त्यांना पगार इतका कमी असतो की, लाचलुचपत, भ्रष्टाचार आणि गुन्हेगारांशी हप्ते वसुली करणे त्यांना भाग पडते. एका सर्वेक्षणानुसार २४ टक्के पोलिसवाले काळे धंदे करण्यात सामील आहेत. (संदर्भ : टाइम्स ऑफ इंडिया ३१ जानेवारी १९९९)

## मानसिक कारणे

या विषयावर चर्चा करताना आपण तीन बाबीं हताळू या.

### १) अशांत मानसिकता

आजच्या काळातील आर्थिक आणि सामाजिक विषमता, मानसिक, आर्थिक व लैंगिक शोषण, धर्मद्वेष, भौतिकवाद, चंगळवाद, अश्लीलता आणि व्यभिचाराचा प्रादुर्भाव, दारू आणि मादक पदार्थांचे सेवन आणि यासारख्या ना-ना मानसिक व्याधींनी ग्रस्त होऊन माणूस पार वैफल्यग्रस्त झाला. त्याला कोठेच शांती आणि समाधान लाभत नाही. अशा विचित्र परिस्थितीत त्याचे सांत्वन करणारादेखील कोणी उरलेला नाही. मुले आई-बाबांच्या प्रेमापासून वंचित, वृद्ध माता-पिता आपल्या मुलांच्या सहाऱ्यापासून दुरावलेले, बहीण-भावातील प्रेम आणि सहानुभूती करपून नष्ट झालेली, कुटुंबातील स्नेह होरपळलेला, समाजात दुही पसरलेली आणि अवघे वातावरणच दूषित झालेले असल्याने ना-ना मानसिक तणावाखाली तो वावरत आहे. अशाच वैफल्यग्रस्त मानसिकतेमुळे आज माणूस अपराधी मार्गाकडे वळला.

### २) प्रदूषण

दुसरीकडे प्रदूषणामुळे दूषित झालेल्या वातावरणाचा माणसाच्या आरोग्य आणि मनमस्तिष्कावर विपरित परिणाम होत आहे. 'जागतिक प्रदूषण समिती'तर्फे काही मोठमोठ्या शहरात घेण्यात आलेल्या सर्वेक्षणात ही माहिती समोर आली की, कर्कश आवाजाच्या प्रदूषणाने दैनंदिन जीवनातील कामकाजात लोकांची एकाग्रता नष्ट होत आहे. ताण-तणावामुळे विभिन्न अपराध घडतात.

(संदर्भ : क़ौमी आवाज, २५ एप्रिल १९९५)

### ३) मानसिक तणाव

बऱ्याचवेळा मानसिक तणावास बळी पडून माणूस अपराधांकडे वळतो. उदाहरणार्थ, रशियातील एका माणसाने लैंगिक तृष्णा भागविता आली नसल्याने वैफल्यग्रस्त होऊन ५३ तरूणीं आणि तरुणांची निर्घृण हत्या केली. अशी बरीच उदाहरणे अख्या जगात सापडतात.

## विज्ञान व संशोधनाचा गैरवापर

तसे पाहता विज्ञान व संशोधन हे माणसाच्या भल्याकरिता आहे. मात्र याचा सदुपयोग करण्याऐवजी दुरुपयोगच जास्त होताना दिसतो. उदाहरणार्थ, 'अल्ट्रा साउंड'च्या माध्यमाने गरोदर आईच्या पोटातील मुलाची शारीरिक परिस्थिती हाताळण्यात येऊ शकते. मात्र दुर्दैव असे की, हा याचा उपयोग नव्हे तर तो दुरुपयोग गर्भातील

मुलांची लिंगचाचणी करण्यासाठी आणि भ्रूणहत्यासारखे पातककर्म करण्यासाठी होत आहे. शिवाय कितीही कडक कायदा करूनसुद्धा या अपराधावर आळा घालण्यात शासनाला यश मिळाले नाही. आणखीन दुर्दैव असे की, मागील पाच वर्षांत यामध्ये सतत वाढ होत आहे. 'भारतीय मेडिकल कौंसिल' च्या सर्वेक्षणानुसार, देशामध्ये कायदेशीर गर्भपातापेक्षा बेकायदेशीर गर्भपाताची संख्या पाचपटीने जास्त आहे. यामध्येसुद्धा लैंगिक चाचणी केल्यावर होणाऱ्या भ्रूणहत्येचे प्रमाण प्रचंड आहे.

याचप्रमाणे वर्तमानपत्र, रेडिओ व टेलिव्हिजनसारख्या प्रसारमाध्यमांची अवस्थासुद्धा अत्यंत शोचनीय आहे. यामुळे असंख्य गुन्हे आणि अपराध घडत आहेत. या प्रसारमाध्यमांचा नको तसा सर्रास वापर करण्यात येत आहे. नको ते दाखवून लोकांच्या आधीच धगधगत असलेल्या भावनांत तेल ओतून त्या उत्तेजित करण्यात येत आहे. अपराधी घटना घडण्यासाठी आवश्यक मसाला असलेल्या बातम्या आणि सोबत पितपत्रकारितेमुळे सर्वत्र अरेरावी माजली आहे.

माहिती तंत्रज्ञान (Information Technology) विकसित झाल्यापासून या अत्यंत उपयुक्त संशोधनाचा सर्रास गैरवापर होत आहे. गुन्हेगारी दिवसेंदिवस अवाक्याबाहेर जात आहे.

काही संशोधनाचा वापर मानवविनाशाकरिता करण्याचे मनसुबे अगदी आंतरराष्ट्रीय पातळीवर तयार झाले. मानवविनाशक शस्त्रास्त्रे, अणुशक्ती, जैविक व अण्वस्त्रे व अणुबॉम्ब्स् वगैरेंमुळे मानवाला लाभ होण्यापेक्षा भयंकर विनाशच आ वासून उभा आहे. याच शस्त्रशक्तीच्या बळावर काही शक्तिशाली आणि प्रगत देशांनी इतर कमकुवत देशांना सळो की पळो करून सोडले आणि जगात 'मोठ्याचा आला गाडा, गरिबाचे झोपडे मोडा' अशी अवस्था झाली आहे. एवढेच नव्हे तर यासारख्या विघातक शस्त्रांच्या बिनडोक वापरामुळे पिढ्यान्-पिढ्या नष्ट करण्यात येत आहेत. आज समस्त मानवजात दारूगोळ्याच्या ढिगाऱ्यावर उभी आहे. कोण कधी याला काडी लावील आणि कधी या जगाचा स्फोट होईल, याचा काही नेम नाही.

## तात्पर्य

या ठिकाणी अपराधी घटनांच्या काही महत्त्वाच्या पैलूंवर चर्चा करून एक ढोबळ वेध घेण्यात आला आहे. अन्यथा या शिवाय आणखीन बरेच पैलू आपल्याला दिसतील आणि बरीच कारणे व सबबी लक्षात येतील. काही कारणे सध्या रूढ झालेल्या संस्कृतीतून निर्माण होतात, तर काही व्यक्ती स्वातंत्र्याच्या नावावर तर काही लोकशाहीच्या गर्भातून आणि काही आर्थिक, मानसिक व लैंगिक कारणास्तव अपराध घडतात. एवढेच नव्हे तर काही अपराध आणखीन बऱ्याच अपराधांना जन्म देतात.

*प्रकरण तिसरे*

# अपराधांचे परिणाम

कार्य कोणतेही असो, पुण्यकर्म असो की पापकर्म असो, कार्यांचे परिणाम समोर येतात. त्यांचा खोलवर प्रभाव पडतो. या जगात कार्य व कर्म घडण्याच्या काही सबबी व कारणे असतात आणि याचे परिणामसुद्धा घडतात, हा निसर्गनियम आहे. अर्थातच मानवजीवन या परिणामांनी पूर्णपणे प्रभावित होते. शिवाय गुन्हेगारी अगर अपराधांचे परिणाम जास्तच उग्र आणि भयानक असतात. काही अपराधांचा परिणाम वैयक्तिक जीवनापर्यंत मर्यादित असतो, तर काहींचा सामाजिक, तर काहीचा सर्वच स्तरांवर व देशव्यापी आणि विश्वव्यापीसुद्धा असतो. ज्याप्रमाणे अपराधाच्या सबबी वा कारणांपासून डोळेझाक करता येत नाही, त्याचप्रमाणे यांच्या भयानक परिणामांपासूनही डोळेझाक करता येणार नाही.

आता आपण या परिणामांचा आढावा घेऊ या.

## १) समाजावर होणारे गुन्हेगारीचे परिणाम

गुन्हेगारीचा होणारा व्यक्तिगत परिणामसुद्धा निश्चितच चिंतित करणारा आहे. मात्र तिचा समाजावर जो परिणाम पडतो, तो सर्व समाजालाच वेठीस धरतो. हिचा पहिला परिणाम म्हणजे समाजातील नैतिकता काळवंडते. अनैतिक मानसिकता मूळ धरते. याच मुळातून कित्येक अपराधांची वृक्षे वाढीस लागतात आणि चोहीकडे याची पाले-मुळे विस्तारित जातात. वर्तमानकाळात ही विषारी वृक्षे इतक्या तीव्र गतीने फोफावत आहेत की कायदा आणि अपराधनिर्मूलन संस्थांच्या कुऱ्हाडी बोथट आणि कुचकामी ठरत आहेत. नैतिकता आणि मानवता हतबल झाली आहे. हे एवढ्यावर थांबलेले नसून आजची तरूण पिढी खूप तीव्रगतीने या भयानक जाळ्यात अडकत आहे आणि ही बाब तर जास्तच चिंतनीय आहे. ही दुर्दैवी अवस्थाच मुळात जागतिक शांती विनाशाच्या खोल गर्तेतेत लोटणारी आहे, असे म्हणणे चुकीचे ठरणार नाही. अमेरिकेसारख्या अतिप्रगत देशामध्ये १४ ते १७ वर्षे वयाच्या किशोरवयीन मुलांच्या हातून हत्या घडविण्याच्या घटनांत १९८५ पासून आतापर्यंत ६५ टक्क्यांनी वाढ झाली आहे आणि यामध्ये दिवसेंदिवस वाढच होत आहे. तेथे तब्बल चार कोटी मुले तारुण्याच्या उंबरठ्यावर पाऊल ठेवित आहेत. म्हणूनच न्यायव्यवस्था आणि पोलिसयंत्रणेस चिंता भेडसावत आहे की, अल्पवयातील गुहेगारींवर वेळीच आळा घातला नाही, तर पुढील काळात रक्तपात झाल्याशिवाय राहणार नाही. (संदर्भ : क़ौमी आवाज, २१ फेब्रुवारी १९९५)

रशियामध्येसुद्धा नवीन पिढीच्या हातून रक्तपात होण्याच्या घटनेत द्विगुणित वाढ झालेली आहे. त्या ठिकाणी २० टक्के तरुणपिढी गुन्हेगारी व्यवसायाशी संबंधित आहे. (संदर्भ : क़ौमी आवाज, २४ ऑगस्ट १९९५) चीनमध्ये फ़ौजदारी गुन्ह्यांमध्ये मागील एका वर्षाच्या काळात २० टक्के वाढ झाली आहे. (संदर्भ : क़ौमी आवाज, १४ मार्च

१९९५) आपल्या भारतामध्ये मागील काही वर्षांत अपराधांमध्ये ४० टक्क्यांनी वाढ झाली आहे. (संदर्भ : नामिरे हयात, लखनौ, २५ ऑक्टोबर १९९५) किशोरवयीन मुलांमध्ये फोफावणाऱ्या अपराधी-वृत्तींचे अनुमान या गोष्टीवरून लावता येईल की, केवळ पश्चिम दिल्लीमध्ये १९९३ साली ११० मुलांना अटक करण्यात आली होती, पैकी २५ जणांवर हत्या, २७ जणांवर हत्या करण्याचा प्रयत्न, २० जणांवर डकाईती आणि १४ जणांवर चोरी करण्याचा आरोप होता. (संदर्भ : क़ौमी आवाज, २१ मार्च १९९५)

अपराधांचा समाजजीवनावर होणारा दुसरा दुष्परिणाम म्हणजे सामाजिक मूल्यांचा ऱ्हास होणे होय. आज संपूर्ण समाजातच नैतिक, आर्थिक आणि सामाजिक अध:पतन होत आहे. याचा अनुभव आज सर्वत्र होत आहे. त्याग, प्रेम, बंधुभाव आणि सहकार्याची भावना म्हणजे मूर्खपणाचे लक्षण समजले जात आहे. म्हणूनच आज आत्महत्यासारख्या भयानक अपराधांत दिवसेंदिवस वाढ होत आहे. ना-ना प्रकारच्या समस्या आणि संकटांच्या जुलमी जोखडात जखडलेल्या आणि धैर्य खचून गेलेल्या माणसाला कसलाच सहारा जेव्हा मिळत नाही. त्याचे अश्रु पुसायला आणि डोक्यावर सहानुभूतीने हात फिरवायला कोणीच पुढे येत नाही, अशा प्रसंगी त्याला जीवनाचा वीट येतो आणि कधीकधी सर्वकाही भौतिक सुख-सुविधांची साधने असूनही तो कुटुंब आणि समाजाच्या सहानुभूतीपासून वंचित होतो, तेव्हा तो निश्चितच मृत्यूला कवटाळून आपली जीवनलीला समाप्त करतो. आता हे सांगायची तर मुळीच गरज नाही की, सध्या ही मानसिक, दुष्काळग्रस्त परिस्थिती सर्वत्रच पसरलेली दिसते आहे आणि औदासिन्याची ही साडेसाती दिवसेंदिवस वाढतच आहे. विशेषत: यूरोपियन देशांत आणि त्यातल्या त्यात आधुनिक संस्कृतीच्या गप्पा मारणाऱ्या ब्रिटेनसारख्या प्रगत देशात या परिस्थितीत ७१ टक्क्यांनी वाढ झाली आहे. (संदर्भ : क़ौमी आवाज, ३० ऑक्टोबर १९९५) शिवाय तंत्रज्ञानाचा झेंडा हाती घेतलेल्या जपानसारख्या देशात याचे प्रमाण सर्वांत जास्त आहे. मात्र स्वीडनची परिस्थिती यापेक्षाही भयानक आहे. भारत मात्र दुसऱ्या क्रमांकावर आहे. आपल्या भारतातही दरवर्षी ८० हजार जण आत्महत्या करतात. (संदर्भ : क़ौमी आवाज, २ नोव्हेंबर १९९५) सामाजिक शास्त्रज्ञांच्या मतानुसार याचे प्रमुख कारण स्वार्थ, अप्पलपोटेपणा आणि निष्ठूरता होय.

## जीवित व वित्तीय हानी

मागील पृष्ठांवर अपराधांविषयी जो लेखाजोखा सादर करण्यात आला आहे, त्यावरून अनुमान लावता येते की, यामुळे किती मोठ्या प्रमाणात जीवित आणि वित्तीय हानी होत आहे. पूर्ण जगात दरवर्षी लाखोंची हत्या होत आहे. लैंगिक शोषण आणि बलात्कारासारख्या लाखो घटना घडत आहेत. चोऱ्या-माऱ्या, दरोडे आणि लूटमार वगैरेंसारख्या अपराधांमुळे जे नुकसान उचलावे लागत आहे आणि जे भोग भोगावे लागत

आहेत, त्याचे अनुमान करणे तर शक्यच नाही. मात्र हेसुद्धा समजून चालणार नाही की, जेवढी आकडेवारी आणि सर्वेक्षणांचा वृत्तान्त समोर येत आहे, तेवढेच अपराध घडत आहेत. तर परिस्थितीने अत्यंत गंभीर आणि धोक्याची खूण ओलांडलेली आहे. एवढेच नव्हे तर लैंगिक अपराधांचे परिणाम तर इतके भयानक आहेत की, यामुळे दरवर्षी कोट्यवधी लोकांना प्राणास मुकावे लागते. लैंगिक अपराधामुळे अत्यंत भयानक रोगांना बळी पडून दरवर्षी कितीतरी कोटी लोक मृत्यूच्या आहारी जात आहेत. 'जागतिक आरोग्य संस्थेच्या एका सर्वेक्षणात म्हटले आहे की, १९९५ च्या सरतेशेवटी पूर्ण जगामध्ये कोणत्याही उपचाराने बऱ्या न होणाऱ्या आजारांच्या प्रादूर्भावाने ग्रस्त झालेल्या लोकांची संख्या ३३ कोटी २० लाखाच्या घरात जाईल. या आजारांमध्ये प्रामुख्याने एड्स आणि सूजाकसारख्या महारोगांचा समावेश आहे. अर्थातच स्वैर लैंगिक संबंधांचा हा प्रताप होय.' (संदर्भ : क़ौमी आवाज, २७ ऑगस्ट १९९५) पूर्ण जगामध्ये सिगारेट ओढल्याने दरवर्षी ४० लाख लोकांचा मृत्यु होतो. मृत्यू पावणाऱ्यांमध्ये निम्मी संख्या तरुणांची आहे.

(संदर्भ : क़ौमी आवाज, २४ एप्रिल १९९५)

विसाव्या शतकात झालेल्या दोन प्रलयंकारी महायुद्धांत आठ कोटी लोकांचा बळी गेला, ४० लाख लोकांना अपंगत्व आले. (संदर्भ : लेनीनची कथा, सोविएत यूनियन) ५० हजार आश्रित आणि एक कोटी २० लाख लोक मुळांपासून उखडले. शिवाय या मृत्यूमुखी पडणाऱ्यांमध्ये शिपाई असून सामान्यजन वेगळे आहेत.

(संदर्भ : क़ौमी आवाज, १८ एप्रिल १९९५)

राहिला प्रश्न वित्तहानीचा, तर हीसुद्धा काही कमी चिंतेची बाब नाही. अमेरिकेत घडणाऱ्या अपराधांमुळे दरवर्षी ४५०० कोटी डॉलर्सची वित्तहानी होते. (संदर्भ : क़ौमी आवाज, २३ एप्रिल १९९५) ब्रिटेनमध्ये घडणाऱ्या अपराधांमुळे होणारे नुकसान दरवर्षी २० अब्ज ४० कोटी पौंड इतके आहे. (संदर्भ : क़ौमी आवाज २६ मार्च, १९९५) पाकिस्तानातील कराची शहरात वांशिक चकमकी आणि हिंसाचारात प्रत्येक दिवशी २०० कोटीचे नुकसान झाले होते. (संदर्भ : क़ौमी आवाज, २२ जून १९९५) मादक द्रव्य सेवन केल्यामुळे रोगास बळी पडलेल्यांच्या उपचारांवर दरवर्षी २२०० कोटी रुपयांचा खर्च येतो. (संदर्भ : क़ौमी आवाज, २८ मे १९९५) विसाव्या शतकात झालेल्या दोन जागतिक युद्धांमध्ये ४० हजार मिलियन डॉलर्सपेक्षाही जास्त रक्कम खर्च करण्यात आली. एवढ्या खर्चामध्ये समस्त जगातील लोकांना ५० वर्षांपर्यंत मोफत भाजी-भाकरीची व्यवस्था होते, शिवाय ५० कोटी परिवारांसाठी चांगल्या प्रतीची निवासस्थाने तयार केली जाऊ शकतात. (संदर्भ : लेनीनची कथा-सोवियेत संघ) ईराण-इराकच्या दहा वर्षे सुरु असलेल्या युद्धात फक्त ईराणच्या वाट्याला आलेले नुकसान हे

दहा खर्व डॉलर्स एवढे होय. म्हणजेच इतकी रक्कम मिळविण्यासाठी ८० वर्षे तैलीय संपत्तीतून उत्पन्न काढावे लागेल. (संदर्भ : क़ौमी आवाज,. २४ मे १९९५) पूर्ण जगामध्ये दरवर्षी १०० मिलियन डॉलर्स एवढा खर्च लष्करी सामर्थ्यावर करावा लागतो. (संदर्भ : इंडियन एक्सप्रेस, ६ ऑगस्ट १९९१) शिवाय शस्त्रनिर्मितीवर येणारा खर्च वेगळा. याव्यतिरिक्त संपूर्ण जगामध्ये अपराधी कर्म रोखण्यासाठी न्यायसंस्था, पोलिस यंत्रणा, कारागृहे वगैरेसाठी येणारा खर्च पाहिला तर ही बाब स्पष्ट होते की, अपराधांमुळे होणाऱ्या व भोगाव्या लागणाऱ्या वित्तहानीची किती मोठी किंमत चुकवावी लागत आहे.

## मानसिक परिणाम

जीवित, वित्तीय आणि सामाजिक हानीबरोबरच अपराधी वृत्तींमुळे मानसिक अरिष्टांचे भोगसुद्धा भोगावे लागत आहेत. हे भोग कर्ता आणि कर्म दोघांनाही भोगावे तर लागतातच, शिवाय सामान्य माणसांनाही भोगावे लागतात. उदाहरणार्थ, ब्रिटेनची अवस्था अशी आहे की, तेथील घराबाहेर पडणाऱ्या दहा जणांपैकी नऊ लोक घराबाहेर निघताना घाबरतात. त्यांना कोणाच्या तरी आक्रमनाचे भय असते. म्हणून तेथील दर पाचजणांपैकी एक जण घराबाहेर पडताना कसाबसा आपल्या प्राणाच्या रक्षणाचा बंदोबस्त करूनच बाहेर पडतो. एका सर्वेक्षणाच्या अहवालानुसार, ब्रिटेनची स्थितीसुद्धा अमेरिकेसारखीच होत आहे, जेथे बऱ्याच शहरांचे काही भाग रहदारीसाठी सुरक्षित नाहीत. म्हणून तेथून कोणी ये-जा करीत नाही. (संदर्भ : क़ौमी आवाज, ८ ऑक्टोबर १९९५) ही विदारक परिस्थिती केवळ अमेरिका आणि ब्रिटेनचीच नसून सर्वच ठिकाणी दिसून येते आणि म्हणूनच आज असंख्य लोकांच्या मनात भीतींचे काहूर माजलेले आहे.

आणखीन महत्त्वाची बाब अशी की, अपराधी कर्मांच्या भयानक सावटामुळे लहान मुलांच्या मानसिकतेवर खूप विपरित परिणाम होताहेत. शिवाय ते खेळण्यात व बागडण्यातसुद्धा अपराध, अतिरेक आणि अपायकारक वस्तुंच्या खेळण्यांचा वापर करताना दिसतात. हेच कारण आहे की, ते बाहुल्या, आगगाडी आणि विमानांसारख्या खेळण्यांऐवजी बंदूक, पिस्तूलसारखी खेळणीच जास्त पसंत करीत आहेत. मागील काही वर्षांपूर्वी उद्भवलेल्या राजकीय धुमश्चक्रीनंतर कराची या शहरात अपहरण लूटमार, गोळीबार, रक्तपात, बलात्कार वगैरेंसारखे भयंकर अपराध घडले. परिणामी तेथील मुलेसुद्धा पिस्तूल, बंदूक वगैरेंचीच खेळणी जास्त पसंत करीत आहेत. त्याचप्रमाणे अपराधी घटनांचा परिणाम हा केवळ लहान मुलांवरच नव्हे तर समाजाच्या प्रत्येक आबालवृद्ध सदस्यावर होत आहे. वर दिलेल्या सर्वेक्षण अहवालांपेक्षा कितीतरी जास्त पटीने लोकांची मानसिकता अपराधाच्या दुष्परिणामांमुळे दूषित होत आहे. बरेचजण मानसिक रोगांना बळी पडत आहेत. असंख्य लोक आपली बुद्धी आणि विवेक हरवून बसले आहेत. जीवनाचे प्रत्येक क्षेत्र प्रभावित झालेले आहे. या स्फोटक परिस्थितीवर वेळीच आळा घातला गेला नाही तर पूर्ण मानवताच विनाशाच्या खोल गर्तेत पडलीच समजावी.

## प्रकरण चौथे

# गुन्हेगारीचे निर्मूलन

## वर्तमान कायद्यांचे अपयश

मानव इतिहासात गुन्हेगारी कधीच कोणी पसंत केली नाही. म्हणूनच गुन्हेगारी निर्मूलनाचे विभिन्न पातळीवर प्रयत्न करण्यात आले. अपराधी कर्मांना आळा घालविण्यासाठी विविध कायदे करण्यात आले. यासाठी पोलिस, गुप्त तपास वगैरेसारखी खाती निर्माण करण्यात आली. राष्ट्रीय संपत्ती खर्च करण्यात आली. अपराधीवृत्तींविरुद्ध जनजागृती करण्यात आली. अपराधांमुळे भोगावे लागणारे दुष्परिणाम आणि उद्भवणारी संकटे जगासमोर मांडण्यात आली. यासाठी प्रसारमाध्यमांचा जास्तीतजास्त वापर करण्यात आला. आजही गुन्हेगारी निर्मूलनासाठी जीवापाड कष्ट घेण्यात येत आहेत. विचारवंत, साहित्यिक, कवि, कायदेपंडित, राज्यकर्ते, वैज्ञानिक, समाजसुधारक वगैरे सर्वांनाच वाटते की ही शांती आणि समाधानास आसूसलेली मानवता गुन्हेगारीच्या क्रूर विळख्यातून मुक्त व्हावी. यासाठी ना-ना तऱ्हेचे प्रयत्न होत आहेत. मात्र सगळ्यांच्याच नशिबी दुर्भाग्यपूर्ण अपयश आलेले, सर्वच हतबल झालेले आणि सगळीकडे नैराश्य व उदासीनतेचे काळेकुट्ट सावट पसरलेले. गुन्हेगारी सतत आपला विळखा घट्टच करीत गेली. शेवटी असे का? प्रत्येक पावलावर दुर्भाग्यपूर्ण अपयश आले, याची नेमकी कारणे काय आहेत? याचा आपण आता वेध घेणार आहोत.

## अपयशाची कारणे

अपराधांमध्ये दरदिवशी वरच्यावर होत असलेल्या वृद्धीची कारणे आपण मागील पानांवर पाहिलीच आहेत. आता आपण गुन्हेगारी निर्मूलनात कायदे आणि प्रयत्न अपयशी का ठरले, याविषयी चर्चा करु या. या कायद्यांमध्ये पाच मौलिक त्रुट्या आढळतात, त्या निम्नलिखित आहेत.

१) कायद्यालाच गुन्हेगारी निर्मूलनाचे परिपूर्ण माध्यम समजण्यात आले आहे. खरे पाहता कायदा हा केवळ अतिरिक्त दर्जाची बाब आहे. गुन्हेगारी निर्मूलनासाठी सर्वांत मौलिक बाब ही नैतिक आणि आध्यात्मिक प्रशिक्षण होय. मात्र या मौलिक बाबींविषयी केवळ डोळेझाकच होत नसून त्यांना मुळी महत्त्वच दिले जात नाही.

२) वर्तमान कायद्यामध्ये गुन्हेगारीची चुकीची कल्पना आढळते. त्याचप्रमाणे ते लागू करण्यात न्यायपूर्ण भूमिका निभावण्यात येत नाही.

३) गुन्हेगारांविषयी सहानुभूतीची चुकीची कल्पना ठरविण्यात आली. यामुळे समाजात गुन्हेगारीला आळा बसण्याऐवजी प्रोत्साहन मिळते आणि त्यामुळे न्याय होत नाही.

४) सामुदायिक आणि सामाजिक जवाबदारीची जाणीव नष्ट झाली आणि स्वार्थ व अप्पलपोटेपणाचा प्रभाव वाढलेला आहे.

५) कायद्यामध्येच असंख्य त्रुट्या आहेत. म्हणजेच जर कायदाच त्रुटीपूर्ण असेल आणि तो सुधारणेकरिता आसुसलेला असेल तर तो इतरांत सुधारणा कशी करेल.

याच त्या मौलिक त्रुट्या आहेत, ज्यामुळे गुन्हेगारीचे निर्मूलन शक्य नाही. खालील मजकुरात या विषयावर सविस्तर चर्चा करण्यात येईल.

## कायद्याचे स्थान व व्याख्या

कायदा म्हणजे काय? तर समुदाय अगर समाजामध्ये आपसांतील अधिकार व कर्तव्यांच्या आधारावर तयार करण्यात आलेल्या नियमांना 'कायदा' असे म्हणतात. समुदाय अगर समाजच परिस्थिती व विविध गरजांपोटी नियम अथवा कायदा तयार करतो. शिवाय बदलत्या परिस्थितीनुसार वेळोवेळी त्यात बदलसुद्धा करता येतो.

## कायद्याचे महत्त्व आणि गरज

कायदा हा निश्चितच एक सामाजिक आणि सामुदायिक गरज आहे. कायद्याशिवाय कोणतेही राज्य अगर देश शांती-समाधानाने राहू शकत नाही. ज्या राज्यात कायदा आणि सुव्यस्थेची नग्न धिंड काढण्यात येते, त्या ठिकाणी उपद्रव आणि अशांतीचे भयानक वादळ माजलेले असते. तेथील समाजातील लोक एक-दुसऱ्यांचे लचके तोडतात. माणूस हा माणूस राहत नसून एखादा श्वापद आणि हिंस्त्र पशु बनतो. मात्र हे वास्तवसुद्धा नाकारता येत नाही की, केवळ कायद्याच्या आधारावर समाज हा गुन्हेगारीपासून मुक्त होऊ शकत नाही आणि गुन्हेगारीमुक्त समाजाची उभारणी करण्याची कल्पना करणेसुद्धा मूर्खपणाचे लक्षण ठरते. कारण कायदा हा केवळ नियम लागू करतो. तो मानवी भावना आणि आवडी-निवडीचा मुळीच विचार करीत नाही. मात्र परिस्थिती अशी आहे की, मानवास स्वाभाविकरित्या आपल्या भावना आणि आवडी-निवडी जोपासण्याची नितांत आवश्यकता असते.

## मानवस्वभाव आणि कायदा

माणूस हा शेवटी माणूसच आहे. त्याला भावना आहेत, आवडी-निवडी आहेत. त्याला विविध इच्छा-आकांक्षा आणि कामनांनी भरलेले अंत:करण आहे. तो काही एखादे निष्प्राण आणि निर्जीव यंत्र नाही. की चाबी भरलेले निर्जीव बाहुले नाही, जे मोजक्या

नियमांत जखडण्यात येऊ शकावे. माणसांमध्ये आपल्यावर लादण्यात आलेल्या कायदे-नियमांच्या मर्यादांपुढेही बरेच मोठे विश्व सामावलेले आहे. आशा-निराशा, आनंद-दु:ख, भय, भूक, तृष्णा, झोप, रोग, प्रेम, ममत्व, द्वेश, हेवा, मत्सर, राग, वैर आणि अशा ना-ना स्वभावगुणधर्मांचा तो पुतळा आहे. माणूस जेव्हा एखादे कर्म (मग चांगले असो वा वाईट असो) करतो तेव्हा या समस्त गुणधर्मांनी प्रभावित झालेला असतो. केवळ कायद्याच्या अधीन राहून तो कोणतेही कार्य अगर कर्म करू शकत नाही. कारण माणूस हा एखादे भावनाशून्य यंत्र किंवा मशीन मुळीच नाही. त्याला जे आवडते ते तो स्वीकारतो आणि जे आवडत नाही ते झुगारून देतो. त्याच्या आवडी-निवडीवर कायद्याची बंधने लादल्यास एखाद्या स्वैर खोंडास वेसण घातल्यासारखी त्याची अवस्था होते. एखाद्यावेळी त्याचा अहं दुखावल्यास तो बंडाळीसुद्धा करतो आणि परिणामी संपूर्ण समाज त्याच्या उपद्रवास बळी पडतो. कधीकधी त्यास आपले स्वातंत्र्य हिरावून घेतल्याची व आपल्यावर अन्याय झाल्याची भावना निर्माण होते आणि सगळी मानवताच या दुष्परिणामास बळी पडते. त्यामुळे ही बाब निश्चितच दाहीदिशा सत्य आहे की, केवळ कायदा आणि नियम हे गुन्हेगारी निर्मूलनाचे मुळीच साधन नव्हे. कारण कायद्याला भावनाच नसतात. तेथे केवळ नियम लागू करणेच असते आणि तेही अशाप्रसंगी की जेव्हा त्याच्या हातून गुन्हा घडून जातो. वस्तुत: एखादा गुन्हा घडण्यापूर्वीच जर कायद्याने असे काम केले असते की गुन्हाच घडू नये, तर निश्चितच कायद्याला प्रथम स्थान दिले गेले असते. मात्र असेही मुळीच नसून यासाठी एक उपाय मात्र आहे आणि तो म्हणजे माणसाचे नैतिक प्रशिक्षण होय. यामुळे त्यास निश्चितच आपल्या मनावर आणि इंद्रियांवर ताबा मिळविणे शक्य होईल आणि गुन्हेगारीचे निर्मूलन होण्यास खूप मदत मिळेल. याविषयी आपण खाली सविस्तर चर्चा करणार आहोत.

## कायदा आणि नैतिकता

नैतिकतेमुळे अपराध थांबविता येऊ शकतात. कारण नैतिक प्रशिक्षणामुळेच माणसात अपराध आणि गुन्हेगारीविषयी घृणा निर्माण होते. सत्य-असत्य, न्याय-अन्याय, बरे-वाईट व यासारख्या सर्व बाबींची विवेकपूर्ण जाण निर्माण होते आणि यामुळेच माणूस हा मानवतेच्या उच्च स्थानावर विराजमान होतो. नैतिकता ही त्याच्या बाह्य शरीरावर नव्हे तर आंतरमनावर प्रहार करते. कारण माणसाचे आंतरमन हेच जणू त्याच्या भावना आणि स्वभावगुणधर्माचे केंद्रबिंदू असते. अशा रीतीने नैतिकता ही त्याच्या स्वभावगुणधर्मास योग्य वळण लावते. नैतिकतेमुळेच त्याचे आंतरमन दुर्गुण

आणि अपराधी वृत्तीपासून दूर राहण्यास त्याला प्रेरित करते. म्हणजेच ही आंतरिक प्रेरणाशक्तीचे मूळ स्त्रोत आहे. इस्लामचे थोर विचारवंत माननीय सय्यद सुलैमान नदवी यांनी या विषयावर सविस्तर चर्चा करताना लिहिले आहे की,

"माणसामाणसांतील अधिकार आणि कर्तव्यपूर्तीची बंधने म्हणजेच नैतिकता होय आणि ही बंधने पाळणे प्रत्येकासाठी आवश्यक होय. मानव जेव्हा या जगात डोळे उघडतो, तेव्हा जगातील प्रत्येकाशी त्याचा काही ना काही संबंध येतो. हेच संबंध कर्तव्य समजून यथायोग्य जोपासणे म्हणजेच नैतिकता होय. जगात आल्यावर माता-पिता, नातेवाईक, स्नेहसंबंधी, मित्रमंडळी आणि सर्वचजणांशी त्याचा संबंध येतो. तरुण झाल्यावर बायको, सासू-सासरा आणि सासरवाडीच्या सर्वचजणांशी, नोकरी-व्यवसायात इतर सर्वांशीच, गल्लीत आणि राज्य पातळीवरील लोकांशी आणि सर्व समाजाशी तसेच पूर्ण देशवासीयांशी व याहीपुढे जगातील सर्वच लोकांशी त्याचा संबंध असतो. एवढेच नव्हे तर अगदी पशु-पक्षीसुद्धा त्याच्याशी संबंधित असतात. या संबंधांमुळेच त्याच्यावर काही कर्तव्याची पूर्तता करणे अगर हितसंबंध जोपासण्याची आवश्यक जवाबदारी असते.

याच नैतिकतेमुळे जगातील कोणत्याही गोष्टीचा रसास्वाद घेणे आणि शांती व समाधान प्राप्त करणे त्याला शक्य होत असते आणि ही नैतिकताच जर नसेल तर मात्र शासन, कायदा आणि नियम त्यास या कर्तव्यपूर्ततेकरिता बाध्य करतात. जर समाजातील अगर देशातील लोक स्वतःहूनच आंतरिक प्रेरणेने प्रेरित होऊन नैतिक कर्तव्याची पूर्तता करतील तर शासनाला कठोर कायदे लागू करण्याची गरजच पडणार नाही, एवढे मात्र निश्चित." (संदर्भ : सीरतुन नबी - उर्दू, सहावा खंड)

मात्र आज ही नैतिकप्रेरणा निर्माण करण्याऐवजी गुन्हेगारीचे उच्चाटन करण्यासाठी सगळा जोर केवळ कायद्यावरच देण्यात येत आहे. नैतिकतेला आणि नैतिक मूल्यांना महत्त्व देण्याऐवजी उलट नैतिक मूल्ये पायदळी तुडविण्याचे स्वातंत्र्य देण्यात येत आहे. उदाहरणार्थ, व्यभिचार, बलात्कार, चोरी वगैरेसारखे कर्म कायद्यानुसार गुन्हा ठरविण्यात आले खरे, मात्र दुसरीकडे अश्लीलता आणि स्वैराचाराच्या सगळ्या वाटा मोकळ्या करण्यात आल्या आहेत. चोरी आणि यासारख्या अपराधासाठी परिस्थिती अनुकूल ठेवण्यात आली आहे. माणूस हा घरामध्ये उत्तेजक आणि अश्लील दृष्ये पाहतो आणि घराबाहेर पडल्यावरसुद्धा त्याला त्याच बाबी दिसतात, ज्यामुळे त्याच्या भावना आणखीनच उत्तेजित होतात. मग माणूस आपल्या भावनांवर कसा ताबा ठेवू शकतो? परिणामी आपल्या वासनांच्या भडकत्या ज्वाला विझविण्यासाठी तो बेकायदेशीर आणि अवैध मार्गाचा अवलंब करतो. याचप्रमाणे जेव्हा समाजात चोहीकडे ओढाताण, अरेरावी

व अप्पलपोटेपणासारख्या गोष्टींचे काहूर माजलेले असेल, तेव्हा तो या प्रदूषित वातावरणामुळे दूषित होतो. तसेच खून, हत्या, रक्तपात आणि जाळपोळीसारख्या दुष्कर्मांमुळेसुद्धा इतरांचे अधिकार हिरावण्यात येतात. या सर्व बाबींमुळे हे स्पष्ट होते की, केवळ कायद्यावर अवलंबून गुन्हेगारीचे उच्चाटन करणे शक्यच नाही, तर यासाठी माणसाला नैतिक प्रशिक्षणाचीसुद्धा नितांत गरज आहे.

## कायद्याचे मर्यादित स्वरूप

सर्वसाधारणपणे चोरी, खून, अपहरण, बलात्कार वगैरेसारखे दुष्कर्म हे गुन्हे समजले जातात. मात्र अपराधांचा खोलवर आढावा घेतल्यास हे स्पष्ट होते की, मूळ अपराध कोणता आहे? चोरी, डकाईती, अपहरण, हत्या वा बलात्कार आणि यासारखे सर्वच दुष्कर्म हे अपराधांचे बाह्यस्वरूप असून मूळ अपराध हे शोषण वा पिळवणूक आणि इतरांच्या कष्टाची चोरी करणे होय. यासारखे घोर आणि भयानक अपराध कोण करतो? तर सामान्य गुन्हेगार नव्हे तर मोठमोठे गब्बर भांडवलदार, जागीरदार, उद्योगपती, राजकारणी, शासकवर्ग आणि मोठमोठे अधिकारी हे घोर अपराध उघडपणे व बिनधास्त करतात. मात्र यांना कोणी अपराधी व गुन्हेगार ठरवित नाही. याचा स्पष्ट अर्थ असा की कायदा हा मर्यादित स्वरूपाचा आहे. या कायद्यात गुन्हेगारीची परिपूर्ण व्याख्या समाविष्ट नाही. म्हणजे हा मानवनिर्मित आणि तथाकथित कायदा अपराध अगर गुन्हेगारीचे खरे स्वरूप आणि मूळ स्वभाव समजू शकला नाही आणि म्हणून गुन्हेगारीनिर्मूलनाचे सामर्थ्य असण्याचा दावा हा वर्तमान कायदा करूच शकत नाही.

## अपराध आणि शिक्षेची त्रुटीपूर्ण कल्पना

वर्तमान कायदा हा पूर्णतः बड्या मंडळी, आर्थिक बळ आणि शासकवर्गाचे हित जोपासणारा व त्यांच्या इच्छा-आकांक्षाना प्रथम महत्त्व देणारा आहे. अर्थात अशा तथाकथित कायद्यास नैतिकतेशी काहीही घेणे-देणे नाही. कोण्या सामान्यजनाच्या हिताशी काहीच घेणे देणे नाही. याच कारणामुळे वर्तमान कायद्यात अपराधाच्या मूळ कल्पनेचा अभाव आहे. उदाहरणार्थ, अवैध लैंगिक संबंध अर्थातच व्यभिचार हा अशा परिस्थितीत कायद्यानुसार गुन्हा ठरत नाही, जेव्हा दोन्ही पक्ष राजी-मर्जीने विवाहबाह्य लैंगिक संबंध प्रस्थापित करीत असतील. मग वर्तमान कायद्याला या गोष्टीशी काहीच देणे घेणे नसते की, या विवाहबाह्य लैंगिक संबंधामुळे समाजजीवनावर किती वाईट आणि विपरित परिणाम पडतो, इतरजणांना याचे किती वाईट परिणाम भोगावे लागतात, यामुळे किती

भयानक स्वरूपाचे आर्थिक, मानसिक व नैतिक समस्या उद्भवतात. वर्तमान कायदा विवाहबाह्य लैंगिक संबंधांना गुन्हा केवळ अशाच परिस्थितीत ठरवतो, जेव्हा दोन्ही पक्षांपैकी एकाच पक्षाच्या मर्जीने हे कर्म घडते. याचप्रमाणे मद्यपानही एक वैयक्तिक बाब समजण्यात येते आणि व्यक्तीच्या वैयक्तिक स्वातंत्र्यावर घाला घालणेसुद्धा कायद्यानुसार अपराध समजला जातो. म्हणजेच दारु पिणे हा कायद्यानुसार अपराध ठरत नाही आणि ही त्याची वैयक्तिक बाब आहे व त्याच्या या (दारु पिण्याच्या) वैयक्तिक स्वातंत्र्यात नाक खुपसणे हा कायद्यानुसार गुन्हा होय. मात्र कायद्याला या गोष्टीशी काही घेणे-देणे नाही की, दारुच्या तंद्रीत तो किती जणांच्या नैतिक अधिकारांची राखरांगोळी करील, कोणाचा बलात्कार करील, कोणाचा खून करील की कोणाच्या खिशावर डल्ला मारील की आत्महत्या करील. कायद्याजवळ हे सर्वकाही बुरसट लाड थांबविण्यासाठी कोणतेच दंडविधान नाही. अर्थातच गरिबांनी कायदेशीर दारू पिऊन आपल्या संसाराची राखरांगोळी करायची आणि दारू विक्रेत्यापासून ते दारू उत्पादकांपर्यंतच्या मोठमोठ्या भांडवलदाराच्या हितांचे रक्षण करायचे, गरिबांनी आपल्या घामाच्या कमाईतून मिळविलेल्या दोन पैशांत बायको मुलांच्या पोटाची आग भागविण्याऐवजी त्यांच्या तोंडातला घास काढून दारू उत्पादकाच्या तिजोरीत टाकायचा. त्याला दिवसेंदिवस गब्बर करायचे. म्हणजेच कायदा हा जनसामान्यांचे हित जोपासण्याऐवजी मोठमोठ्या भांडवलदारांचेच हित जोपासणारा आहे आणि हेच मूळ कारण आहे की, या कायद्यामध्ये गुन्हेगारीचे उच्चाटन करण्याचे मुळीच सामर्थ्य नाही.

## कायदा लागू करण्यात चाल ढकल करणे

कायदा जसा आणि ज्या स्वरूपात अस्तित्वात आहे, त्या स्वरुपात जरी न्यायपूर्ण रीतीने लागू करण्यात आला, तर अपराधांवर आळा बसण्याची काही अशी शक्यता आहे. मात्र एकतर स्वत: कायदाच अपरिपूर्ण आणि सामर्थ्यशून्य व त्यातल्या त्यात दुसरे दुर्दैव असे की, हा लागू करण्यातसुद्धा न्याय होत नाही. केवळ अन्याय व अप्रामाणिकताच नव्हे तर काही-बाही कारणे दाखवून तो लागूच करण्यात येत नाही. कारण यामुळे बड्या मंडळीच्या अगर शासकवर्ग किंवा भांडवलदार वर्गाच्या हितांवर प्रहार होत असतो. याशिवाय राजकीय दबावासुद्धा हा कायदा बळी पडतो. एवढेच नव्हे तर पैसा आणि सामर्थ्य किंवा शासकीय पाठबळ असेल तर इतर वस्तुंप्रमाणेच कायदासुद्धा खरेदी करता येतो, न्याय खरेदी करता येतो. अशी ही कायद्याची अत्यंत दुर्बल आणि शोचनीय व दयनीय अवस्था होय.

आज न्यायालयात गेल्यावर तेथे प्रकरण लढत असलेल्या एखाद्या नव्वद वर्षीय वृद्धास जाऊन विचारा की, बाबा! तुम्ही किती वर्षांपासून तुमची केस लढत आहात. तर तो तुम्हास थरथरत्या आवाजात आणि करपलेल्या डोळ्यांत पाणी आणून, निराश अंत:करणाने उत्तर देईल की ही केस माझ्या बालपणात माझे वडील लढत होते आणि ते वारल्यावर आता मी लढत आहे. दोन पक्षांत चालणाऱ्या न्यायालयातील प्रकरणात न्यायनिवाडा बड्या पार्टीच्या झोळीत जातो आणि गरीब मात्र न्यायालयाच्या जन्मभर चकराच मारत असतो. अर्थात न्यायालयातही भ्रष्टाचार फोफावलेला आहे. कायद्याच्या जोखडापासून मुक्त राहण्यासाठी सामान्यत: पैसा खर्च करून मोठ्या वकिलांमार्फत खोट्याला खरे आणि खऱ्याला खोटे ठरविण्याची किमया करण्याचे कसब दाखविणाऱ्यास शहाणा आणि यशस्वी समजले जाते.

कायदा लागू करताना वर्ण, वंश आणि धर्म व जात-पातसुद्धा अडवी येते. उदाहरणार्थ, 'एन्मेस्टी इन्टरनॅशनल' च्या सर्वेक्षणात म्हटले गेले आहे की, अमेरिकेसारख्या पुढारलेल्या देशात देहदंडाची शिक्षा सर्वांत जास्त गरीब आणि अल्पसंख्याक, मानसिक दुर्बल आणि कायद्याची मदत घेण्यास अपात्र असलेल्या लोकांना मिळते. न्यायदानामध्ये वर्ण-वंशाच्या आधारावर भेदभावसुद्धा करण्यात येतो. १९७७ साली ज्या कैद्यांना देहदंडाची शिक्षा देण्यात आली, त्यात जवळपास ८४ टक्के लोक गौरवर्णीयांच्या हत्येस जवाबदार असणारे लोक होते आणि वस्तुस्थिती अशी होती की, हत्या झालेल्यांपैकी निम्म्यापेक्षा जास्त लोक कृष्णवर्णीय होते. हे मृत्यू पावलेले कृष्णवर्णीय गौरवर्णीयांच्या अन्याय व अत्याचारास बळी पडून मृत्यू पावलेले होते. मात्र गौरवर्णी यांना कृष्णवर्णीयांच्या हत्या करण्याच्या अपराधास्तव मृत्यूची शिक्षा मिळाली नाही. (संदर्भ : क़ौमी आवाज, २४ मार्च १९९५) वर्ण, वंश, धर्म आणि जातीपातीच्या आधारे होणारा अन्याय केवळ अमेरिकेतच नव्हे तर सर्वत्रच आहे.

## गुन्हेगाराप्रती सहानुभूतीची अफलातून कल्पना

गुन्हेगारी निर्मूलनात वर्तमान कायद्याच्या अपयशाचे एक मोठे कारण हेसुद्धा आहे की, गुन्हेगारासंबंधी सहानुभूतीची चुकीची, विचित्र आणि विलक्षण कल्पना समोर आणली गेली. ही कल्पना अशी की, गुन्हेगार हा गुन्हेगार असूनसुद्धा सहानुभूतीस पात्र आहे, म्हणून त्यास शक्य होईल तेवढी कमी शिक्षा देण्यात यावी. मानवाधिकाराच्या या पुळचट आणि नेभळट कल्पनेच्या आधारावर हा विचित्र सिद्धान्त सादर करण्यात येत

आहे. हा सिद्धान्त, असा आहे की, काही असले तरी माणसाला काही ठराविक अधिकार प्राप्त आहेत, जे कोणत्याही परिस्थितीत हिसकावले जाऊ शकत नाहीत. म्हणून ज़र एखाद्याने जेवढ्या लोकांचा जीवंत राहण्याचा अधिकार हिरावून घेतला असेल, त्याला मृत्यूदंड देता येऊ शकत नाही. अशा सिद्धान्तामुळे गुन्हेगारी निर्मूलन होण्याची आशा तर ठेवता येत नाही, उलट गुन्हे आणि अपराधांवर अपराध करण्याची उघड संधी प्राप्त होते.

## सामाजिक जवाबदारीचा ऱ्हास

केवळ जोर-जबरदस्ती आणि बळाचा वापर करून व न्यायिक कार्यवाही करून कायदा लागू करणे कधीच शक्य नसते, तर यासाठी सामुदायिक विवेक आणि सामाजिक जवाबदाऱ्यांची पुरती जाणीव असावी लागते. एखाद्या माणसाला अपराध करण्याची सवलत आणि साधनसामुग्री असून तो केवळ एवढ्या कारणास्तव स्वत:ला अपराध करण्यापासून रोखू शकत नाही की, त्याला एखाद्या कडक कायद्याला सामोरे जावे लागणार आहे. तर त्याच्यात जेव्हा गुन्हेगारीविषयी घृणा निर्माण होईल अगर या गोष्टीची जाणीव होईल की, मी जर गुन्हा केला तर याचे समाजावर भयंकर, दुष्परिणाम होतील, तेव्हाच तो सर्व संधी आणि साधने असूनही गुन्हेगारीपासून स्वत:ला रोखू शकतो. दुसरी गोष्ट अशी की, जवाबदारीची जाणीव केवळ एखाद्या व्यक्तीस असून चालत नाही तर जोपर्यंत सामुदायिक स्तरावर ही जाणीव निर्माण होत नाही, तोपर्यंत गुन्हेगारीचे निर्मूलन होणे शक्य नाही. एखादी व्यक्ती आपल्या जागेवर कितीही प्रामाणिक आणि धर्मपरायण असली आणि इतर सगळा समाजच गुन्हेगारीत बरबटलेला असेल, तर या एकुलत्या एक व्यक्तीच्या सदाचार आणि धर्मपरायणतेचा काहीच परिणाम होत नाही. म्हणून यासाठी सामुदायिक सुधारणेची आणि गुन्हेगारी निर्मूलनाची सामुदायिकरित्या जनजागृतीची चळवळ उभी करणे आवश्यक असते. वर्तमानकाळात तर स्वत: व्यक्तीमध्येसुद्धा सामूहिक जवाबदारीची जाणीव नाही, तर दुसरीकडे सगळा समाजच गुन्हेगारीच्या घृणास्पद गर्ततेत बरबटला आहे. व्यक्ती आपला छोटासा स्वार्थ साधून घेण्यासाठी आज संपूर्ण समाजालाच नव्हे तर संपूर्ण देशाला वेठीस धरीत आहे. आपल्या स्वार्थाची पोळी भाजण्यासाठी सगळा समाज आणि सगळा देश चुलीत का जात नाही, त्याला याच्याशी काहीच घेणेदेणे नाही आणि समाजालासुद्धा एखाद्या व्यक्तीच्या गुन्हेगारीशी काहीच घेणे देणे नाही. अशा शोचनीय आणि दयनीय अवस्थेत केवळ काही बोटांवर मोजता येणारे कायदे गुन्हेगारी निर्मूलनाच्या कार्यात काय दिवा लावतील.

## त्रुटीपूर्ण दंडविधान

गुन्हेगारी निर्मूलनात येणारी आणखीन एक मोठी अडचण अशी की, स्वतः कायद्यामध्येच असंख्य त्रुट्या आहेत. म्हणजेच वर्तमान कायदा हा परिपूर्ण कायदा नाही. उदाहरणार्थ, वर्तमानकाळात प्रत्येक अपराधाची शिक्षा ही कैद वा तुरुंगवासाच्या स्वरुपात देण्यात येते. गुन्हेगार हा खुनी असो, चोर असो, बलात्कारी असो की मादक पदार्थ-विक्रेता असो, अगर भुरटा चोर असो, गुन्हा घडला की त्याला जेलमध्ये टाकण्यात येते. एवढे मात्र निश्चित की कारावासाची मुदत ही कमी जास्त असू शकते. वर्तमान परिस्थितीतील कारावासावर नजर टाकल्यावर ही बाब स्पष्ट होते की, तेथे गुन्हेगारांच्या प्रवृत्तीत सुधारणा होण्याऐवजी गुन्हेगारी प्रवृत्तीत वाढच होते. कारण गुन्हेगाराची अशी मानसिकता होते की, कितीही मोठा गुन्हा केला तर जास्तीतजास्त तुरुंगातच जावे लागेल. यापेक्षा आणखीन काय होणार? काही गुन्हेगार तर असेही म्हणतात की तुरुंगातच जायचे असेल तर भुरटी-चोरी करून काय उपयोग? एखादा जबर गुन्हा करूनच तुरुंगात जाणे जास्त परवडेल. शिवाय मोठमोठे नेते आणि मोठमोठे घपले करणारे अधिकारी जेलमध्ये गेले तर त्यांना व्ही.आय.पी. सवलती पुरविण्यात येतात. तुरुंगातील मोठमोठे अधिकारी नोकरीत बढती मिळण्यासाठी त्यांची तळवी चाटतात, सेवा करतात. एखादा गुन्हेगार तुरुंगवास भोगून आला अथवा हत्या वा खून करून थोडीशी तुरुंगाची हवा खाऊन आला की गुन्हेगारी जगात त्याचे आणखीन वजन वाढते आणि तो अट्टल गुन्हेगार बनतो. जितक्या वेळा जेलमध्ये जाऊन आला, तेवढी त्याची (कु) प्रतिष्ठा वाढते, वजन आणि समाजावर त्याची धाक बसते. याचाच अर्थ असा की सध्याची शिक्षापद्धती ही अगदी कुचकामी आणि व्यर्थ आहे. यात परिवर्तन आणणे गरजेचे आहे. गुन्हा जितका गंभीर असेल, शिक्षाही तितकीच गंभीर आणि कडक असायला हवी.

दंडविधानातील आणखीन मोठी त्रुटी म्हणजे न्यायिक प्रकरणाच्या निवाड्यांना लागणारी अक्षम्य दिरंगाई होय. या दिरंगाईमुळे अपराधी हा स्वतःस कायद्याच्या बंधनातून मुक्त आणि स्वैर समजत असतो. त्याला वाटते की, न्यायालयाचा निर्णय लागेपर्यंतच्या लांबलचक मुदतीपर्यंत आपल्याला बरेच काही करण्याची संधी आहे आणि तो खरोखरच बरेच काही करतो. म्हणूनच बरेच अन्यायपीडित निराश होऊन न्याय मागणीसाठी न्यायालयापर्यंत जातही नाहीत आणि गुन्हेगार त्या अन्यायपीडिताची विवशता पाहून आणखीनच अन्याय व अत्याचार करीत असतो. त्याचे मनोबल गुन्हा करण्यासाठी वाढतच जाते.

या बाबतीत भारतामध्ये विभिन्न राज्यातील उच्चन्यायालयांत धूळ खात पडलेली आणि निकाली लागण्याची वाट पाहत असलेली प्रकरणे किती आहेत, याचा एक ढोबळ आलेख येथे देण्यात येत आहे. यावरून हे विदारक आणि मन खिन्न करणारे वास्तव लक्षात येईल की, न्यायनिवाड्याची भीक मागत-मागत लोकांना किती काळ वाट पाहण्याची अन्यायकारक शिक्षा सोसावी लागत आहे. त्यांचे निकाल कधी लागतील हे तर ईश्वर जाणे. या न्यायिक प्रकरणाचे चित्र असे आहे.

| उच्च न्यायालयांची नावे | १९९६ साली दाखल करण्यात आलेली प्रकरणे | १९९६ साली निकाली लागलेली प्रकरणे | १९९६ सालचे सुनावणी खाली असलेली प्रकरणे |
|---|---|---|---|
| १) अलाहाबाद | १६३९२० | ११७९७७ | ८६५४५५ |
| २) आंध्रप्रदेश | १२०९९७ | १३४०२४ | १३५६२१ |
| ३) मुंबई | ९१६२१ | ७४६७४ | २३४०५८ |
| ४) कोलकाता | ६०४२४ | ५८४८१ | २६४३१२ |
| ५) दिल्ली | ५७८१२ | ५२४८७ | १५३५३७ |
| ६) गुवाहाटी | २०९५८ | १९३११ | ३३०१८ |
| ७) गुजरात | अज्ञात | अज्ञात | १३९८२१ |
| ८) हिमाचल प्रदेश | १४५९९ | १६५०५ | १७१६६ |

शेवटी प्रश्न असा निर्माण होतो की, गुन्हेगारीचे समूळ उच्चाटन करण्यासाठी कोणती उपाययोजना यशस्वी ठरेल आणि एक व्यवस्थित व पवित्र तसेच सुखीसमाधानी व वैभवसंपन्न समाजाची उभारणी कोणत्या आधारे करणे शक्य होईल? तर पुढील प्रकरणात इस्लामी दृष्टिकोनानुसार या गंभीर समस्येचे समाधान कसे निघू शकते, यावर चर्चा करण्यात येईल.

## प्रकरण पाचवे

# अपराध व शिक्षेसंबंधी इस्लामी दृष्टिकोन

## अपराधाची व्याख्या

इस्लामी दृष्टिकोनात अपराध म्हणजे असे कृत्य, जे इस्लामी कायद्यानुसार अवैध आहे, जी कृत्ये करण्यापासून अल्लाहने मनाई केलेली आहे, अर्थात या कर्मांपासून दूर राहण्याचा आदेश दिला आहे. त्याचप्रमाणे यांपैकी काहींवर दंड आकारण्यात आला व काही कर्मांवर देहदंडाची शिक्षा ठोठावली आहे. ही अपराधाची कायद्यात्मक व्याख्या होय.

## अपराधाची विस्तीर्ण कल्पना

इस्लामने अपराध आणि त्यावरील शिक्षेची जी कल्पना मांडली आहे, ती अत्यंत विस्तीर्ण आहे. यामध्ये अशी प्रत्येक बाब समाविष्ट आहे, जिच्यात ईश्वर आणि प्रेषित मुहम्मद (स) यांच्या एखाद्या आदेशाची अवज्ञा करण्यात आली असेल, मग हा आदेश अगर नियम सामान्य असो अथवा असामान्य असो, ईमान म्हणजेच श्रद्धा शास्त्राशी संबंधित असो अथवा अधिकार आणि व्यवहार वा आचरणाशी संबंधित असो, नैतिकतेशी संबंधित असो किंवा जीवनाच्या इतर कोणत्याही बाबीशी असो, यांपैकी कोणत्याही आदेश अगर नियमाची अवज्ञा झाली तर समजा इस्लामी विधीनुसार ही अवज्ञा अपराध ठरते आणि त्यावर शिक्षा लागू करण्यात येते. मग ही शिक्षा गुन्हेगारास ऐहिक जीवनात मिळो की पारलौकिक जीवनात मिळो, ही शिक्षा ईश्वरातर्फे मिळो अथवा इस्लामी शासनातर्फे मिळो, शिक्षा ही मिळणारच. अल्लाहने कुरआनात म्हटले आहे,

"वास्तविकता अशी आहे की, जो माणूस गुन्हेगार होऊन आपल्या पालनकर्त्यासमोर येईल त्याच्यासाठी नरकाग्नी आहे, जिच्यामध्ये तो जगणारही नाही व मरणारही नाही आणि जो माणूस श्रद्धावंताच्या स्वरुपात त्यासमोर येईल, त्याने सदाचार केले असतील, अशा लोकांसाठी उच्च दर्जे आहेत."

(संदर्भ : कुरआन, सूरह-ए-ताहा, ७४,७५)

आणखीन एके ठिकाणी म्हटले आहे,

"आता बहानेबाजी करू नका. तुम्ही श्रद्धा ठेवल्यानंतर ईशद्रोह केला आहे. आम्ही तुमच्यापैकी एका समुदायास माफ जरी केले तरी दुसऱ्याला आम्ही निश्चितच शिक्षा देणार. कारण तो समुदाय अपराधी होता." (संदर्भ : कुरआन, सूरह-ए-तौबा, ६६)

## आंतरमनातील इच्छा व हेतुचे कायद्यातील स्थान

इस्लाम मानवासाठी ईश्वराने प्रदान केलेली जीवनपद्धतही आहे आणि जीवनविधान अर्थात एक कायदासुद्धा आहे. हा कायदा समाजातील मानवी संबंध आणि राज्यशासनातील प्रत्येक बाबींवर व्यापलेला असून प्रत्येक कार्य वा प्रत्येक कर्मासंबंधी मानवास नियम प्रदान करतो. एवढेच नव्हे तर माणसाच्या मनातील हेतु आणि इच्छा, आकांक्षा व कामनांवर तसेच भावनांवरसुद्धा नियम लागू करतो. अर्थातच मानवाचे आंतरिक आणि बाह्यात्मक कर्म म्हणजेच मनातील हेतु, इच्छा व आचरण योग्य की अयोग्य, वैध की अवैध, खरे की खोटे हे इस्लामच ठरवितो. उदाहरणार्थ, एखाद्या व्यक्तीवर एखाद्या नैतिक न्यायालयात त्याच्या आंतरमनातील भावना आणि हेतुनुसारच निर्णय देण्यात येईल. जर त्याने पुण्यकर्म करण्याचा इरादा केला अगर हेतु बाळगला तर त्याचा निवाडासुद्धा त्याचप्रमाणे होईल आणि जर त्याने दुष्कर्माचा हेतु बाळगला तर त्याचा निर्णयसुद्धा दुष्कर्माच्या हेतुनुसारच लागेल. हा नियम पारलौकिकरित्या चांगल्या आणि वाईट कर्मफळाच्या स्वरुपात सर्वस्वीकृत आहे. मात्र कायद्यात्मक न्यायालयात इस्लामी कायदा माणसाच्या बाह्यकर्मावर लागू होतो. अर्थातच माणसाच्या दृष्य आचरणावर लागू होतो. उदाहरणार्थ, एखाद्या व्यक्तीने एखादे श्वापद गोळी घालून ठार केले. मात्र गोळी त्या श्वापदास लागण्याऐवजी चुकून एखाद्या माणसास लागली आणि तो मृत्यूमुखी पडला. या अपराधावर ती व्यक्ती ईश्वराच्या दृष्टिकोनात गुन्हेगार ठरणार नाही. मात्र इस्लामी शासन त्यास खुनी ठरवून शिक्षा देईल. त्याचप्रमाणे एखाद्या व्यक्तीच्या मनात एखाद्या स्त्रीशी व्यभिचार करण्याची जर इच्छा झाली आणि ती स्त्री त्याची पत्नी असल्याचे नंतर समजले (अंधारात असा प्रकार घडू शकतो.) तर मात्र त्या व्यक्तीवर व्यभिचार करण्याची शिक्षा लागू करण्यात येणार नाही. तरीसुद्धा मनामध्ये दुष्ट हेतु बाळगल्याच्या अपराधास्तव ती व्यक्ती ईश्वराच्या दृष्टिकोनात गुन्हेगार ठरेल. या दुष्ट हेतुसंबंधी ईश्वरदरबारी त्या व्यक्तीस जाब द्यावा लागेल. याचप्रमाणे एखाद्या व्यक्तीने अपराध केला आणि तो गुन्हा करताना त्या व्यक्तीस कोणीच पाहिले नाही, अर्थात याची खबर केवळ ईश्वरालाच असते. अशा परिस्थितीत इस्लामी शासन शिक्षा लागू करू शकणार नाही. ईश्वरासमोरच त्याला याचा जाब द्यावा लागेल.

आता या ठिकाणी एक प्रश्न असा उभा राहतो की, माणसाच्या प्रत्येक अपराधावर या जगात शिक्षा होणे शक्य आहे काय? तर याचे उत्तर असे की अपराधांचे दोन प्रकार आहेत. प्रथम प्रकारच्या अपराधांमध्ये असे अपराध मोडतात, जे सिद्ध करता येऊ शकतात आणि दुसऱ्या प्रकारातील अपराध हे सिद्ध करता येऊ शकत नाहीत. सिद्ध

न होऊ शकणारे अपराध म्हणजे पाखंड, हेवा, अहंकार, दिखाऊपणा, द्वेष, मत्सर वगैरे होय. हे इस्लामच्या दृष्टिकोनात फार मोठे अपराध आहेत. मात्र हे अपराध माणसाच्या आंतरमनासंबंधी असल्याने सिद्ध करता येऊ शकत नाहीत. म्हणून या जगात त्यावर शिक्षा लागू करणे शक्य नाही. याव्यतिरिक्त चोरी, खून, व्यभिचार आणि यासारख्या अपराधांचा संबंध साक्षीदार आणि पुराव्यांशी असल्याने पुरावे व साक्षीदार न्यायालयात सादर करुन शिक्षा देण्यात येऊ शकते. म्हणजेच याचा अर्थ असा की, इस्लामी कायदा जगामध्ये अशा अपराधांवर शिक्षा लागू करतो, जो अपराध सर्वांना दिसतो, त्याची साक्ष व पुरावा असतो आणि न्यायालयात तो सिद्ध होतो. या शिवाय साक्षी आणि पुरावे नसलेल्या अपराधांवर कोणतीही शिक्षा लागू करता येणार नाही. या अपराधांवर पारलौकिक जीवनात मात्र कठोर शिक्षा होईल. हेच कारण आहे की, इस्लामने ज्या अपराधांवर या ऐहिक जीवनात शिक्षा निश्चित केली आहे, ते अपराध जास्त संख्येत नाहीत, याउलट या अपराधांपेक्षा भयानक अपराध म्हणजेच अनेकेश्वरवाद, मूर्तीपूजा, ईशद्रोह, नास्तिकता वगैरे, ज्यांना कुरआनात भयंकर अन्याय व अत्याचार म्हटले गेले आहे, अशा भयंकर अपराधांवर या जगात कोणत्याही प्रकारची शिक्षा इस्लामने लागू केली नाही. इस्लामने कोणावरच धर्माच्या बाबतीत बळजबरी केली नाही, कोणत्याही बळावर आणि कोणत्याही प्रकारचे आमिष देऊन इस्लाम स्वीकारणे भाग पाडले नाही. मात्र या गोष्टीवर विशेष लक्ष इस्लामने पुरविले आहे की, ज्या ठिकाणी एखाद्या व्यक्ती अगर समुदायाकडून इतरांचे वैध अधिकार पायदळी तुडविण्यात येतात, समाजाची शांती भंग पावते, इतरांना त्रास होतो, इतरांच्या प्राण, वित्त आणि इभ्रतीस इजा पोचविण्यात येते, इतरांवर अन्याय वा अत्याचार करण्यात येतो, अशा सर्वच अन्यायी बाबींवर आळा बसावा, कायमस्वरुपी वेसण बसावी अगर अशा कोणत्याही प्रकारच्या अपराधाचे समूळ उच्चाटन व्हावे आणि यासाठी इस्लामने एक अत्यंत परिपूर्ण आणि यशस्वी जीवन-विधान प्रदान केले आहे. म्हणजेच अपराधावर शिक्षा लागू करणे हे जनकल्याणासाठीच होय. सार्वजनिक कल्याणास इस्लामने खूप महत्त्व दिले आहे, हेच यावरून सिद्ध होते.

## सार्वजनिक कल्याण आणि इस्लामी कायदा

या गोष्टीशी समस्त इस्लामी विद्वान आणि मोठमोठे टोकाचे विचारवंत पूर्णपणे सहमत आहेत की, इस्लामी कायद्याच्या म्हणजेच शरियतच्या समस्त नियम आणि कायद्यात मानवकल्याण आणि हित दडलेले आहे. आपण जर थोडा विचार केला तर हे स्पष्ट आणि सिद्ध होईल की, शरियत अर्थात इस्लामी कायद्याने ज्या ज्या गोष्टींचे आदेश

दिले आहेत, त्या-त्या गोष्टींमध्ये मानवासाठी लाभ असून ज्या-ज्या कर्मांपासून रोखले गेले आहे, त्या कर्मात मानवाचे अक्षम्य नुकसान आणि तोटे आहेत. अर्थातच शरियतचे आदेश पालन करण्यातच मानवाचा सर्वांगीण विकास आणि कल्याण आहे. म्हणूनच एखादे कर्म हे गुन्हा वा अपराध असण्याचे मूळ कारण हे मानवकल्याणास बाधा आणणे किंवा मानवाच्या अस्तित्व आणि स्वातंत्र्यास नुकसान पोचविणे होय. अर्थातच मानवाचे अस्तित्व टिकण्यासाठी आणि त्याच्या सर्वांगीण कल्याणासाठी पाच गोष्टी अबाधित असणे आवश्यक आहेत. १) मानवाची धार्मिक श्रद्धा, २) मानवाचे प्राण, ३) मानवाची शीलता, ४) मानवाची संपत्ती आणि ५) मानवाची बुद्धी. या पाच गोष्टींवर अगर पाचपैकी कोणत्याही गोष्टींवर घाला घालणे म्हणजेच त्याच्या अस्तित्वास बाधा पोचविणे होय आणि म्हणूनच या पाचही बाबींना नुकसान पोचविण्याचे कर्म करणे हा गुन्हा अगर अपराध ठरविण्यात आला आहे. आता आपण या पाचही बाबींवर क्रमाक्रमाने इस्लामी दृष्टिकोनातून चर्चा करु या.

## १) ईमान अथवा श्रद्धेचे रक्षण

इस्लामच्या दृष्टिकोनात मानवी जीवनाची परिपूर्ण कल्पना ही त्याच्या ईमान अथवा धार्मिक श्रद्धेशिवाय शक्य नाही. म्हणूनच असे घटक, जे त्यास त्याच्या श्रद्धेला बाधा पोचवितात किंवा त्यास त्याच्या श्रद्धेपासून परावृत्त करण्याचे पातक करतात, असे घटक शरियत (इस्लामी कायदा) च्या दृष्टिकोनात शिक्षापात्र अपराध ठरविण्यात आले आहेत. कारण या अपराधी कर्मामुळे लोक श्रद्धात्मक मार्गभ्रष्टतेस बळी पडून इतरांनाही मार्गभ्रष्ट करतील. म्हणूनच अशा गुन्हेगारांसाठी शरियतने गंभीर शिक्षा लागू करून लोकांना आपल्या ईमान वा श्रद्धा सुरक्षित ठेवण्याची व्यवस्था केली आहे. ईश्वराने कुरआनात स्पष्टपणे आदेश दिला आहे की,

"तुम्हाला विचारतात की, निषिध्द महिन्यांत युद्ध करणे कसे आहे? तुम्ही सांगा की, हा मोठा अपराध आहे. परंतु ईश्वराच्या मार्गापासून अडविणे आणि ईश्वराला नाकारणे आणि काबागृहाच्या परिसरातील लोकांना तेथून बाहेर घालविणे ईश्वराजवळ यापेक्षाही वाईट आहे आणि अनाचार हा हत्येपेक्षाही वाईट आहे. ते सदैव तुमच्याशी युद्ध करीत राहतील, इथपर्यंत की, जर ते करु शकतील तर तुम्हाला तुमच्या धर्मापासून परावृत्त करतील आणि तुमच्यांपैकी जे लोक आपल्या धर्माकडे पाठ फिरवितील आणि नरकाच्याच परिस्थितीत मरेल, त्याचे भौतिक आणि मरणोत्तर दोन्ही जीवनातील आचरण व्यर्थ होईल."

(संदर्भ : सूरह-ए-बकरा, २१७)

## २) प्राणाचे रक्षण

ही अत्यंत सुंदर आणि रमणीय सृष्टी, विविध सौंदर्यांनी नटलेली मनमोहक आणि विलोभणीय सृष्टी, मात्र या अथांग आणि अनंत सृष्टीत जर मानवच नसेल, तर तिचे काय महत्त्व? मानवाच्या अस्तित्वामुळेच या सृष्टीचे आणि तिच्या मनोरम अस्तित्वाचे महत्त्व आहे. म्हणूनच मानवाचे प्राण अगर जीवन या विश्वात सर्वांत जास्त महत्त्वाचे आहे. इस्लामची भूमिका अशी आहे की, ईश्वराने ही समस्त सृष्टी मानवासाठीच निर्माण केली आहे. या सृष्टीतील प्रत्येक वस्तु आणि प्रत्येक घटक हे मानवाच्या सेवेसाठीच आहे. म्हणून मानवाचे प्राण सुरक्षित ठेवण्यासाठी व त्यांचे अस्तित्व अबाधित ठेवण्यासाठी त्याच्या प्राणाचे रक्षण होणे हे गरजेचे आहे. म्हणूनच इस्लामने एका माणसाची हत्या करण्याला इतका मोठा आणि घोर अपराध ठरविला आहे की, एका माणसाच्या हत्येस पूर्ण मानवजातीचीच हत्या ठरविण्यात आली. जी व्यक्ती हकनाक कोणाचा वध करते, त्या व्यक्तीच्या अंत:करणात मानव-प्राणाचा आदरच नसतो. म्हणून एका माणसाची हत्या करणे म्हणजे पूर्ण मानवतेचीच हत्या करण्यासम घोर पाप ठरविण्यात आले आहे. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे की,

"ज्या कोण्या व्यक्तीने हकनाक एखाद्या निष्पाप मानवाची हत्या केली असेल, त्याने समस्त मानवतेची हत्या केली आणि ज्याने एखाद्या मानवाचे प्राण वाचविले, त्याने समस्त मानवजातीचे प्राण वाचविले." (संदर्भ : सूरह-ए-माइदा - ३२)

केवळ हे विश्व मानवांनी भरलेले असावे, केवळ एवढ्याकरिताच मानवांच्या प्राणाचे महत्त्व नसून मानवाचे अस्तित्व हे ईश्वराची एक महान देणगी आहे. याकरितासुद्धा मानवप्राणाचे रक्षण आवश्यक होय आणि म्हणूनच इस्लाममध्ये आत्महत्या करणेसुद्धा भयंकर महापाप आहे. कारण यामुळे ईश्वराच्या अनमोल देणगीची कदर न करण्यासारखे होते. म्हणूनच स्वत: माणसाला पण या गोष्टीचा अधिकार नाही की, त्याने आपली जीवनलीला संपवावी. आत्महत्या करणेसुद्धा दुसऱ्याची हत्या करण्यासम अपराध ठरविण्यात आला आहे. कुरआनात म्हटले की,

"आत्महत्या करु नका. विश्वास करा की ईश्वर तुमच्यावर मेहेरबान आहे. जो माणूस अन्याय व अत्याचारासह असे करील, त्यास आम्ही अवश्य भयानक आगीत झोकून देऊ आणि हे ईश्वरासाठी काही अवघड काम नाही."

(संदर्भ : सूरह-ए-निसा - २९,३०)

मानव प्राणाच्या रक्षणासाठीच इस्लाममध्ये खुन्यास देहदंडाची शिक्षा लागू केली आहे. कारण खून करणारा नष्ट झाला तर पूर्ण मानवता सुरक्षित राहील आणि यानंतर

इतर कोणीही कोणाची हत्या करण्याचे धैर्य करणार नाही. अर्थातच एखाद्या खुन्याला, जो इतरांचा जगण्याचा अधिकार हिरावून घेतो, त्यास जगण्याचा अधिकारच काय? ईश्वराने कुरआनात म्हटले आहे की,

"आम्ही त्यांच्यावर लिहिले होते की, प्राणाच्या बदल्यात प्राण, डोळ्याच्या बदल्यात डोळा, नाकाच्या बदल्यात नाक, कानाच्या बदल्यात कान, दाताच्या बदल्यात दात आणि सर्व जखमांच्या बदल्यात जशास-तसा बदला."

(संदर्भ : सूरह-ए-माइदा - ४५)

## ३) मानवाच्या शीलतेचे रक्षण

इभ्रत आणि शीलतेचे रक्षण म्हणजे मानवजातीचे रक्षण होय. अन्यथा समाजात उपद्रवांचे भयानक वादळ उठते. कारण आपण बऱ्याच वेळा वृत्तपत्रात वाचतो किंवा बातम्यांमध्ये पाहतो की, अमक्या स्त्रीची इज्जत लुटण्यात आल्यामुळे तिने हा बलात्कार झालेला आणि शीलतेची लक्तरे उडालेली पाहून तिचा संताप अनावर झाला, आपण कोणाला तोंड दाखविण्याच्या लायकीचे राहिलो नाही असे समजून तिने स्वत:स जाळून घेतले. शेवटी माणूस हा ज्याप्रमाणे आपल्या प्राणाचे रक्षण करण्यासाठी अंतिम श्वासापर्यंत लढतो, त्याचप्रमाणे शीलतेच्या रक्षणासाठीसुद्धा अंतिम श्वासापर्यंत लढतो. शीलता नष्ट झाली आणि अपमान सोसावा लागला की, मग जगण्यातच काय अर्थ, हाच विचार त्यास आत्महत्येसाठी प्रेरित करतो. यावरून हे लक्षात येते की माणसाला आपले प्राण जसा प्रिय आहे, तशीच आपली अब्रू आणि शीलतादेखील खूप प्रिय आहे. त्याचप्रमाणे इस्लामने मानवाची अब्रू सुरक्षित ठेवण्यासाठी ना-ना उपाय योजिले आहेत. अब्रू आणि शीलतेस बाधा आणणाऱ्या कर्मांवर शिक्षा लागू केली आहे. इस्लामने विवाहबाह्य लैंगिक संबंधाची सक्तीने मनाई करून आणि या पातकाची कठोर शिक्षा तजवीज करून स्त्री-पुरुषांच्या इभ्रतींचे रक्षण करण्याचे ठोस पाऊल उचलले आहे. शिवाय या अवैध लैंगिक संबंधांचे दुष्परिणामही भयानक आहेत. अर्थातच शरियतच्या दृष्टिकोनानुसार हे आवश्यक आहे की, मूल जन्मल्यावर त्याचे पालनपोषण दयाळू आणि मायाळू माता-पित्यांच्याच देखरेखीत व्हावे. तेच या मुलाचे पालक असावेत. हा हेतु साध्य करण्यासाठी वैवाहिक जीवन अनिवार्य असल्याने इस्लामने विवाहबाह्य लैंगिक संबंध ठेवणे निषिद्ध ठरवून या कर्मास महापाप ठरविले. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"व्यभिचाराच्या जवळही फटकू नका. हे खूपच निर्लज्जतेचे वर्तन आणि मोठी मार्गभ्रष्टता आहे."

(संदर्भ : सूरह-ए-बनी-इस्त्राईल - ३२)

यासाठीच इस्लामने विवाहबाह्य लैंगिक संबंध ठेवणाऱ्यांना अत्यंत कठोर शिक्षा ठोठावली आहे.

त्याचप्रमाणे शरियत म्हणजेच इस्लामी कायद्यात शीलतेवर घाला घालणेच पाप नसून एखाद्याच्या इभ्रतीवर आरोप करणेसुद्धा भयंकर पाप आहे. यामुळे माणूस खचून जातो आणि चारचौघात त्याची बदनामी होते. कधी-कधी तो बदनामीच्या भयाने आत्महत्यासुद्धा करतो. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे की,

"जे लोक शीलवान स्त्रियांवर व्यभिचाराचा आळ घेतात, तेव्हा त्यांनी जर आरोप सिद्ध करण्यास्तव चार साक्षीदार सादर केले नाहीत, तर त्यांना ऐंशी कोरडे मारण्यात यावे आणि यानंतर त्यांची साक्ष कधीच विश्वासपात्र समजली जाणार नाही."

(संदर्भ : सूरह-ए-नूर - ४)

### ४) माणसाच्या संपत्तीचे रक्षण

संपत्ती हे लोकांच्या जीवनाचे माध्यम आणि समाजाच्या सामर्थ्य आणि स्थैर्याचे साधन होय. संपत्तीच्याच माध्यमाने माणूस आपल्या गरजा भागवू शकतो आणि यामुळे समाज आनंदी व वैभवसंपन्न होतो. संपत्ती नसली की माणूस दारिद्र्य आणि गरिबीच्या आगीत होरपळत असतो आणि वैफल्यग्रस्त होऊन तो गुन्हेगारी प्रवृत्तीस बळी पडतो. मग त्याच्या हातून चोऱ्या, वाटमाऱ्या, डकाइती, जुगार, देहव्यापार वगैरेसारखे घोर अपराध घडत असतात. म्हणूनच संपत्तीचे रक्षण होणे आवश्यक आहे. यासाठी इस्लामने कोणाच्याही संपत्तीवर डल्ला मारणे आणि कोणत्याही अवैध प्रकारे लुटणे, हा मोठा अपराध ठरविला आहे. कुरआनात ईश्वराने म्हटले आहे,

"हे श्रद्धाधारकांनो! एक-दुसऱ्यांचा माल (अगर संपत्ती) चुकीच्या मार्गाने हस्तगत करु नका."

(संदर्भ : सूरह-ए-निसा, २९)

चुकीच्या मार्गाने संपत्ती हस्तगत करणे म्हणजे संपत्ती मिळविण्याची अशी प्रत्येक पद्धत, जी इस्लामी कायद्याने निषिद्ध ठरविली आहे. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी स्पष्टपणे म्हटले आहे,

"ज्याने चोरीचा माल खरेदी केला, आणि हा माल चोरीचा असल्याचे माहीत असूनसुद्धा, तर तो चोरी करण्याच्या अपराधामध्येच सामील असेल."

(संदर्भ : फ़ैज़लु क़दीर, सहावा खंड, पृष्ठ ६४)

## ५) माणसाच्या विवेक आणि बुद्धीचे रक्षण

बुद्धीचे रक्षण म्हणजे त्याला अशा बाबींपासून संरक्षण देण्यात यावे, ज्यामुळे त्याचे बौद्धिकसामर्थ्य संकटात येत असेल, बुद्धी भ्रष्ट होत असेल. याच कारणास्तव शरियतमध्ये दारू आणि इतर सर्वच मादक पदार्थांच्या सेवनावर सक्तीने बंदी घातली आहे आणि त्यासाठी कठोर शिक्षा निश्चित केली आहे, जेणेकरून समाज या भयानक शापापासून मुक्त व्हावा. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे की,

"हे श्रद्धावंतांनो, ही दारू, जुगार आणि हे शकून पाहणे, हे सर्व अमंगल सैतानी कामे आहेत, यापासून दूर राहा. अशा आहे की, तुम्ही यशस्वी व्हाल. सैतान तर हेच इच्छितो की, या कुकर्मांच्या माध्यमाने तुमच्यात वैर आणि द्वेष निर्माण व्हावा आणि तुम्हास ईशस्मरण आणि नमाज पढण्यापासून रोखावे. मग काय तुम्ही या गोष्टीपासून परावृत्त राहाल."

(संदर्भ : सूरह-ए-माइदा - ९०,९१)

याच त्या जनकल्याणकारी बाबी आहेत, ज्यांचे रक्षण शरियत अर्थात इस्लामी कायद्यांत अनिवार्य ठरविण्यात आले आहे आणि या पाच बाबींवर घाला घालणाऱ्याविरुद्ध कठोर शिक्षा लागू करण्यात आली आहे. इस्लामचे थोर तत्त्वज्ञानी इमाम ग़ज़ाली (र) यांनी लिहिले आहे,

"लाभ मिळविणे आणि नुकसान होऊ न देणे हेच लोकांचे उद्दिष्ट असते. शिवाय हीच उद्दिष्टे पूर्ण करणे म्हणजे लोकसुधारणा होय. या ठिकाणी लोकसुधारणा म्हणजे अशी सुधारणा जी शरियतमान्य आहे. तसेच लोकांच्या हितामध्ये पाच बाबी आहेत. त्या अशा १) धर्माचे रक्षण, २) प्राणाचे रक्षण, ३) बुद्धीसामर्थ्याचे रक्षण, ४) पिढीचे रक्षण आणि ५) संपत्तीचे रक्षण. त्यामुळे या पाच बाबींची जामीन देणारा प्रत्येक कायदाच मुळात जनकल्याण आणि लोकसुधारणा असेल. त्याचप्रमाणे ज्यामुळे हे नियम भंग होत असतील, ती पद्धत उपद्रवी असेल आणि प्रत्येक उपद्रवाचा नाश करणे अनिवार्य असते. या पाच नियमांचे रक्षण जीवनावश्यक गरजांमध्ये समाविष्ट असेल, तसेच जनकल्याणाचा हा उच्चतम दर्जा आहे. म्हणूनच शरियतमध्ये खुन्यास देहदंडाची शिक्षा इतरांच्या प्राण रक्षणासाठी, दारू पिण्याऱ्यास शिक्षा ही बुद्धीसामर्थ्य सुरक्षित ठेवण्यासाठी, व्यभिचाराची शिक्षा ही मानववंश चालविण्यासाठी, चोरीची शिक्षा ही आर्थिक माध्यम अबाधित ठेवण्यासाठी निश्चित करण्यात आली आहे. या आहेत त्या जनहितवादी पाच बाबीं, ज्यांच्या रक्षणार्थ जगातील प्रत्येक धर्म आणि समाज सहमत आहे."

(संदर्भ : अल मुस्तस्फियुल इमाम ग़ज़ाली, पृष्ठ - २५१)

## जनहिताचा खरा अर्थ

जनहितासंबंधी दोन बाबी लक्षात घेणे आवश्यक आहेत. प्रथम असे की, जनहित म्हणजे माणसाला हवी ती वस्तु आणि वाटेल ती गोष्ट प्राप्त होणे म्हणजे जनहित नव्हे, असा शरियतचा स्पष्ट दृष्टिकोन आहे. अर्थातच एखादी व्यक्ती आपली स्वैर अभिलाषा आणि स्वैरकामना पूर्ण करण्यास जनहित म्हणू शकत नाही. कारण की आशा-आकांक्षा आणि अभिलाषा अमर्याद असतात. त्या कधीच संपत नसतात, पूर्णही होत नसतात. कधीकधी तर फायदा होण्याऐवजी यामुळे भयानक उपद्रवसुद्धा जन्म घेऊ शकतो आणि उपद्रव हा जनहित असू शकत नाही. म्हणूनच मानवाच्या सर्वच आशा आणि अभिलाषा पूर्ण करणे हे जनहिताच्या परिभाषेत बसत नाही. दुसरी गोष्ट अशी की, इस्लाममध्ये केवळ अशाच हितांची जोपासना करण्यास जनहित म्हटले गेले, जे इस्लामी शिकवण आणि सार्वजनिक हितानुसार असतील. मात्र जे हित इस्लामी शिकवणी अगर नियमांच्या विरुद्ध अथवा सार्वजनिक हितांच्या विरुद्ध असेल, त्यास जनहित म्हणता येणार नाही.

## अपराधांचे प्रकार

निश्चितच माणसाचे मौलिक हित विविध प्रकारचे आहेत. मात्र या विविध प्रकारांचासुद्धा विशिष्ट दर्जा ठरविण्यात आला आहे. म्हणून कोणत्या हिताला प्राथमिक महत्त्व द्यायचे आणि कोणत्या हितास दुय्यम स्थान द्यायचे, हे शरियतने अत्यंत विवेकपूर्ण पद्धतीने ठरविले आहे. या प्रमाणानुसारच शरियतने अपराधांचासुद्धा दर्जा ठरविण्यात आला व प्रत्येक अपराधाची शिक्षा त्याच्या दर्जानुसार लागू केली. शरियतने अपराधांचे प्रामुख्याने तीन प्रकार केले ते असे.

१) असे अपराध, ज्यांची शिक्षा स्वयं ईश्वर आणि प्रेषित मुहम्मद (स) यांनी निश्चित केली असून या शिक्षेत कोणालाही परिवर्तन व किंचितही कमी-जास्त करण्याचा मुळीच अधिकार नाही. हे अपराध म्हणजे व्यभिचार, दारु पिणे, चोरी करणे, डकाईती आणि धर्मविमुख होणे व बंडखोरी करणे होय. या अपराधांची शिक्षा शरियतने निश्चित करून दिली असून त्यात किंचितही बदल करणे वा त्यात ढवळा-ढवळ करणे शक्य नाही.

२) असे अपराध ज्यामुळे मृत्यूदंड, देहदंड अथवा खुनाच्या भरपाईची शिक्षा लागू करण्यात आली. हे अपराध म्हणजे जाणून बुजून हत्या करणे, चुकून हत्या घडणे, जाणूनबुजून हत्या घडण्याची शक्यता, हेतुपुरस्सर शारीरिक इजा पोचविणे, चुकून कोणास शारीरिक इजा पोचविणे होय.

३) असे अपराध ज्यांची शिक्षा इस्लामी कायद्याने म्हणजे शरियतने स्वत: निश्चित न करता तत्कालीन शासक अगर न्यायाधीशाला निश्चित करण्याची परवानगी दिली आहे. अर्थात तत्कालीन शासक आणि न्यायाधीश आपल्या परीने अपराध्यास शिक्षा तजवीज करील. मृत्यूदंडाची शिक्षा लागू करण्यात ज्या अटी व शर्ती निश्चित करण्यात आल्या आहेत, त्या शर्ती व अटींची पूर्तता होत असल्यास अपराध्यावर दंड आकारण्यात येईल. याव्यतिरिक्त लाचखोरी, भ्रष्टाचार, व्याजखोरी, शिवीगाळ, सामान्यजनांच्या हिताला बाधा पोचविणे, जाळपोळ, धोकेबाजी वगैरेसारख्या अपराधांमध्ये दंड आकारण्याची शिक्षा लागू करण्यात येईल.

### अपराध सिद्ध होण्याच्या अटी व शर्ती

वरील मजकुरात अपराधांचे विविध प्रकार आपण पाहिले. आता आपण हे अपराध सिद्ध होण्याच्या अटी व शर्ती पाहू या, त्या निम्नलिखित आहेत.

१) एखादे कर्म हे अपराध असल्याचे प्रमाण कुरआन आणि हदीस (प्रेषितवचने) नुसार सिद्ध असावे.

२) ज्यावर अपराधाचा आरोप लावण्यात येत आहे, त्याने खरोखरच तो अपराध केलेला असावा. केवळ अपराध करण्याची इच्छा असण्यावर किंवा ही इच्छा बोलून दाखविण्यावर सदरील व्यक्तीस अपराधी ठरविता येणार नाही.

३) आरोपी हा इस्लामी कायद्यात्मकरित्या जवाबदार असावा. त्याला कोणत्याही प्रकारचा शारीरिक वा मानसिक आजार, अल्पवय, वैफल्यग्रस्तता, अज्ञान, आत्मसंरक्षणात्मक परिस्थितीसारख्या बाबी नसाव्यात.

## अपराधांच्या शिक्षेची इस्लामी कल्पना

जी शिक्षा एखाद्या व्यक्तीस गुन्ह्यांपासून रोखण्यासाठी देण्यात येते, तिला शरियतमध्ये 'अकूबत' असे म्हणतात.

### शिक्षेची इस्लामी कल्पना व स्वरुप

इस्लामध्ये गुन्हेगारास शिक्षा देण्याचे तीन प्रकार आहेत. शरियतने ज्या अपराधांची शिक्षा निश्चित ठरवून दिली आहे, ती शिक्षा या प्रकारात मोडते. उदाहरणार्थ, चोरी करणाऱ्याचे हात कापणे, व्यभिचाराची शिक्षा दगडाने ठेचून ठार मारणे अगर कोरडे मारणे, दारु पिण्याची शिक्षा चाळीस कोरडे मारणे, वगैरे होय. दुसरा प्रकार हा देहदंडाच्या शिक्षेसंबंधी आहे. उदाहरणार्थ, हत्येची शिक्षा मृत्यूदंड,

कान कापण्याची शिक्षा कान कापणे, नाक कापण्याची शिक्षा नाक कापणे, हात कापण्याच्या अपराधाची शिक्षा हात कापणे, अर्थातच शरीरास ज्याप्रकारे इजा पोचविण्याचा अपराध केला असेल, अगदी तंतोतंत तशीच शिक्षा देणे हा शिक्षेचा दुसरा प्रकार आहे. त्याचप्रमाणे दंडविधानाची शिक्षा हा शिक्षेचा तिसरा प्रकार होय. ही शिक्षा तत्कालीन न्यायाधीश अगर शासक परिस्थितीनुरुप तजवीज करतो. खोटी साक्ष देणे, इतरांच्या घरात डोकावणे करणे वगैरेसारख्या अपराधात दंडविधानानुसार शिक्षा देण्यात येते. हे दंडविधान विधानपरिषदेतील तत्त्ववेत्ते निश्चित करतात. अपराधांच्या जहाल वा मवाळ स्वरुपानुसार कोरडे मारणे, कैदेत टाकणे, अथवा आर्थिक दंड आकारणे, असे शिक्षेचे प्रकार असतात.

## शिक्षांच्या स्वरुपातील फरक

इस्लामने गुन्ह्यांचे गांभीर्य समोर ठेवून त्यानुसार शिक्षा ठरविली आहे. इस्लामी कायद्यात 'किसास' अर्थात बदल्यास बदला. शिक्षा ही समस्त शिक्षांचा आधार आहे. म्हणजेच जी व्यक्ती इतरांना जशा स्वरुपात इजा पोचवील त्याच स्वरुपात अपराध्यास शिक्षा देण्यात येईल. मात्र एखाद्या अपराधाचे स्वरुप किंवा गांभीर्य निश्चित करण्यात तीन गोष्टी लक्षात ठेवणे आवश्यक आहे.

१) अपराध्याने केलेल्या अपराधामुळे पीडितास झालेल्या नुकसानीचे स्वरुप कसे आहे? शारीरिक, मानसिक, आणि वित्तीय नुकसान झाल्यास त्याचे प्रमाण किती आहे?

२) अपराध्याने केलेल्या अपराधाचा समाजमनावर झालेला परिणाम किती गंभीर स्वरुपाचा आहे.

३) अपराध्याने केलेल्या नुकसानीमुळे पीडिताचा किती अपमान झाला वा त्याच्या इभ्रतीस किती प्रमाणात झळ पोचली, या बाबींवर विशेष लक्ष देणे गरजेचे आहे.

एखाद्या व्यक्तीने चोरी केली, तर चोरी करण्याची शिक्षा ही चोरण्यात आलेल्या पैसा किंवा द्रव्याच्या किमतीवर अवलंबून नाही, म्हणजेच कोणी थोड्याशा द्रव्याची किंवा दहा-पाच रुपयांचीच जरी चोरी केली तर त्याला चोरलेल्या पैशांच्या अल्प किंमतीनुसार अल्प शिक्षा मिळणार नाही. तर याउलट शिक्षा देण्याचा किंवा शिक्षा किती कमी व जास्त असावी, या गोष्टीचा आधार हा समाजावर होणारा परिणाम होय. कारण चोरीचा अपराध जर कोठे घडला तर समजा समाजजीवन विचलित होते. तेथील लोकांच्या झोपा मोडतात. तेथील शांती भंग होऊन चोरीच्या भीतीने लोकांची मानसिक स्थिती विचलित होते. ही परिस्थिती पाहून चोरीची शिक्षा तजवीज करण्यात आली आहे. याचप्रमाणे एखाद्याने

एखाद्या शीलवान स्त्रीवर बलात्कार केला असेल या अपराधाची शिक्षासुद्धा त्याला एखाद्या दुर्वर्तनी स्त्रीशी बलात्कार करण्यासमानच मिळेल. कारण या दोन्ही स्वरुपात शीलता भंग होण्याचे प्रमाण सारखेच आहे. शिवाय समाजमनावर याचा होणारा परिणामही सारखाच आहे. याव्यतीरिक्त ज्या अपराधाचा संबंध इतरांच्या अधिकाराशी आहे, त्यात अपराधाच्या तीव्रतेच्या प्रमाणानुसारच शिक्षा लागू करण्यात येईल. उदाहरणार्थ, देहदंडामध्ये पीडिताचे जेवढे नुकसान झाले, त्या प्रमाणात शिक्षा देण्यात येईल. अर्थातच अपराध्याने खून केला असेल तर त्याच्या बदल्यात मृत्यूदंड, डोळा फोडला असेल तर अपराध्याचा डोळा फोडण्याची शिक्षा, हात तोडला असेल तर अपराध्याचा हात तोडण्याची शिक्षा वगैरे.

## शिक्षांचा दर्जा व स्वरुप

शरियतमध्ये अर्थात इस्लामी कायद्यामध्ये अपराधांची जी शिक्षा लागू करण्यात येते, तिचे प्रामुख्याने चार दर्जे आहेत.

१) मूळ शिक्षा, म्हणजेच खुनाची शिक्षा मृत्यूदंड, व्यभिचार अगर बलात्काराची शिक्षा 'रजम' (दगडाने ठेचून वध करणे) अगर शंभर कोरडे मारणे, चोरीची शिक्षा हात कापणे होय.

२) पर्यायी शिक्षा, म्हणजेच जर मूळ शिक्षा लागू होत नसेल तर त्याठिकाणी पर्यायी शिक्षा लागू करण्यात येईल. उदाहरणार्थ, खून करण्याची शिक्षा मृत्यूदंड आहे. मात्र जर पीडित पक्षाने मृत्यूदंडाऐवजी खुनाची भरपाई घेण्यावर सहमती दर्शविली तर तसे दंडविधान लागू करून खूनभरपाईचा दंड गुन्हेगारावर आकारण्यात येईल.

३) अतिरिक्त शिक्षा, म्हणजेच जर खून केलेला अपराधी खून झालेल्या व्यक्तीच्या परिवाराचा सदस्य असेल तर त्यास वारसासंपत्तीतून मिळणारा संपत्तीचा वाटा देण्यात येणार नाही, किंवा खोटी साक्ष दिल्याच्या अपराधास्तव पुढील जीवनात इतरांविषयी साक्ष देण्याचा अधिकार हिरावून घेण्यात येईल.

४) परिपूर्ण शिक्षा, उदाहरणार्थ, चोराचे हात कापल्यावर त्याचा हात त्याच्या गळ्यात लटकाविण्यात येईल.

## शिक्षांचे प्रकार

इस्लामी विधीशास्त्रात ज्याप्रमाणे अपराधांचे विविध प्रकार पाडण्यात आले, त्याचनुसार त्यांच्या शिक्षांचे प्रकारसुद्धा पाडण्यात आले आहेत. उदाहरणार्थ,

१) शिक्षा तजवीज करताना न्यायप्रमुखास शिक्षेमध्ये बदल करण्याचा अधिकार नसणे. उदाहरणार्थ, देहदंडाच्या शिक्षेमध्ये न्यायप्रमुखास शिक्षेमध्ये बदल करण्याचा अधिकार नसतो. मात्र दंडविधानात त्याला परिस्थितीनुरूप बदल करण्याचा अधिकार असतो.

२) पर्यायी शिक्षा, म्हणजेच मृत्यूदंड अगर कोरडे लावणे किंवा अपराध्यास कैद करणे वगैरे होय.

३) अपराध्यास कानपिचक्या देणे, दरडावणे वगैरेसारखी मानसिक शिक्षा देणे.

४) आर्थिक दंडाची शिक्षा देणे, म्हणजेच खूनभरपाई किंवा संपत्ती जप्त करणे वगैरे.

## अपराध्यास शिक्षा देण्याचे उद्दिष्ट

मानव प्रवृत्तीमध्ये सदाचार आणि दुराचार हे दोन्ही गुणधर्म असतात. इस्लामच्या एकूण आराधना आणि नीती-नियमांचे उद्दिष्ट असे आहे की, मानवाच्या भावना आणि स्वभावगुणधर्म इस्लामी शिकवणींच्या साच्यात साचेबद्ध व्हावे. इस्लामी नियमांशी समरूप व्हावे. मात्र माणूस हा शेवटी आशा-आकांक्षा आणि वासना व अभिलाषांचा पुतळा असतो. तो कधी-कधी आपल्या स्वैर कामनांना आणि अमर्याद वासनांना बळी पडतो व त्यांची पूर्तता करण्यासाठी अपराध करतो. म्हणूनच त्याने केलेल्या अपराधाची त्यास शिक्षा देण्यात येते, जेणेकरून त्याने अथवा इतर कोणी परत तो अपराध करून समाजाचे वातावरण दूषित करू नये. त्याचप्रमाणे मानवास निसर्गाने असामान्य बुद्धी आणि विवेकाची देणगी दिली आहे. त्यास काही सामाजिक मूल्ये प्राप्त आहेत. मात्र कधी-कधी तो स्वतःच काही कारणास्तव ही मूल्ये पायदळी तुडवितो. अशा परिस्थितीतही त्यास अपराधमुक्त करण्यासाठी शिक्षा देणे आवश्यक आहे. त्याला जे स्थान प्राप्त होते, ते त्यास परत मिळावे आणि समाजात सकारात्मक मूल्ये वृद्धीस लागावीत. तिसरी गोष्ट अशी की, प्रत्येक माणसात गुन्हेगारीची नैसर्गिक भावना असते. मात्र जर त्यास शिक्षेचे भय असेल तर तो अपराधी कर्म करीत नाही. त्याचप्रमाणे समाजातील इतर लोकसुद्धा एखाद्या अपराध्यास अपराधाची शिक्षा मिळत असताना पाहून अपराध करण्याचे धारिष्ट्य करीत नाहीत. चौथी आणि शेवटची गोष्ट अशी की, अपराध्यास योग्य शिक्षा देणे यासाठीसुद्धा गरजेचे आहे की, यामुळे अपराध्यास मानसिक शांती मिळते. केवळ देहदंडच नव्हे तर इतर शिक्षा आणि दंडसुद्धा देण्याचा हासुद्धा उद्देश आहे.

# प्रकरण सहावे

# गुन्हेगारी निर्मूलनाचे इस्लामी उपाय

## ४.१) गुन्हेगारी निर्मूलनाचे इस्लामी उपाय

इस्लामने निश्चितच शिक्षा व दंडविधान लागू करण्याचे आदेश दिले आहेत. मात्र केवळ एकदा हे आदेश देऊन अपराध रोखण्याचे उपाय योजून इस्लामने समाधान मानले नाही. कारण या जगात केवळ कडक कायदा करून आणि अपराध्यास जास्तीतजास्त शिक्षा देऊन अपराधाचे निर्मूलन होत नसते. तर यासाठी शक्य होईल तेवढ्या उपाययोजना इस्लामने केल्या आहेत. या सर्व उपाययोजना केल्यानंतर जर कोणी अपराध केला तर हा मात्र शेवटचा पर्याय आहे. आता आपण पाहू या की, इस्लामने असे कोणते उपाय योजिले व अशी कोणती जादूची कांडी फिरविली की माणसाने सहसा अपराध करू नये. अथवा त्यास गुन्हा करणे खूपच अवघड जावे.

## १) गुन्हेगारी निर्मूलनात इस्लामी श्रद्धेची भूमिका

मानव इतिहासाची ही सर्वांत मोठी शोकांतिका आहे की, तो नेहमीच चुकीच्या धर्मश्रद्धांना बळी पडला. या विश्वामध्ये मानवास आपले मूळ स्थान काय आहे, हे समजूच शकले नाही. त्यास आपल्या दर्जाचा सार कधी समजलाच नाही. कधी स्वत:लाच ईश्वर समजण्याची घोडचूक केली, तर कधी ईश्वरेतर बाबींना ईश्वर समजण्याची चूक केली. आजही जगातील मोठ्या प्रमाणात लोक याच चुका करीत आहेत. अनेकेश्वरवाद, मूर्तीपूजा, ईशद्रोह, नास्तिकतासारख्या विचारसरणीच्या भयानक भोवऱ्यांत ज्याप्रमाणे पूर्वीचे लोक सापडले होते, त्याचप्रमाणे वर्तमान युगाचीही परिस्थिती आहे. विज्ञान व संशोधनाच्या काळातही मानवास जणू खऱ्या ईश्वराचा शोध लागला नाही. याउलट मानवइतिहासामध्ये इस्लामचा जागतिक विक्रम हा आहे की, इस्लामने सर्वप्रथम मानवास चुकीच्या श्रद्धांच्या जुलमी जोखडातून मुक्त करण्याचा प्रयत्न केला. या जगात ईश्वराने जेवढे प्रेषित पाठविले आहेत, त्या सर्वांनी हेच कार्य केले. या सर्वच प्रेषितांनी सर्वप्रथम मानवास त्याचा खरा दर्जा दाखवून खऱ्या ईश्वराची ओळख करून दिली, अर्थातच त्याची बिघडलेली श्रद्धा दूर केली. मग यानंतर इतर दुसऱ्या वाईट प्रथा नष्ट करण्याचा प्रयत्न केला. वर्तमानकाळात अपराधांचे आणि गुन्हेगारीचे भयानक आणि निष्ठूर तांडव माजलेले असताना आणि यामुळे समस्त मानवता अवार्त टाहो फोडत असताना यातून सुटका होण्यासाठी ना-ना उपाय योजण्यात येत आहेत. मात्र सगळे उपाय व्यर्थ सिद्ध होत आहेत. अर्थातच हे सर्व उपाय निराधार आहेत. जोपर्यंत यासाठी खरा आधार मिळत नाही, तोपर्यंत हे सर्व उपाय व्यर्थच सिद्ध होतील आणि याचा आधार हा ईमान म्हणजेच इस्लामी श्रद्धा होय. आता आपण यावर चर्चा करु या.

# इस्लामी श्रद्धांचा परिचय

## अ) ईश्वरावर श्रद्धा

ईश्वरावर श्रद्धा ठेवण्याचा अर्थ असा की, या समस्त सृष्टीचा ईश्वर हा एकटाच निर्माता व स्वामी आहे. त्याचा कोणीच भागीदार नाही. त्याला जे वाटेल, तेच तो करतो. त्याला भूत, वर्तमान आणि भविष्याचे पूर्ण ज्ञान आहे. यापैकी एकही वस्तु आणि घटना त्याच्या दृष्टीबाहेर नाही. पृथ्वी, आकाश, सूर्य, चंद्र, ग्रह, तारे, पर्वत, जंगल, वनसृष्टी, प्राणीमात्र आणि सृष्टीतील प्रत्येक कण व मानव हे सर्वच त्याच्या ताब्यात आहेत. या सर्वांवर केवळ त्याचेच एकट्याचे राज्य आहे. प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य केवळ त्याच्याच जवळ आहे. तोच वाटेल त्यास अस्तित्व प्रदान करू शकतो आणि वाटेल त्याचे अस्तित्व नष्ट करू शकतो. तो चिरकाली व अनादी अस्तित्व असलेला व अविनाषी आहे. सर्व प्रकारच्या प्रशंसेस तोच एकटा पात्र आहे. त्याच्यासमान कोणीच नाही. कुरआनात त्याचे गुणधर्म अशा प्रकारे वर्णन करण्यात आले आहेत.

"ईश्वर हा चिरंतनजिवी आहे, जो संदर्भ विश्वाचा सांभाळ करतो. त्याच्याशिवाय कोणीच पूजनीय नाही, तो झोपतही नाही आणि त्याला डुलकीपण लागत नाही. जमीन आणि आकाशात जे काही आहे, ते सर्व त्याच्याच मालकीचे आहे. कोण आहे जो त्याच्या दरबारी त्याच्या परवानगीशिवाय शिफारस करू शकेल, जे काही त्यांना माहीत नाही, तेसुद्धा तो जाणतो आहे आणि त्याच्या माहितीमधून एखादी बाब त्यांच्या बुद्धीत येऊ शकत नाही. मात्र जर ईश्वराने काही गोष्टींचे ज्ञान स्वतःच त्यांना दिले तर ती गोष्ट वेगळी." (संदर्भ : सूरह-ए-बकरा - २५५)

## आ) प्रेषितत्वावर श्रद्धा

प्रेषितावर श्रद्धा ठेवण्याचा अर्थ असा आहे की, ईश्वराने मानवजातीच्या मार्गदर्शनासाठी मानवांपैकीच काही लोकांना निवडून त्यांच्यावर आपला संदेश अवतरित केला, जेणेकरून मानवजातीने जीवनाचा खरा मार्ग अवलंबवावा. अशाप्रकारे प्रत्येक काळात आणि प्रत्येक भागात ईश्वराने प्रेषितांना पाठविले आणि प्रेषितत्वाची ही शृंखला अंतिम प्रेषित मुहम्मद (स) यांच्यावर संपली. अंतिम प्रेषित मुहम्मद (स) यांच्यावर अवतरित झालेला ईश्वराचा संदेश म्हणजेच कुरआन होय. हा ईश्वरी संदेश अर्थात कुरआन जगातील प्रत्येक मानवासाठी आणि जग अस्तित्वात असेपर्यंतच्या प्रत्येक मानवासाठी मार्गदर्शक ग्रंथ होय. म्हणून आता कोणत्याही प्रेषितांची आणि कोणत्याही ईश्वरी ग्रंथाची गरज राहिली नसल्याने कोणताही प्रेषित येणार नाही व कोणताही ग्रंथ अवतरित होणार नाही. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे की,

"मुहम्मद (स) हे केवळ ईश्वराचे प्रेषित आहेत, आणि त्यांच्या पूर्वीसुद्धा बरेच प्रेषित ईश्वराने पाठविले आहेत." (संदर्भ : सूरह-ए-आलि इम्रान - १४४)

## इ) ईश्वरी ग्रंथांवर श्रद्धा

ईश्वरी ग्रंथांवर श्रद्धा ठेवण्याचा अर्थ असा की, ईश्वराने मानवाच्या मार्गदर्शनासाठी केवळ प्रेषितांनाच पाठविले नसून संदेश अर्थात ग्रंथसुद्धा जीवनविधानाच्या स्वरुपात पाठविले, जेणेकरून मानवजातीस सत्य-असत्य, वैध-अवैध किंवा चांगले-वाईट आणि पाप-पुण्य काय आहे, याचे ईश्वरी प्रमाण माहीत व्हावे. या ग्रंथांपैकी जे विविध प्रेषितांवर अवतरित करण्यात आले, ते प्रामुख्याने 'तौरेत', 'इंजील', 'ज़ुबुर' आणि अंतिम ग्रंथ 'कुरआन' होय. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"ईश्वर तो चिरंतनजीवी अस्तित्व ज्याने सृष्टीची व्यवस्था सांभाळली आहे, खरोखरच त्याच्याशिवाय कोणीही ईश्वर नाही. हे प्रेषिता (स)! त्याने तुमच्यावर हा ग्रंथ अवतरला जो सत्य घेऊन आला आहे व त्या ग्रंथाच्या सत्यतेची साथ देत आहे, जे पूर्वी अवतरले होते." (संदर्भ : सूरह-आलि इम्रान - २, ३)

## ई) फरिश्त्यांवर श्रद्धा

फरिश्त्यांवर श्रद्धा असण्याचा अर्थ असा की, ईश्वराने ज्याप्रमाणे मानव, जिन आणि इतर सृष्टी निर्माण केली, त्याचप्रमाणे फरिश्तेसुद्धा निर्माण केले. मात्र त्यांच्या अस्तित्वाचा भौतिक अर्थ मानवाच्या बुद्धीसामर्थ्याबाहेर आहे. त्यांचे कार्य हे प्रत्येकक्षणी ईश्वराचा आदेश बजावणे होय. काही फरिश्ते (देवदूत) ईश्वराच्या प्रशंसेसाठी नेमण्यात आले तर काही फरिश्ते ईश्वराचा संदेश पोचविण्याच्या कामावर नेमण्यात आले, काही फरिश्ते अपराध्यांना शिक्षा देण्यासाठी तर काही फरिश्ते मानवांचे सदाचार आणि दुराचारांची नोंदणी करण्यासाठी नेमण्यात आले. म्हणजेच विविध कामांमध्ये ते प्रत्येक क्षणी मग्न असून प्रत्येक क्षणी ते ईश्वराच्या आदेशाचे पालन करीत आहेत. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"प्रशंसा ईश्वराचीच आहे, जो आकाश आणि पृथ्वीचा निर्माता आहे आणि फरिश्त्यांना दूत म्हणून नियुक्त करणारा आहे, असे फरिश्ते, ज्यांना दोन-दोन, तीन-तीन, चार-चार बाहू आहेत. या निर्मितीची रुपे तो वाटेल तशी वाढवितो. निश्चितच ईश्वर प्रत्येक गोष्टीवर प्रभुत्वशाली आहे." (संदर्भ : सूरह-ए-फ़ातिर - १)

### उ) परलोकावर श्रद्धा

परलोकावर श्रद्धा ठेवण्याचा अर्थ असा आहे की, ईश्वराने एका विशेष उद्दिष्टासाठी या विश्वाची निर्मिती केली असून या विश्वात मानवाची निर्मिती केली आहे. मग एके दिवशी हे विश्व नष्ट करण्यात येईल. या विश्वातील कोणतीच वस्तु शिल्लक राहणार नाही. अर्थातच या विश्वात जन्म घेणाऱ्या प्रत्येक मानवाचा व सजीव सृष्टीचा मृत्यू व त्याचप्रमाणे प्रत्येक निर्जीव सृष्टीचा नाश अटळ आहे. या जगात जेवढ्या मानवांना ईश्वराने जन्मास घातले, त्या सर्वांना मृत्यूपश्चात परत जीवन प्रदान करण्यात येईल आणि त्यांच्या कर्माचा हिशेब घेण्यात येईल. यानंतर त्यांना चांगल्या कर्माचे फळ स्वर्गलोगप्राप्तीच्या स्वरुपात आणि दुष्कर्मांचे फळ नरकाग्नीच्या स्वरुपात देण्यात येईल. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"जेव्हा आकाश फाटेल आणि जेव्हा तारे विस्कळून पडतील आणि समुद्र फाडून टाकले जातील आणि कबरी उघडल्या जातील, त्या वेळी प्रत्येक माणसाला त्याने पुढचे मागचे केले सवरलेले सर्व कळेल." (संदर्भ : सूरह-ए-अलइनफितार - १ ते ५)

कुरआनात वारंवार या घटनेसंबंधी खबरदार करण्यात आले असून या वास्तविकतेस नाकारणाऱ्यांना सक्तीने त्याच्या वाईट परिणामाची जाणीव करून देण्यात आली. ईश्वराने म्हटले आहे,

"हे श्रद्धावंतांनो! श्रद्धा ठेवा ईश्वर आणि त्याच्या प्रेषितांवर, त्याच्या ग्रंथावर, जो ईश्वराने आपल्या प्रेषितांवर अवतरित केला आहे, आणि प्रत्येक त्या ग्रंथावर, जे यापूर्वी अवतरित करण्यात आले आहेत. त्याच्या प्रेषितांवर आणि ज्यांनी अंतिम निवाड्याच्या दिवसाचा इन्कार केला, ते मार्ग भटकून खूप दूर गेलेत."

(संदर्भ : सूरह-ए-निसा - १३६)

हे इस्लामी श्रद्धांचे आधारभूत घटक आहेत. या घटकांवर श्रद्धा ठेवल्यानंतर मानवाचे पूर्ण व्यक्तिमत्त्व, त्याची विचारसरणी, नीतीमत्ता व भूमिकेमध्ये आमूलाग्र परिवर्तन घडते. तो जीवनाची प्रत्येक बाब याच ईमान अगर श्रद्धेच्या कसोटीवर पारखतो. जर त्याचे कोणतेही कर्म या कसोटीवर खरे सिद्ध झाले तर ईश्वर स्वीकार करतो नसता धिक्कारतो. मोमिन अर्थात श्रद्धावंत म्हणजेच मुस्लिम हा आपले प्रत्येक पाऊल याच श्रद्धेच्या प्रकाशात पुढे टाकतो आणि प्रत्येक क्षणी याच श्रद्धेचा प्रकाश सोबत ठेवतो. तो आपले जगणे आणि मरणेसुद्धा याच श्रद्धेच्या मर्यादेत ठेवतो. एका श्रद्धावनाच्या जगण्यास जर काही अर्थ असेल तर याच श्रद्धेमुळे असेल आणि याच श्रद्धेमुळे त्याचे

मरणसुद्धा सार्थक असते. तो आपली श्रद्धा सुरक्षित ठेवण्यासाठी आपल्या सर्वस्वाची आणि प्राणाचीसुद्धा आहुती देतो. याच श्रद्धेच्या असामान्य शक्ती व सामर्थ्यांमुळे तो अमानवी आणि निष्ठूर व सत्यविरोधी शक्तींचा सामना करतो. ज्या अमानवी आणि निष्ठूर व सत्यविरोधी शक्तीमुळे आज समस्त विश्वांमध्ये अपराध आणि गुन्हेगारीसारख्या दुष्कर्मांचे भयंकर वादळ उठले आहे, ते शमविण्याची पूर्ण शक्ती आणि सामर्थ्य याच श्रद्धेमध्ये आहे.

या ठिकाणी ईमान अर्थात श्रद्धांच्या सर्वच घटकांवर चर्चा करण्याऐवजी आपण 'ईश्वरावरील श्रद्धा' या घटकावरच चर्चा करु या.

## ईश्वराचे पालकत्व

वर्तमानकाळात अपराध घडण्याच्या विविध कारणांपैकी सर्वांत मोठे कारण हे आर्थिक परिस्थिती होय. माणसाच्या गरजा पूर्ण होण्यासाठी अर्थार्जन कमी पडत असेल तर माणूस अवैध मार्गाने पैसा मिळविण्याचा आटापिटा करतो. अपूरे अर्थार्जन, वाजवीपेक्षा, जास्त महागाई आणि तुटपुंज्या कमाईतून जीवनावश्यक गरजा न भागणे, या सगळ्या ओढातानीत माणूस विवेक हरवून बसतो. याशिवाय कोणाच्या जीवनावश्यक गरजा पूर्ण होत असल्या तरी, इतरांचे वैभव आणि समृद्धी पाहून त्याच्याही मनात संपत्ती आणि सुखसाधनांची तीव्र लालसा निर्माण होते. त्याच्या स्वभावातच असलेल्या वासना आणि स्वैर अभिलाषांनी प्रेरित होऊन असेल त्यावर समाधान न मानता कमीतकमी प्रयत्नांतून जास्तीतजास्त संपत्ती मिळविण्याच्या मागे लागतो. या स्पर्धात्मक युगामध्ये ज्या ठिकाणी जीवनावश्यक गरजा पूर्ण करण्यासाठी माणसाला जीवाचे रान करावे लागते. अशा ठिकाणी जास्त संपत्ती मिळविण्यासाठी काय करावे लागेल आणि किती कष्ट सोसावे लागतील याची कल्पना न केलेलीच बरी. तेव्हा अल्प श्रमामध्ये जास्त संपत्ती मिळविण्यासाठी निश्चितच अवैध मार्गाचा अवलंब करून वाटेल ते करतो. त्याला वाटते की, आपण जास्तीतजास्त चांगल्या रितीने जीवन जगावे, सर्वांवर आपले वर्चस्व असावे, सर्वप्रकारे आपण सुरक्षित असावे. यासाठी सर्वांत जास्त आवश्यकता असते ती पैशांची, संपत्तीची आणि धार्मिक सामर्थ्यांची. पैसा असेल तर दहाजण मागेपुढे फिरतात, गरीबाला कोण विचारतो. पैसा असला तर कितीही मोठा रोग जडला तरी महागडा उपचार करता येतो. गरीबांसारखे जमिनीवर पाय घासून मरण्याची पाळी येत नाही. पैसा असला तर कायदा आणि न्यायसुद्धा खरेदी करता येतो, प्रसिद्धी मिळते, सत्ता खरेदी करता येते, एवढी शक्ती या पैशांमध्ये बळावली आहे. म्हणूनच माणूस अवैध मार्गाने ना-ना प्रकारे

पैसा मिळविण्याचा आटापिटा करतो. यासाठी अन्याय, अत्याचार, उपद्रव, देहव्यापार, मादक पदार्थांचा व्यापार, खून, चोरी, दरोडे, दहशत वगैरे समस्त बाबींचा सर्रास अवलंब करतो. कारण त्याला वाटते की, याशिवाय आपले आर्थिक प्रश्न सुटणार नाहीत, एवढेच नव्हे तर या अवैध आणि वाममार्गानेही जर पैसा मिळाला नाही तर, तो आत्महत्यासुद्धा करतो. मात्र माणसाची जर अशी श्रद्धा असली, (आणि ही श्रद्धाच नव्हे तर वास्तविकता आहे की, ईश्वर हा समस्त सृष्टीचा पालनकर्ता आणि स्वामी आहे,) तर तो आर्थिक शक्तीसमोर नतमस्तक होणार नाही. भौतिक संपत्तीच्या क्रूर देवतेसमोर नैतिकता आणि चारित्र्याचा बळी देणार नाही. गरीब आणि दीनदलितांच्या अधिकारांची अंजली या देवतेस वाहणार नाही. त्याला जर ही वास्तविकता समजली की, ज्या ईश्वराने आपल्याला जन्मास घालण्यापूर्वीच आपल्या उपजीविकेसाठी आपल्या मातेच्या छातीत दूध निर्माण केले, तो ईश्वर आपल्याला कधीच उपाशी ठेवणार नाही. कारण तोच सर्व सृष्टीचा स्वामी आणि पालनकर्ता आहे. म्हणून त्याची अवज्ञा करता कामा नये. दोन पैशांसाठी कोणाचाही गळा कापता कामा नये, कोणासही त्रास देता कामा नये, वैध मार्गाने जे मिळेल, त्यातच समाधान मानावे आणि याच समाधानामुळे त्यास कधीच वैफल्य येत नाही, तो कधीच आत्महत्या करीत नाही, त्याचे जीवन सुखाने व्यतीत होते. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"भूतलावरील प्रत्येक सजीवास उपजीविका केवळ ईश्वरच पुरवितो आणि त्यास हे चांगले माहीत आहे की, कोणास कोणत्या ठिकाणी उपजीविका पुरवायची आहे."

(संदर्भ : सूरह-ए-हूद - ६)

प्रेषित मुहम्मद (स) यांनी म्हटले आहे की, प्रत्येक मानवाची निर्मिती अशा प्रकारे होत असते की, तो आपल्या मातेच्या गर्भात चाळीस दिवस वीर्याच्या स्वरुपात असतो, त्यानंतर चाळीस दिवस रक्ताच्या गोळ्यात रुपांतरित होऊन राहतो, मग चाळीस दिवस मांसाच्या गोळ्यात रुपांतरित होऊन राहतो. मग ईश्वर चार गोष्टींसह एक फरिश्ता पाठवितो, जो त्याच्या जीवनात कर्म, वय, उपजीविका, सौभाग्य आणि दुर्भाग्य लिहितो. मग त्यांच्यात आत्मा प्रविष्ट करण्यात येतो.

(संदर्भ : प्रेषित वचन संग्रह, मुस्नदे अहमद - ३०)

याचाच अर्थ असा की, मानवाच्या जन्मापूर्वीच त्याची उपजीविका प्रदान करण्यात आली आणि ती त्यास किती प्रमाणात मिळेल, हेसुद्धा निश्चित करण्यात आले. आणखीन एके ठिकाणी प्रेषित मुहम्मद (स) यांनी म्हटले आहे,

"जर तुम्ही पूर्ण विश्वास ठेवाल तर ईश्वर तुम्हांस अशी उपजीविका प्रदान करील, जशी चिमणीला प्रदान करतो, जी सकाळी आपल्या घरट्यांतून उपाशीपोटी निघते आणि संध्याकाळी पोटभरून आपल्या घरट्यात पोचते." (संदर्भ : प्रेषित वचन संग्रह)

मग प्रश्न असा निर्माण होतो की, ज्याअर्थी परम दयाळू ईश्वराने सर्वांनाच उपजीविका पुरविण्याची व्यवस्था केली, तर या जगात असंख्य लोक उपासमारीस का बळी पडतात? का त्यांना दोन घास मिळविण्यासाठी वन-वन फिरावे लागते? आपल्या दोन निष्पाप मुलांना दोन घास भरविण्यासाठी असंख्य स्त्रिया का बरे इतरांच्या वासनांना बळी पडाव्यात? याचे उत्तर कुरआनाने अशा प्रकारे दिले आहे,

"जर ईश्वर आपल्या सर्वच दासांना उघड उपजीविका देत असता तर त्यांनी भूतलावर बंडाचे वादळ माजविले असते, मात्र तो योग्य प्रमाणात जेवढे इच्छितो तेवढे प्रदान करतो. निश्चितच त्याला आपल्या दासाची पूर्ण खबर आहे."

(संदर्भ : सूरह-ए-शूरा - २७)

संपत्तीच्या उद्रेकामुळेच भूतलावर उपद्रव माजण्याची संभावना असेल तर ईश्वर काहींना का जास्त संपत्ती देतो आणि काहींच्या माथी का दारिद्र्याचा कलंक लावतो? तर निश्चितच्या परिस्थितीतसुद्धा जगात तेच होत आहे, जे होण्याची संभावना वरील आयतीमध्ये व्यक्त करण्यात आली. याचे उत्तर कुरआनात अशाप्रकारे देण्यात आले आहे,

"तुमच्यापैकी काहीना काहींच्या तुलनेत अधिक उच्च दर्जे बहाल केले की ज्यायोगे जे काही तुम्हाला दिले आहे, त्यात तुमची परिक्षा घ्यावी, निःसंशय तुमचा पालनकर्ता शिक्षा देण्यातही अत्यंत सत्वर आहे आणि फार क्षमाशील व दया करणारदेखील आहे." (संदर्भ : सूरह-ए-अनआम - १६५)

"जर का ईश्वराने लोकांना त्यांच्या केलेल्या कृत्यांवर पकडले असते, तर पृथ्वीवर कोणत्याही सजीवाला जीवंत सोडले नसते. परंतु तो त्यांना एका निश्चित वेळेपर्यंत अवधी देतो. मग जेव्हा त्यांची घटका भरेल, तेव्हा ईश्वर आपल्या दासांना बघून घेईल." (संदर्भ : सूरह-ए-फ़ातिर - ४५)

## ईश्वराचे सर्वव्यापी ज्ञान

अपराधी अपराध करतात मात्र या गोष्टीची खबरदारी घेतात की, त्यांना कोणी पाहू नये. सहसा चोरी, व्यभिचार वगैरेसारखे अपराध इतरांच्या नजरेपासून लपूनछपूनच करण्यात येतात आणि यामुळेच एखादा माणूस व्यावसायिक-गुन्हेगार बनतो. दुसरी गोष्ट

अशी की, काही अपराध लपूनछपून नव्हे तर अगदी उघडपणे करण्यात येतात. मात्र या अपराधसिद्धीमध्ये इतका गुंता वाढलेला असतो की, ते सिद्ध करणे खूप अवघड आणि जवळपास अशक्य होऊन बसते. म्हणजेच गुन्हेगार न्यायव्यवस्थेसमोर एक प्रकारे आव्हान निर्माण करतो की, असेल दम तर गुन्हा सिद्धच करून दाखवा. उदाहरणार्थ राजकीय, आर्थिक आणि वित्तीय अपराध अशाच रितीने करण्यात येतात. अशा अपराध्यांना माहीत असते की, याचे काय निर्णय लागतील आणि हेदेखील माहीत असते की, कायद्याचे हात त्यांच्या गचांडीपर्यंत पोचू शकत नाहीत. म्हणून ते अगदी बिनधास्त असतात. मात्र अपराध्यास जर ही वास्तविकता माहीत असेल की ईश्वराचे ज्ञान सर्वव्यापी आहे तर त्याची या भयाने झोपच मोडावी की, आपण जे काही कृष्णकृत्य करीत आहोत, ते अंधारातही करीत असलो तरी ईश्वरास नक्कीच माहीत आहे आणि तो आपल्या प्रत्येक कर्माचा जाब घेईल. कुरआनात म्हटले आहे की विश्वातील एकन्-एक कण ईश्वराच्या दृष्टीसीमेच्या आतच आहे. त्याला प्रत्येक बारीकसारीक घटनेचे आणि कर्माचे पूर्ण व तत्काळ ज्ञान असते. एवढेच नव्हे तर चोराच्या मनातील हेतु आणि कल्पनासुद्धा त्यास चांगल्या रितीने माहीत आहे. कुरआनात आहे,

"हे प्रेषिता (स)! तुम्ही ज्या अवस्थेत असता आणि कुरआनामधून जे काही ऐकविता, आणि लोकहो! तुम्हीदेखील जे काही करता, त्या सर्व काळात आम्ही तुम्हास पाहत असतो. कोणतीही वस्तु तुमच्या पालनकर्त्याच्या दृष्टीपासून लपलेली नाही."

(संदर्भ : सूरह-ए-यूनुस - ६१)

"समुद्र व जमिनीत जे काही आहे, ते सर्व ईश्वराला माहीत आहे, झाडावरून पडणारे कोणतेही पान असे नाही, ज्याची माहिती त्याला नाही. जमिनीच्या अंधकारपूर्ण थरात कोणताच दाणा असा नाही, ज्याचे त्याला ज्ञान नाही. आर्द्र आणि शुष्क सर्वकाही एका खुल्या ग्रंथात लिहिलेले आहे." (संदर्भ : सूरह-ए-अनआम - ५९)

आणखीन एके ठिकाणी म्हटले आहे,

"तो (ईश्वर) जानतो (सर्वांच्या) चोर नजरा आणि जे काही मनात दडलेले आहे तेसुद्धा." (संदर्भ : सूरह-ए-मोमिन - १९०)

आणखीन एके ठिकाणी म्हटले आहे,

"तोच एक ईश्वर आकाश आणि भूतलावरील परिस्थितीचे ज्ञान असणारा आणि तुमच्या उघड व सुप्त अवस्था जाणणारा आहे आणि जे पापकर्म आणि पुण्यकर्म तुम्ही करता, त्यांची त्यास चांगलीच खबर आहे." (संदर्भ : सूरह-ए-इनाम - ३)

अशा प्रकारच्या कुरआनात भरपूर आयती आहेत, ज्यावरून ईश्वराच्या अमर्याद आणि सर्वव्यापी ज्ञानाची कल्पना येते. ही वास्तविकता जर कोणाच्या श्रद्धेशीच संबंधित असेल की, त्याचा ईश्वर त्याला प्रत्येक क्षणी पाहत आहे, तर तो निश्चितच अपराधांपासून दूर राहणार.

## ईश्वराची असीम दया व कृपा

बऱ्याच वेळा माणूस प्रतिकूल परिस्थितीने वैतागून गुन्हेगारीच्या मार्गाकडे वळतो. जेव्हा त्याच्या हातून छोटे-मोटे अपराध घडू लागतात. तेव्हा त्यास वाटू लागते की, आता आपण गुन्हेगार झालो आणि यातून प्रायश्चित्त करण्याची काहीच संधी नाही. ईश्वरही आता आपल्याला सोडणार नाही. असा विचार करून तो आता मोठमोठे अपराध करायला लागतो अथवा गुन्हेगारीने वैतागून आत्महत्या करून घेतो. आत्महत्या करण्यामागे असलेल्या कारणांत हे कारणसुद्धा समोर आले की, लोक आपल्या अपराधांवर हसतील, आपला अपमान होईल, आपण कोणाला तोंड दाखवायच्या लायकीचे राहणार नाही. अशा वेळी अपराधी आत्महत्या करतो. मात्र असे का घडते? तर याचे एकच कारण समोर येते आणि ते म्हणजे अपराधी हा ईश्वराच्या दया आणि कृपांनी निराश होतो. त्याला जर हे माहीत झाले की, ईश्वरासमोर आपण आपल्या पापाविषयी अश्रु गाळून क्षमा मागितली आणि यापुढे असे न करण्याचा चंग बांधला, तर ईश्वर हा निश्चितच क्षमा करणारा आहे. तर या श्रद्धेमुळे कोणताही अपराधी गुन्हेगारीचा मार्ग सोडून सदाचाराचे जीवन जगण्यास प्रेरित होईल. बऱ्याच ठिकाणी कुरआनात म्हटले आहे की ईश्वर हा अपराध क्षमा करणारा आहे आणि आपल्या मानवदासांवर अत्यंत दयाळू आहे. हेच कुरआनात अशा शब्दांत म्हटले आहे,

"हे प्रेषित! माझ्या दासांना सांगा, ज्यांनी स्वत:च्या प्राणांशी अतिरेक केला, त्यांनी ईश्वराच्या दयेपासून निराश होता कामा नये. निश्चितच तो अत्यंत क्षमाशील आहे."

(संदर्भ : सूरह-ए-ज़ुमुर - ५३)

हे ईश्वराचे काही विशेष गुणधर्म आहेत, जे माणसाच्या अंत:करणात श्रद्धेच्या स्वरुपात असतील तर निश्चितच अपराधापासून दूर राहण्याची आंतरिक शक्ती निर्माण होते. कुरआन आणि हदीसमध्ये (प्रेषितवचनांत) बऱ्याच ठिकाणी ईश्वराच्या गुणधर्मांचा उल्लेख करण्यात आला आणि प्रेषित मुहम्मद (स) यांनी असेही म्हटले आहे की, ईश्वराने आपल्या गुणधर्मांचे बरेच अंश माणसाच्या प्रवृत्तीत सामील केले आहेत. उदाहरणार्थ, दयाभाव, क्षमाशीलता, संयम, सत्य, न्याय-प्रवृत्ती, निस्पृहता वगैरे, तेव्हा

माणसानेसुद्धा इतरांवर दया-माया करावी, इतरांना क्षमा करावी, आपल्या अभिलाषांवर आणि भावना व वासनांवर ताबा ठेवून संयम बाळगावा, सर्वांशी भलाईचे वर्तन करावे, इतरांसाठीही तेच पसंत करावे, जे स्वत:साठी पसंत करण्यात येते. जी वागणूक स्वत:प्रति चांगली वाटते तीच इतरांनाही द्यावी. इतरांचे वैभव पाहून लोभ न बाळगता निस्पृहतेने राहावे. इतरांवर अन्याय-अत्याचार करू नये. इतरांचा द्वेष, मत्सर आणि हेवा करू नये. ईश्वर हा गुन्हेगारी व अपराध माफ करणारा आहे, आपणही इतरांच्या चुका मोठ्या मनाने माफ कराव्यात. आपले अंत:करण उदार ठेवावे. कुरआनातही ईश्वराने हीच शिकवण दिली.

## परलोक जीवनावर श्रद्धा

ही गोष्ट आता सिद्ध झाली आहे की हे विश्व एक दिवस नष्ट होणार आहे. आकाश फाटेल, आकाश गंगेतील ग्रह-तारे झडून पडतील. सूर्य आणि चंद्राचे तेज नष्ट होईल आणि सृष्टीचे संपूर्ण वैभव नष्ट होईल. ही सगळी सृष्टीच नष्ट होईल. या गोष्टीवर वैज्ञानिक सुद्धा सहमत आहेत. मात्र त्यांनी अद्याप हे मान्य केले नाही की, मानवास परत एकदा जीवन प्राप्त होईल आणि प्रत्येक मानवास आपल्या कर्माचा जाब द्यावा लागेल. असे कोणी मान्य करो वा न करो. मात्र हे एक सत्य आहे आणि कुरआनाने प्रत्येक पैलूने हे सिद्ध केले आहे. अंतिम निवाड्याचा दिवस असणारच आणि यासाठी प्रत्येक मानव परत एकदा जीवंत होणार आणि प्रत्येकास आपल्या काळ्या-पांढऱ्याचा हिशेब द्यावा लागणार. कुरआनात म्हटले आहे,

"जेव्हा पृथ्वीमध्ये अभूतपूर्व कंपन निर्माण करण्यात येईल आणि जमीन तिच्या आतील संपूर्ण ओझे बाहेर काढून फेकील." (संदर्भ : सूरह-ए-जिलजाल - १ - ८)

प्रेषित मुहम्मद (स) यांनी म्हटले की अंतिम निवाड्याच्या दिवशी एका नमाज पढणाऱ्या व्यक्तीशी, जी इतरांवर अन्याय व अत्याचार करते, कसे वर्तन करण्यात येईल? तर याचे स्पष्टीकरण करताना त्यांनी म्हटले आहे,

"तुम्हाला माहीत आहे काय की गरीब आणि पामर कोण आहे? लोकांनी उत्तर दिले की, 'गरीब म्हणजे अशी व्यक्ती, जिच्याजवळ पैसा अडका व संपत्तीच नाही.' तेव्हा प्रेषित मुहम्मद (स) यांनी म्हटले, "नाही! संपत्तीहीन व्यक्ती गरीब आणि दरिद्री नसून, गरीब व पामर आणि दरिद्री व्यक्ती ती आहे, जी अंतिम निवाड्याच्या दिवशी अशा अवस्थेत येईल, जी नमाज पढणारी, रोजे (उपवास) राखणारी, दान-धर्म करणारी

असेल, मात्र याबरोबरच त्या व्यक्तीने कोणाला शिवीगाळ केली असेल, कोणावर आळ धरला असेल, कोणाची संपत्ती हडप केली असेल, कोणाचे रक्त सांडले असेल, कोणास इजा दिली असेल, म्हणून या व्यक्तीचे सर्व पुण्यकर्मे अत्याचार पीडितास देऊन टाकण्यात येईल आणि यावरसुद्धा हिशेब चुकता न झाल्यास अत्याचारपीडितांचे पाप त्या व्यक्तीच्या कर्मसूचित टाकण्यात येतील. मग त्या व्यक्तीस नरकाग्नीत टाकण्यात येईल.''

(संदर्भ : प्रेषित वचनसंग्रह - मुस्लिम)

ज्या व्यक्तीची अशी श्रद्धा असेल की, त्याला आपल्या प्रत्येक कर्माचा एके दिवशी हिशेब द्यावा लागणार आहे, अशा श्रद्धेची व्यक्ती अपराध सहसा करू शकत नाही.

## स्वर्ग आणि नरकाग्नीचे वास्तव

परलोकावर विश्वास अगर श्रद्धा असण्याचा अर्थ केवळ एवढाच नाही की सर्व मानव परत जीवंत करण्यात येतील आणि त्यांना त्यांच्या भल्या-बुऱ्याचा हिशेब द्यावा लागेल. तर याचा पूर्ण अर्थ असा आहे की अंतिम निवाड्याच्या दिवशी माणसाचे कर्म तपासून त्यास स्वर्ग वा नरकाग्नीत जावे लागेल. अर्थातच चांगले कर्म असतील तर स्वर्गप्राप्ती होईल आणि वाईट कर्म असतील तर नरकाग्नीत टाकण्यात येईल. कुरआन आणि हदीस (प्रेषितवचन शास्त्र) मध्ये स्वर्ग आणि नरकाग्नीची वास्तविकता सविस्तरपणे मांडण्यात आली आहे. याच्या अभ्यासावरून स्पष्ट होते की स्वर्ग म्हणजे माणसाच्या प्रत्येक इच्छा, आकांक्षा आणि मनोकामनापूर्तींचे स्थान होय. त्या ठिकाणी केवळ सुख, शांती आणि समाधान असेल. वाटेल ती वस्तु आणि पाहिजे ती भोगवस्तु तेथे त्यास उपलब्ध करून देण्यात येईल. तेथे तो नेहमी आनंदात राहील आणि कोणतीच भोगवस्तू नष्ट होणार नाही. त्याचप्रमाणे मनुष्यास कधीच म्हातारपण आणि मृत्यू येणार नाही. कुरआनात म्हटले आहे,

"ईशपरायणांसाठी ज्या स्वर्गाचे वचन दिले होते, त्याची अशी शान आहे की, त्यातून झरे वाहत असतील. अशा दुधाचे ज्याच्या चवीमध्ये काहीच फरक आलेले नसेल. अशा मदिरांचे झरणे वाहत असतील जे पिणाऱ्यांना खूप चविष्ट लागतील.''

(संदर्भ : सूरह-ए-मुहम्मद - १५)

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी स्वर्गाची रुपरेखा अशा प्रकारे वर्णन केली आहे की,

"स्वर्ग असे ठिकाण आहे, जेथील इमारती सोन्या-चांदीच्या विटांनी आणि कस्तुरीच्या सुगंधीत गाऱ्याने तयार केलेल्या असतील. त्याची खडी मोती आणि रत्नांची

असेल आणि तेथील माती ही माती नसून केशर असेल. जी व्यक्ती यात दाखल होईल ती नेहमाकरिता सुखी व समाधानी असेल. तेथे कोणत्याच प्रकारचे दु:ख आणि भय नसेल आणि ती व्यक्ती या ठिकाणी सदोदित जीवन जगेल. त्या व्यक्तीस कधीच मृत्यू येणार नाही. तेथील पोषाख कधीच जुणे होणार नाहीत आणि तारुण्यदेखील कधीच संपणार नाही.'' (संदर्भ : प्रेषितवचन ग्रंथ मुस्नदे अहमद, दुसरा खंड, पृष्ठ : ३०५)

याउलट नरकाग्नी ही अत्यंत भयानक असून यात ज्या व्यक्तीस फेकण्यात येईल, ती नेहमीसाठी तेथे अत्यंत असहनीय यातना भोगेल. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

''डाव्या बाजूवाल्यांचे दुर्दैव काय विचारता. ते उष्णतेच्या लहरीत आणि खवळलेल्या पाण्यात आणि काळ्या धुराच्या लोटात असतील. जे कधीच थंड होणार नाही आणि कधीच आरामदायकही होणार नाही.

जे परिणामापूर्वी आनंदी होते आणि मोठेमोठे पाप करण्याचा अट्टाहास करीत होते, म्हणत होते की, जेव्हा आम्ही मरू, मातीत मिसळून जाऊ आणि हाडांचा पिंजराही तेवढा शिल्लक राहणार नाही, तर मग परत मानवास उभे करण्यात येईल काय?''

(संदर्भ : सूरह-ए-वाक़िया - ४१ ते५६)

त्याचप्रमाणे प्रेषित मुहम्मद (स) यांनी अगदी कमी यातनादायक दर्जाच्या नरकाग्नीची रुपरेखा अशा प्रकारे वर्णन केली की,

''अंतिम निवाड्याच्या दिवशी सर्वांत कमी दर्जाच्या यातना त्या व्यक्तीस होतील जिच्या पायाखाली आगीने तयार केलेल्या वाहणा ठेवण्यात येतील आणि यामुळे त्या व्यक्तीचे मेंदू खदखदत असेल.'' (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

प्रश्न असा निर्माण होतो की स्वर्गात जाणारे भाग्यवान लोक कोण असतील आणि नरकाग्नीच्या यातना भोगणारे कोण असतील? तर याचे अगदी सरळ उत्तर असे आहे की, स्वर्गप्राप्तीचे भाग्य अशांना लाभेल, जे या ऐहिक जीवनात अपराधी कर्म करणार नाहीत आणि नरकाग्नीच्या असीम यातना अपराध करणाऱ्यांना आणि ईश्वरासमोर आपल्या अपराधांची क्षमा मागून सदाचाराचा मार्ग न अवलंबिणाऱ्यांना भोगाव्या लागतील. ईश्वराने कुरआनात स्पष्टपणे म्हटले आहे,

''आम्ही गुन्हेगारांना नरकाग्नीमध्ये टाकून देऊ.''

(संदर्भ : सूरह-ए-मरयम - ८६)

आणखीन एके ठिकाणी म्हटले आहे,

"तुम्हाला कोणती गोष्ट नरकाग्नीत घेऊन गेली? ते म्हणतील की आम्ही नमाज पढणाऱ्यांपैकी नव्हतो आणि दीन-दलितांना जेवण करवित नव्हतो आणि सत्यविरोधी गोष्टी करणाऱ्यांबरोबर आम्हीसुद्धा सामील होऊन सत्यविरोधी गोष्टी करीत होतो आणि अंतिम निवाड्याच्या दिवसाला खोटे ठरवित होतो."

(संदर्भ : सूरह-ए-मुदस्सिर - ४२ ते ४६)

स्वर्गात जाणाऱ्यांसंबंधी ईश्वराने म्हटले आहे,

"निश्चितच ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली आणि पुण्यकर्म केले, त्यांच्या श्रद्धेमुळे त्यांचा पालनकर्ता (ईश्वर) त्यांना त्यांचे परमोच्च फळ देईल. याखाली (स्वर्गात) झरे वाहतील, ते विश्रांतीच्या बागेत राहतील." (संदर्भ : सूरह-ए-यूनुस ९)

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स) यांनी म्हटले आहे की जर लोकांना पारलौकिक जीवनाची वास्तविकता माहीत झाली असती आणि स्वर्ग व नरकाग्नीसंबंधी ज्ञान असते तर समस्त जीवन शोकाकूल होऊन रडण्यातच व्यतीत झाले असते, जीवनात रस राहिला नसता. या अर्थाच्या प्रेषितवचनांचे शब्द असे आहेत,

"ज्या काही बाबींचे ज्ञान मला आहे, त्या बाबींचे ज्ञान जर तुम्हाला झाले असते, तर तुम्ही रडले जास्त असते आणि कमी हसले असते."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह-बुखारी)

श्रद्धा ही मानवाला कार्यप्रेरणेचा खरा आधार प्रदान करते. कारण माणसाचे प्रत्येक कार्य आणि प्रत्येक कर्म हे त्याच्या आंतरमनातील इच्छेतून प्रकट होते आणि ही इच्छा वा विचार माणसाच्या भावनांना गती प्रदान करते. शिवाय माणसाच्या भावना श्रद्धेचे प्रतिनिधित्व करतात. अर्थातच ज्याप्रमाणे माणसाची श्रद्धा असेल त्याचप्रमाणे बुद्धीत विचार येतील आणि जसे विचार असतील तशीच माणसाच्या अवयवावाटे कृती होईल, तसेच त्याच्या हातून कर्म घडेल. इस्लामने जी श्रद्धापद्धती निश्चित केली आहे, त्यातूनही कृती अगर कर्म घडणे जरुरीचेच आहे. एक श्रद्धावंताने आपल्या श्रद्धेने प्रेरित होऊन चांगली कर्मे करावीत, ही मुळात त्याच्या श्रद्धेची अत्यवाश्यक मागणी आहे. जर त्याचे कर्मच बरोबर नसतील तर असे म्हणणे चुकीचे ठरणार नाही की त्याची श्रद्धाच दुर्बल आणि त्रूटीयुक्त आहे. अथवा त्याच्या श्रद्धेतच काहीतरी खोट आहे. अर्थातच श्रद्धावंत हा किती पाण्यात आहे, हे त्याच्या भल्याबुऱ्या कर्मानुसारच समजते. याचाच अर्थ असा झाला की ज्या माणसाचे कर्म चांगले, त्याची श्रद्धा मजबूत आणि जो माणूस सदाचार व नैतिकतेत कुचराई करताना दिसतो, समजा त्याची श्रद्धाच दुर्बल आणि त्रुटीयुक्त होय. कुरआनात श्रद्धेच्या विविध मागण्या स्पष्ट केल्या आहेत. उदाहरणार्थ,

"निश्चितच आपल्या नमाजमध्ये एकाग्रता असलेले लोक यशस्वी झाले. जे खोट्यापासून दूर राहतात, आपल्या लज्जास्थानांचे रक्षण करतात आपल्या पत्नीव्यतिरिक्त, ज्या त्यांच्या मालकी हक्कात आहेत."

(संदर्भ : सूरह-ए-मुअमिनून - १ ते ९)

या आयतींमध्ये नमाजीमध्ये धर्मपरायणता, एकाग्रता, दुष्कर्मांपासून स्वत:ला दूर ठेवणे, जकात (जनकल्याणास्तव आपल्या मिळकतीतून अडीच टक्के रक्कम) देणे, ईश्वरी नियमांनुसार लैंगिक बंधने पाळणे, अनामतदारी जोपासणे, दिलेले वचन पाळणे, या गोष्टी मुळात नमाजीच्या मागण्या आहेत. अर्थातच हे सदाचार मानवात नमाज पढण्यामुळे जर येत नसतील, तर मात्र अशा नमाजीला काहीच अर्थ उरत नाही. या ठिकाणी ही गोष्ट आपोआपच आपले लक्ष वेधून घेते की नमाज म्हणजेच मानवास सदाचरणाची आणि नैतिकतेची प्रेरणा देते आणि दुष्कर्मांपासून दूर राहण्याच्या भावना अगर गुणधर्म मानवामध्ये निर्माण करते. माणूस हा गुन्हेगारीपासून असा दूर पळतो, जसा तो एखाद्या संकटापासून दूर पळतो. त्याच्या अंत:करणात असलेली श्रद्धा मुळात त्याला दुष्कर्मांविषयी अगर गुन्हेगारीविषयी घृणा निर्माण करते. या गोष्टीचे स्पष्ट चित्र खाली दिलेल्या कुरआनच्या आयतीमध्ये सादर करण्यात येत आहे,

"दयाळू ईश्वराचे खरे दास ते आहेत, जे भूतलावर नम्रपणे चालतात आणि अज्ञानी त्यांच्या वाटेला आल्यास त्यांना म्हणतात की तुम्हाला सलाम, जे आपल्या पालनकर्त्यासमोर सजदे आणि कयाममध्ये रात्री व्यतीत करतात, जे प्रार्थना करतात, हे आपल्या पालनकर्ता! आम्हास नरक यातनांपासून वाचव. कारण ते खूपच विदारक आणि भयानक स्थान आहे. जे लोक खर्च करतात, ते ना फाजील खर्च करतात ना कंजूसी करतात." (संदर्भ : सूरह-ए-फुरक़ान - ६३ ते ७२)

कोण म्हणतो की, आजच्या या आधुनिक व अत्यंत प्रगत काळामध्ये मानव अहंकारास बळी पडून कमकुवत लोकांवर ना ना अत्याचार करीत नाही? या स्पर्धात्मक आणि जीवघेण्या चढाओढीच्या परिस्थितीत कोण कोणाला पायदळी चिरडत नाही? इतरांपेक्षा स्वत:ला श्रेष्ठ सिद्ध करण्यासाठी आणि आपल्या वासनांची अवैध व आघोरी भूक मिटविण्यासाठी पाण्यासारखा वारेमाप पैसा उधळण्याची आज माणसाला भयानक कीड लागली असल्याचा कोण इन्कार करू शकतो? खून, रक्तपात, चोरी, दरोडे, जुगार-सट्टे, व्यभिचार आणि लैंगिक शोषण, धोकेबाजी तसेच वायफळ सवयींना आज मानवजगत बळी पडल्याचे कोण मान्य करणार नाही? मात्र ही गोष्टही तितकीच खरी

आणि सत्य आहे की माणसाला, जर तो श्रद्धावंत असला तर, त्याचा अंतरात्मा निश्चितच त्याला या दुष्कर्मांपासून रोखतो, त्याच्यात इतरांविषयी प्रेमभाव आणि आदर निर्माण करतो, मृदू भाषेत आपल्या मानव बंधुशी स्वागत करणे, ईश्वराच्या स्मरणात रात्रीच्या एकांतात आपल्या मोक्षाची प्रार्थना करणे, वायफळ खर्च न करणे, खून, रक्तपात आणि यांसारखी दुष्कर्मे न करणे, अवैध संपत्ती कमावून इतरांवर अत्याचार करण्यासारख्या दुष्कर्मांचे नाव ऐकताच अंगावर शहारे येणे, यासारखे सदाचार आणि गुणधर्म निर्माण करण्यासाठी जी आंतरिक शक्ती असते, त्याच शक्तीचे नाव ईमान अगर श्रद्धा होय. यामुळेच समाजात आणि या समस्त विश्वात सुख, शांती आणि समाधान नांदू शकते. आनंद आणि उत्साहाचे खळखळणारे झरे वाहू शकतात. वैभवसंपन्नतेचे बहर येऊ शकतो. प्रेम, स्नेह आणि बंधुभावाचे शीतल वारे वाहू शकतात. कुरआनामध्ये याव्यतिरिक्त बऱ्याच ठिकाणी एका श्रद्धावंताकडून ईमान अगर श्रद्धेच्या प्रेरणेमुळे घडणारे कोणते व कशा प्रकारचे आचरण अभिप्रेत आहेत, याचा उल्लेख करण्यात आला आहे. उदाहरणार्थ, कुरआनात एके ठिकाणी म्हटले आहे,

"हे श्रद्धावंतांनो! हा वरच्यावर वाढणारे व्याज खाणे सोडून द्या आणि ईश्वराचे भय बाळगा. आशा आहे की, तुम्ही यशस्वी व्हाल."

(संदर्भ : सूरह-ए-आलि इम्रान - १३०)

"हे श्रद्धावतांनो! आपसांमध्ये एक दुसऱ्यांची संपत्ती चुकीच्या मार्गाने (अवैध मार्गाने) खाऊ नका."

(संदर्भ : सूरह-ए-निसा - २९)

"हे श्रद्धावंतांनो! ही दारु आणि सट्टा व जुगार सर्व गलिच्छ आणि सैतानी कर्म आहेत. यापासून दूर राहण्याचे पथ्य पाळा. आशा आहे की तुम्ही यशस्वी व्हाल."

(संदर्भ : सूरह-ए-माइदा - ९०)

याशिवाय प्रेषितवचनांमध्येसुद्धा हे बऱ्याचवेळा स्पष्ट करण्यात आले आहे, ईमानधारकांचे अर्थात श्रद्धावंतांचे आचरण कसे असायला हवे. उदाहरणार्थ, एकदा प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे की असा माणूस सच्चा मोमिन अर्थात सच्चा श्रद्धावंत असूच शकत नाही, जो इतरांना त्रास देतो. आणखीन एका प्रसंगी प्रेषित मुहम्मद (स.) म्हणाले, "असा माणूस श्रद्धावंत असूच शकत नाही, ज्याचा शेजारी त्याच्या उपद्रवामुळे त्रस्त असेल." आणखीन एकदा प्रेषित (स.) म्हणाले, "ईमान (श्रद्धा) आणि द्वेष व वैरभाव एका ठिकाणी राहूच शकत नाहीत. (जसे आग व पाणी एकेठिकाणी

राहू शकत नाहीत)'' आणखीन एकेठिकाणी म्हणाले, ''श्रद्धावंत हा खोटा असूच शकत नाही.'' आणखीन एकदा म्हणाले, ''तो माणूस श्रद्धावंत असूच शकत नाही, जो इतरांच्या अनामती अगर ठेवी हडपून बसतो.'' आणखीन एकदा म्हणाले, ''श्रद्धावंत माणूस हा तोच असू शकतो, जो लोकांशी मिळून-मिसळून गुण्यागोविंदाने राहतो.'' एकदा प्रेषित मुहम्मद (स.) यांनी असेदेखील म्हटले की, ''ईमान (श्रद्धा) च्या सत्तरपेक्षाही जास्त शाखा आहेत व उच्चतम दर्जाची शाखा ही एकेश्वरवादाच्या सूत्राचे स्मरण करणे असून सर्वांत कमी दर्जाची शाखा ही आहे की रस्त्यातील अडसर वस्तु अगर लोकांना इजा पोचविणारी वस्तु दूर सारणे होय. तसेच लाजलज्जासुद्धा श्रद्धेचीच शाखा आहे.'' आणखी एकदा असेही म्हटले आहे, ''श्रद्धावंत हा इतरांची मने दुखावणारा, टर उडविणारा, इतरांचा अपमान करणारा, शिवीगाळ करणारा नसतोच.'' एकूणरित्या असे की या समस्त बाबींवरून हे निश्चितच लक्षात येते की श्रद्धा ही गुन्हेगारी निर्मूलनाचा भक्कम पाया असून याशिवाय गुन्हेगारीचे निर्मूलन शक्यच नाही. एखादी आई आपल्या मुलास म्हणते की तू जर खरेच माझा मुलगा असशील तर अभ्यास करशील आणि आपल्या आईच्या आदरास्तव तो कोणाचाही धाक नसताना तिचे म्हणणे ऐकतो. तसेच आई आपल्या मुलास म्हणते की उन्हातान्हात फिरू नकोस, सावलीत खेळ. मुलगाही आपल्या आईचे म्हणणे ऐकतो. कारण मुलगा हा आपल्या आईचा शेवटी मुलगाच! येथेही नेमका असाच प्रकार आहे. मानव हा ईश्वराचीच निर्मिती, मानवासाठीच ईश्वराने काही नियम घालून दिले आहेत. ते मानवहितासाठीच, ईश्वरसुद्धा मानवास म्हणतो की तू जर माझा सच्चा दास असशील तर सदाचरणाचा अंगीकार कर, तर मानवसुद्धा ईश्वराची आज्ञा पाळून आपण त्याचे सच्चा दास असल्याचे सिद्ध करतो. तसेच ईश्वर म्हणतो की अपराधी कर्मांच्या उन्हातान्हात जीवनाशी खेळ खेळू नकोस, सदाचाराच्या सावलीतच जीवन जग आणि शांती व समाधानाने जग व इतरांनाही जगू दे, आपण कमावलेल्या भाकरीतून दोन घास त्यांनाही दे, त्यांच्याबरोबर गुण्यागोविंदाने खेळ, भांडणे करू नकोस, रक्तपात माजवू नकोस, तेव्हा माणूससुद्धा स्वतःला ईश्वरासमोर त्याचा सच्चा दास सिद्ध करण्यासाठी त्याच्याच मर्जीचे सानंद पालन करतो.

## ४.२) इस्लामची जीवनकल्पना व गुन्हेगारी निर्मूलन

वर्तमानकाळात गुन्हेगारी कृत्यांमागे एक मोठी सबब हीसुद्धा आहे की मानवाजवळ या जीवनाची एखादी स्पष्ट कल्पना नाही, त्याच्या जीवनाचा कोणताच हेतु अथवा उद्दिष्ट त्याच्यासमोर नाही. बस केवळ जगायचे म्हणून तो जगतो आहे. का

जगायचे, हे त्याला निश्चित माहीतच नाही. कशासाठी जगायचे, हेही त्याला माहीत नाही. म्हणूनच तो आज दिशाहीन झाला. जगण्याची दिशादेखील त्याला समजत नाही. या कारणास्तव मौज-मजा, ऐशआराम आणि आपल्या स्वैर अभिलाषा व वासनांच्या मागे तो सैरावैरा धावत आहे. केवळ चंगळवादच आज त्याच्यासाठी सर्वकाही आहे. त्याच्या या स्वैर कामना आणि भावनांच्या धगधगत्याज्वालांत पाश्चिमात्य संस्कृतीने आणखीनच तेल ओतले आणि परिणामी तो अप्पलपोटा आणि लिंगपिसाट होऊन सैरावैरा पळतच सुटला आहे. मात्र या धावपळीला कोठेच विश्राम नसतो, कोणताही थांबा नसतो आणि कोणतीही मर्यादा नसते. अर्थातच या हावरटपणामुळे स्पर्धा सुरु झाली, या सैरावैरा धावण्याच्या स्पर्धेत माणसे एकदुसऱ्याच्या पायांत पाय अडकवून पडू लागले. रस्त्यात येईल त्याला निर्दयीपणे तुडवू लागले. रक्तपात करू लागले, इतरांच्या संपत्ती आणि अधिकारांवर डल्ला मारू लागले आणि मग सर्वत्र गुन्हेगारी बोकाळली.

मात्र इस्लामने म्हटले की मानवाचे जीवन हे व्यर्थ आणि उद्दिष्टहीन नाही. मानवास अस्तित्व प्रदान करण्यापूर्वीच ईश्वराने मानवजीवनाचे एक उद्दिष्ट ठरविले. त्याच्या जीवनाची दिशाही ठरविली, त्याच्या प्रत्येक पावलाचे नियमही दिले. एवढेच नव्हे तर जीवनाची रीतसर वाटचाल करण्यासाठी पाऊलखुणाही प्रेषितांमार्फत तयार करून ठेवल्या आणि जीवनमार्गाचे अंतिम लक्ष्यही ठरवून दिले. म्हणजेच हे ऐहिक जीवन मानवाची परीक्षाच होय. पाऊलखुणांवरच आणि ठरवून दिलेल्या दिशेने जीवनाची वाटचाल करण्याची ही परीक्षा आहे. यात सफलता मिळाली तर समजा लक्ष्य प्राप्ती होईल. जीवन म्हणजे कर्मस्थान, ईश्वराने नेमून दिलेल्या नियमांनुसार कर्म करण्याचीच परीक्षा ईश्वर घेत आहे. सद्कर्म घडले तर ईश्वर प्रसन्न आणि दुष्कर्म घडले तर भयंकर परिणामांची गुणपत्रिका डाव्या हाती येईल. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"तोच (ईश्वर) आहे, ज्याने आकाश आणि पृथ्वी व ग्रह-ताऱ्यांना सहा दिवसांत निर्माण केले, जेव्हा त्याचे सिंहासन यापूर्वी पाण्यावर होते, जेणेकरून तुमची परीक्षा घ्यावी की तुमच्यापैकी कोण चांगले कर्म करतो."
(संदर्भ : सूरह-ए-हूद - ७)

आणखीन एके ठिकाणी ईश्वराने म्हटले आहे,

"त्याने (ईश्वराने) मृत्यू आणि जीवन निर्माण केले, जेणेकरून तुमची परीक्षा घ्यावी की तुमच्याऐकी कोण चांगले कर्म करणार आहे. तो अत्यंत जबरदस्त आणि खूप क्षमाशीलही आहे."
(संदर्भ : सूरह-ए-मुल्क - २)

## मानवपरीक्षणाची साधने

ईश्वराने मानवाची निर्मितीच मुळात त्याची परीक्षा घेण्यासाठी केली आहे. मानव प्रत्येक क्षणी आणि प्रत्येक अवस्थेत परीक्षार्थी आहे. तो या जीवनात सुखी असो वा दुखी असो, गरीब असो वा श्रीमंत असो, तो शेवटी परीक्षार्थी आहे. हे संपूर्ण ऐहिक जीवनच त्याच्यासाठी परीक्षाकाळ आहे. येथील प्रत्येक सुखसाधने त्याच्या परीक्षेकरिताच आहे. प्रत्येक प्रलोभन त्यास सफलतेपासून दूर करण्याचे कार्य करीत आहे. येथील समस्या आणि संकटग्रस्त परिस्थिती त्याला त्याच्या अंतिम लक्ष्यापासून दूर करण्याचे कार्य करीत आहे. मात्र कोणत्याही प्रलोभनास बळी न पडता आणि कोणत्याही संकटास न घाबरता त्याला जीवनमार्ग पार करून आपली अंतिम मजल गाठायची आहे. हीच त्याची परीक्षा होय.

### १) जगातील सौंदर्य व सुखसमृद्धीद्वारे परीक्षण

एकीकडे ईश्वराने मानवास कर्मसामर्थ्य देऊन म्हटले की मी प्रदान केलेल्या विधानावर जीवन व्यतीत कर, मी दाखविलेल्या मार्गानेच जीवनाची वाटचाल कर. तर दुसरीकडे मात्र हे जग ना-ना प्रकारच्या आकर्षक आणि सुंदर व मनाला भुरळ पाडणाऱ्या दिलखेच भोगवस्तूंनी सुशोभित करण्यात आले. कुरआनात म्हटले आहे,

"लोकांसाठी चित्ताकर्षक स्त्रिया, संपत्ती, सोन्या-चांदीचे ढिगारे, उत्तम घोडे, गुरे-ढोरे आणि सुपीक जमिनी खूप आकर्षक बनविण्यात आल्या आहेत. मात्र हे सर्वकाही ऐहिक जीवनातील काही दिवसांसाठीची समृद्धी आहे. वस्तुतः जे उत्तम ठिकाण आहे, ते ईश्वराजवळच आहे." (संदर्भ : सूरह-ए-आलिइम्रान - १४)

या सर्व भोगवस्तु मानवाच्या लाभासाठीच निर्माण करण्यात आल्या आहेत. मात्र केवळ लाभासाठीच नव्हे तर या भोगवस्तु आणि समृद्धी देऊन ईश्वराने मानवाची परीक्षा घेण्याचे ठरविले आहे की, कोण या सौंदर्यसामुग्री, सुंदर व आकर्षक स्त्रिया आणि भोगवस्तु ईश्वराच्या नियमांनुसार वापरतो आणि कोण या चित्ताकर्षक व क्षणभंगूर भोगवस्तुंमध्ये गुरफटून ईश्वराचे नियम विसरून जीवन जगतो. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"वास्तविकता अशी आहे की जी काही सामुग्री या भूतलावर आहे, तिला आम्ही (ईश्वराने) जगाचे सौंदर्य बनविले आहे, जेणेकरून लोकांची परीक्षा घ्यावी की, कोण ईश्वरी नियमांनुसार जीवन जगतो." (संदर्भ : सूरह-ए-कहफ़ - ७)

## २) जीवनमानातील फरकसुद्धा परीक्षाच आहे.

निश्चितच या जगात अमाप सुख-साधने आणि भोग-वस्तु उपलब्ध आहेत, मात्र त्या सर्वांनाच समप्रमाणात प्राप्त नाहीत. या जगात कोणी श्रीमंत आहे तर कोणी दारिद्र्यात जीवन कंठित आहे, कोणी मोठमोठ्या इमारतीत राहतो तर कोणाला डोके लपवायला वितभर जागा नाही. कोणी पहिलवान आहे, तर कोणी करमकडा आहे. कोणाला प्रचंड बुद्धीसामर्थ्य आहे तर कोणी बुद्धु आहे. एकूणरित्या सर्वांचीच परिस्थिती विषम आहे. येथे प्रत्येकास समान वाट्याची सुखसामुग्री प्राप्त नाही. तेव्हा हा प्रश्न निश्चितच भेडसावणारा आहे की, सर्वांना समान सामुग्री प्राप्त नसल्याचे कारण काय असावे? याचे उत्तर ईश्वराने कुरआनात स्पष्ट करताना म्हटले आहे,

"तुमच्यांपैकी काहींना काहींच्या तुलनेत अधिक उच्च दर्जे बहाल करण्यात आले ज्यायोगे जे काही तुम्हाला दिले आहे, त्यात तुमची परीक्षा घ्यावी, नि:संशय तुमचा पालनकर्ता शिक्षा देण्यातही सत्वर आहे आणि फार क्षमाशील व दया करणारादेखील आहे." (संदर्भ : सूरह-ए-अनआम - १६५)

## ३) समस्या आणि संकटेसुद्धा परीक्षा आहे

केवळ विषम स्वरुपात साधने प्राप्त नाहीत, एवढेच नव्हे तर काही लोक या ठिकाणी बऱ्याच समस्यांच्या परीक्षणात सापडलेले असतात. दुष्काळ, उपासमार, संसर्गजन्य रोगराई, तंटे-बखेडे, गरिबी व दारिद्र्य, मानसिक ताणतणाव आणि याशिवाय वैयक्तिकरित्या अपघात, व्याधी, म्हातारपण, मृत्यू वगैरेसारख्या समस्यांच्या विळख्यात असंख्यजण जखडलेले आहेत. कुरआनाने म्हटले की, हेसुद्धा माणसाची परीक्षाच आहे.

"आणि आम्ही तुम्हाला अवश्य भीती, उपासमार, प्राण व संपत्तीची हानी आणि मिळकतींमध्ये तोटा आणून तुमची परीक्षा घेऊ की, या (परीक्षणा) मध्ये जे लोक संयम बाळगतील, त्यांना (मोक्षप्राप्तीची) शुभवार्ता द्या." (संदर्भ : सूरह-ए-बकरा - १५५)

वरील मजकुरात स्पष्ट करण्यात आलेली जीवनाची वास्तविक कल्पना जर कोणासमोर असेल तर तो अपराधी कर्मांकडे वळू शकत नाही. जर एखादा श्रीमंत असेल तर तो नक्कीच समजेल की त्याची ही धनदौलत कोणासाठी आणि कशासाठी आहे. तसेच जर कोणी दरिद्री वा गरीब असेल तर त्यालाही हे समजेल की हे दारिद्र्य आणि गरिबीसुद्धा आपली परीक्षाच आहे आणि या बिकट परिस्थितीतसुद्धा तो संयम व धीर आणि सत्याची कास सोडणार नाही. श्रीमंत हा श्रीमंतीस ईश्वराच्या परीक्षणाचे साधन समजून कधीच वाट भटकणार नाही. श्रीमंतीच्या झिंगेत कधीच कोण्या दुर्बलावर

अत्याचार करणार नाही. तो कधीच व्यभिचार करणार नाही. दिशाहीन वासना आणि अभिलाषांना बळी पडून कधीच पैशांची निर्दयीपणे उधळपट्टी करणार नाही. गरिबांच्या कल्याणासाठी आपल्या संपत्तीतून ईश्वरी नियमानुसार यथायोग्य खर्च करील. इतरांना हीन व तुच्छ भावनेने पाहणार नाही. त्याचप्रमाणे एखादा दरिद्री आणि गरीब वा कसल्याही स्वरुपाची दुर्बल व्यक्ती संकटांना घाबरून आत्महत्या करणार नाही. दोन घास मिळविण्यासाठी चोरी, डाका व इतर कोणताही अवैध व्यवहार करणार नाही. कोणाशीही इर्ष्या बाळगणार नाही. उच्च-मूल्यांची जोपासना करून त्यात वृद्धी करेल. इस्लामने जीवनाचे जे वास्तविक दर्शन घडविले आणि जीवनाची जी कल्पना सादर केली, ती अपराध निर्मूलनासाठी खरोखरच जादूची कांडी आहे. रामबाण उपाय आहे. हा उपाय आज सर्व जगाला नितांत गरजेचा आहे.

## ४) इस्लाममध्ये यशाची कल्पना

मानव तारुण्याच्या उंबरठ्यावर पाऊल ठेवताच आपले जीवन यशस्वी करण्याची, भविष्य बनविण्याची आणि जास्तीतजास्त सुखसाधने प्राप्त करण्याची धावपळ सुरु करतो. साधन-सामुग्री प्राप्त झाली की जीवनात यश मिळेल, असा त्याचा समज होतो. जीवनात चांगल्या रीतीने जगायचे असेल आणि प्रगती करायची असेल तर साधन-सामुग्री आपल्या ताब्यात असावी, हे त्याला मनोमन वाटत असते. म्हणून याकरिता तो वाटेल ते करतो आणि वाटेल त्या मार्गाचा अवलंब करतो. वैध-अवैध, चांगले-वाईट, नैतिक-अनैतिक वगैरे सर्वच प्रकार हताळतो. जीवनात काही यश मिळविण्यासाठी आणि मोठा माणूस होऊन मिरविण्यासाठी बिनधास्तपणे गुन्हेगारीच्या मार्गाने जीवनाची वाटचाल करतो. जीवनात यशस्वी होण्याची हीच ती चुकीची आणि निराधार कल्पना आहे, जी माणसाला अपराधी कर्म करण्यासाठी प्रेरित करते.

यश हे प्रत्येकालाच हवे असते आणि प्रत्येकजण त्याच्या मागे धावत सुटतो. मात्र इस्लामने ही वास्तविकता समोर मांडली आहे की या भौतिक साधनसामुग्रींच्या आधारे मिळणारे यश हे वास्तविक यश नसून मानवाचे खरे यश हे ईश्वराची प्रसन्नता आणि स्वर्गप्राप्ती व नरकाग्नीपासून मुक्ती होय. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"तुम्ही सर्वजण आपापले पुरेपूर मोबदले अंतिम निवाड्याच्या दिवशी प्राप्त करणार आहात. यशस्वी खऱ्या अर्थी तोच आहे, जो तेथे नरकाग्नीपासून वाचेल व स्वर्गात दाखल करण्यात येईल. उरले हे जग, तर ही केवळ एक भुरळ पाडणारी बाब आहे."

(संदर्भ : सूरह-ए-आलि इम्रान - १८५)

आणखीन एके ठिकाणी म्हटले आहे,

"त्या पुरुष आणि स्त्रियांना ईश्वराने वचन दिले आहे की तो त्यांना अशी बाग देईल ज्यात झरे वाहत असतील आणि ते त्यात नेहमीच राहतील. या सदाबहार बागांमध्ये त्यांच्यासाठी निवास असतील." (संदर्भ : सूरह-ए-तौबा - ७२)

इस्लामने हेसुद्धा सांगितले की ऐहिक आणि पारलौकिक जीवनात यश संपादन करण्याच्या अटी आणि शर्ती काय आहेत. अर्थातच या अटी म्हणजे श्रद्धा आणि सदाचार, ईशपरायणता, कुरआन आणि प्रेषित-जीवनचरित्रानुसार जीवन जगणे, सदाचाराचा आदेश देणे आणि दुराचारांपासून रोखणे होय. याउलट अनेकेश्वरवाद, मूर्तीपूजा, ईशद्रोह, दंभ, पारलौकिक जीवनाचा इन्कार करणे, सैतानी कर्म करणे, स्वैर कामनांची अवैधरित्या पूर्तता करणे, अर्थातच गुन्हेगारी करणे, या गोष्टी माणसाला यशापासून दूर ठेवतात.

## ४. ३) गुन्हेगारी निर्मूलनात इस्लामी भक्तीची भूमिका

इस्लाम हे केवळ काही श्रद्धा आणि विचारसरणी आत्मसास करण्याचे नाव नसून या श्रद्धा आणि विचारसरणी माणसाला सदाचारासाठी प्रेरित करतात. त्याच्यावर योग्य आचरण करण्याची जवाबदारी टाकतात. या जवाबदाऱ्यांचे दोन प्रकार करण्यात आले आहेत. प्रथम प्रकार म्हणजे ईश्वराप्रति मानवाची जवाबदारी आणि द्वितीय प्रकार म्हणजे मानवाची मानवाप्रति जवाबदारी होय. प्रथमोल्लेखित जवाबदारी पूर्ण करण्यासच ईश्वराची भक्ती वा पूजा म्हणतात. म्हणजेच ईश्वराचा मानवावरील हा अधिकार होय. तसेच द्वितीयोल्लेखित जवाबदारी म्हणजे मानवाचा मानवांप्रति अधिकार, अर्थातच मानवांचे अधिकार पूर्ण करणे होय. या जवाबदारीचा संबंध नैतिकता, सद्व्यवहार, इतरांचे अधिकार पूर्ण करणे होय. या ठिकाणी आपण प्रथम प्रकार म्हणजे ईश्वराची भक्ती व पूजासंबंधी चर्चा करु या. यामध्ये नमाज, रोजा (इस्लामी उपवास), जकात (अडीच टक्के जनकल्याण निधी देणे) आणि हज या उपासना पद्धती आहेत. या भक्ती वा उपासना विविध पद्धतीने करण्यात येतात. काही उपासना शारीरिक आणि काही आर्थिक तर काही शारीरिक व आर्थिक या दोन्ही स्वरुपाच्या आहेत. या भक्ती अगर उपासनांचा हेतु हा केवळ ईश्वराची प्रसन्नता प्राप्त करणे होय. मात्र ईश्वराने आपल्या प्रत्येक उपासना-कर्मात मानवहित ठेवले आहे. यामुळे केवळ ईशप्रसन्नता लाभून मोक्षच प्राप्त होते असे नव्हे तर, याचा सर्वांत मोठा ऐहिक फायदा असा आहे की, माणसाचे

अंत:करण अत्यंत प्रभावित होते आणि त्यास सदाचरणाची प्रेरणा तर मिळतेच, शिवाय त्याच्या मनात दुष्कर्मांविषयी घृणा निर्माण होते आणि याच अवस्थेमुळे त्याची पावले इष्ट मार्गावर आपोआप पडू लागतात, दुराचार त्याला आपल्या जीवनमार्गातील विषारी काटे वाटू लागतात आणि मग तो या विषारी काट्यांतून स्वत:चा बचाव करीत मार्ग काढीत वाटचाल करून आपले अंतिम लक्ष्य गाठतो. गुन्हेगारीचे निमूर्लन होण्यासाठी या उपासनापद्धती कशी भूमिका निभावतात, यावर आता आपण मुद्देसूद चर्चा करणार आहोत.

## अ) नमाज

इस्लामी उपासनापद्धतींमध्ये सर्वांत जास्त महत्त्व हे नमाज पढण्यास म्हणजेच ईश्वरासमोर आपले सर्वस्व अर्पण करण्याचा सराव होय. यासाठीच ईशप्रार्थनेस इस्लाममध्ये सर्वांत जास्त महत्त्व आहे. नमाज पढणे हे सर्वांवरच अनिवार्य आहे. नमाज कोणालाही माफ नाही. माणूस कोणीही असो आणि कशाही परिस्थितीत असो, त्याला दिवसाकाठी पाच वेळा नमाज पढणे आवश्यक आहे. अर्थातच नमाज पढण्याचे पाच वेळांचे वेळापत्रक स्वत: ईश्वरानेच निश्चित करून दिले आहे. याच्या सर्व अटी आणि शर्ती, तसेच पद्धतींसुद्धा ईश्वरानेच ठरवून दिलेल्या आहेत. नमाज पढण्यासाठी शुचिर्भूतता प्राप्त करण्यासाठी वुजू (चेहरा व हात-पाय धुणे) करावे लागते. मग यानंतर नमाजमध्ये कुरआनातील काही आयती अनिवार्यरित्या पठण कराव्या लागतात. नमाजमध्ये माणूस स्वत:स ईश्वरासमोर तन-मन-धनाने समर्पित करतो. हा रोजचाच सराव असल्याने माणूस ईश्वरी महिमत्व आणि आदेश कधीच विसरत नाही. म्हणून या रोजच्या सरावामुळे त्याच्या मनात ईशपरायणता निर्माण होते, ईश्वराचा दास असल्याची भावना दृढ होते. हीच ईशपरायणता आणि दासत्वाची भावना त्यास ईश्वरी मर्जी अथवा आदेशावर जीवन जगण्यासाठी प्रेरित करते. अशा परिस्थितीत माणूस गुन्हेगारी कर्मांकडे वळतच नाही. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"निश्चितच नमाज अश्लीलता आणि दुष्कर्मांपासून (माणसाला) दूर ठेवते."

(संदर्भ : सूरह-ए-अनकबूत - ४५)

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी पण म्हटले आहे, "जी नमाज माणसाला अश्लीलता आणि दुष्कर्मांपासून रोखत नाही, ती मुळात नमाज नाहीच, शिवाय अशी नमाज मानवास ईश्वरापासून दूर करते."

## आ) रोजा

रोजा हा इस्लामी उपासनांपैकी एक महत्त्वाचा स्तंभ आहे. यामुळे माणसाची आत्मशुद्धी तर होतेच, शिवाय माणसाचे २४ तास ईश्वरी आदेशांनुसार व्यतीत होतात. या विधीमध्ये माणूस सहरी (सकाळ उगवण्यापूर्वीची न्याहरी) पासून ते इफ्तार (उपवास सोडण्याची सूर्य मावळल्यानंतरची विधी) पर्यंत अन्न, पाणी आणि लैंगिक संबंधापासून अत्यंत संयमाने स्वत:ला रोखतो. हादेखील ईश्वरी मर्जीवर आपले जीवन व्यतीत करण्याचा एक जबरदस्त सराव होय. म्हणजेच रोजा हा ईश्वराचे भय अर्थात ईशपरायणता आपल्या आचरणी आणण्याचे एक प्रभावी माध्यम आहे. यामुळे शारीरिक शुद्धीबरोबर आत्मशुद्धीसुद्धा प्राप्त होते. या अवस्थेमुळे माणूस प्रत्येक क्षणी आपले प्रत्येक कर्म सत्य व असत्याच्या तराजूत तोलून पाहते आणि सत्य तेच आचरणी आणतो. ईश्वराची मर्जी डावलण्याचे धैर्य तो करीत नाही. यालाच ईश्वराचे भय म्हणतात. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"हे लोकहो! ज्यांनी श्रद्धा ठेवली, तुमच्यावर रोजे ठेवण्याची उपासना अनिवार्य करण्यात आली, ज्याप्रमाणे तुमच्या पूर्वीच्या प्रेषितांच्या अनुयायांवर अनिवार्य करण्यात आली होती. आशा आहे की तुमच्यात ईशपरायणता येईल."

(संदर्भ : सूरह-ए-बकरा - १८३)

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे, "जो माणूस रोजा असण्याच्या अवस्थेतही खोटे बोलणे आणि खोटा व्यवहार वा दगाबाजीचे आचरण सोडीत नाही, अशा माणसाच्या उपाशीपोटी राहण्याची ईश्वराला काहीच गरज नाही."

(संदर्भ : प्रेषितवचन ग्रंथ - बुखारी)

रोजामुळे माणसाच्या अंगी प्रचंड संयमशक्ती येते. आपल्या स्वैर भावना आणि वासनांवर ताबा मिळविण्याची शक्ती प्राप्त होते, त्याचबरोबर ईश्वरी आदेशानुसार जीवन जगण्याचे सामर्थ्य प्राप्त होते. वर्तमानकाळात वासनांधता, स्वैर अभिलाषा, द्वेष, मत्सर आणि अहंकार व इतरांचे शोषण करण्याचे दुष्कृत्य सर्वत्र माजले असताना 'रोजा'पेक्षा चांगला उपाय सापडणे शक्य नाही.

## इ) जकात

'जकात' हीसुद्धा उपासना अनिवार्य आहे. जकात म्हणजेच प्रत्येक धनसंपन्न व्यक्तीने आपल्या वार्षिक मिळकतीमधून एक ठराविक वाटा अशा लोकांना देणे असते, जे काही कारणास्तव आर्थिक दुर्बल असतात. ही गोष्ट नाकारण्याची आज कोणत्या विचारवंतात अगर सामाजिक तज्ञात आहे की, माणूस अपुऱ्या अर्थार्जनामुळे लाचार

आणि विवश होऊन आपली जीवनावश्यक गरज भागविण्यासाठी चोरी, डकाइती आणि लूटमार वा देहविक्रीसारख्या गुन्हेगारीस बळी पडतो! मात्र 'जकात'सारखे कर्म हे इस्लामने अनिवार्य उपासना आणि भक्ती ठरवून समाजात माजणारे उपद्रव समूळ नष्ट करण्याचे विक्रमी कार्य यशस्वीपणे करून दाखविले. आर्थिक दुर्बल आणि गोरगरिबांना जकात मिळाल्यास समाजात प्रेम, स्नेह आणि बंधुभाव आणि नैतिक मूल्ये जोपासली जातात. श्रीमंताविषयी गरिबांच्या मनात धुमसत असलेली इर्ष्या आणि हेवा व द्वेश आणि मत्सर नाहीसा होतो. शिवाय जकात देणे म्हणजे इतरांवर उपकार करणे नसून स्वत:वरच उपकार करणे होय. कारण ईश्वराने कुरआनात स्पष्टपणे म्हटले आहे,

"हे प्रेषिता! तुम्ही त्यांच्या संपत्तीमधून सदका (दान धर्माची रक्कम) घेऊन ती संपत्ती पावन करा आणि त्यांच्यात (पुण्यकर्मात) वृद्धी करा."

(संदर्भ : सूरह-ए-तौबा - १०३)

हे सत्य आज कोणीच नाकारू शकत नाही की माणूस हा संपत्तीप्रेमी आहे. संपत्तीचे तीव्र आकर्षण त्याच्या स्वभावातच आहे. याच आकर्षणामुळे माणसात हव्यास, कंजूसी, आणि यासारखे नैतिक रोग जडतात. या नैसर्गिक रोगांतूनच असंख्य अपराधी-कर्मांचा उद्रेक होतो. मात्र आर्थिक सबळजणांनी जर गोरगरिबांना जकात दिली तर निश्चितच या अपराधी कर्मांचा नायनाट होतो. दुसरीकडे समाजातील धनसंपन्न लोकांनी जकात दिली तर समाजातून गरिबी आणि दारिद्र्याचा कलंक नष्ट होतो आणि परिणामी त्यांना अपराधांकडे वळण्याचा मार्ग बंद होतो. गरिबी आणि दारिद्र्यामुळे त्रस्त होऊन आणि बेरोजगारीमुळे वैतागून समाजाचा जो वर्ग गुन्हेगारी करतो, चोऱ्या, डकाईती, मादक पदार्थांची विक्री, देहव्यापार आणि रक्तपातासारखे अपराध करण्यास प्रेरित होतो, तो वर्ग निश्चितच अशी गुन्हेगारी करणार नाही. म्हणूनच इस्लामने जकात ही उपासना अनिवार्य आणि बंधनकारक ठरविली आहे.

## ई) हज

हज करण्याची विधी ही शारीरिक व आर्थिक या दोन्ही प्रकारची उपासना आहे. ही उपासनासुद्धा आर्थिक सबळ माणसावर बंधनकारक आहे. काबागृहाचे म्हणजेच ईश्वराच्या घराचे दर्शन करण्यासाठी माणूस आपल्या घामाची कमाई खर्च करतो आणि प्रवासात येणाऱ्या अडचणी व त्रास सहन करतो. हे सर्वकाही ईश्वराच्या प्रसन्नेसाठीच माणूस करतो. हज करणे म्हणजे एखाद्या जत्रेत जाऊन मौजमजा करणे नसून ही एक उच्च आणि गंभीर उपासना आहे. इतर उपासनांप्रमाणेच यामध्येसुद्धा

ईश्वरी नियमांचे तंतोतंत पालन करणे आवश्यक असते. ही विधी पूर्ण होईपर्यंत जमिनीवरील गवताची एक काडीसुद्धा उपटता येत नाही. अशा तंतोतंतपणे ईश्वरी नियमांचे पालन करणारी कोणतीही व्यक्ती बरे इतर बाबतीत ईश्वरी नियमांची अवहेलना कशी काय करणार? ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"जो माणूस (ईश्वराने) निश्चित केलेल्या महिन्यामध्ये 'हज' करण्याचा मानस करतो, त्याने या गोष्टीची पूर्ण खबरदारी बाळगायला हवी की हजच्या पूर्ण कालावधीमध्ये त्याने कोणतेही कर्म लैंगिक वासनांना बळी पडून करू नये, कोणतेही दुष्कर्म करू नये, कोणत्याही प्रकारचे भांडण तंटे व लढाई करू नये, जे पुण्यकर्म तुम्ही कराल, त्याची ईश्वराला खबर आहे." (संदर्भ : सूरह-ए-बकरा - १९७)

अख्ख्या जगभरातून लोक 'हज' करण्यासाठी येतात, सर्वांचा पोषाख सारखाच असतो, सर्वचजण एकाच आवाजात एकच प्रार्थना म्हणतात, यामुळे सर्व लोकांचे अंत:करण समानता, बंधुभाव आणि स्नेह व प्रेमाने ओतप्रोत होते. जणू हज हे जागतिक बंधुभावाचे प्रमाणसिद्ध प्रतीकच आहे. यामुळे प्रांत, वर्ण, वंश आणि भाषावर आधारित असलेला भेदभाव नष्ट होतो, द्वेष आणि मत्सराच्या भिंती जमीनदोस्त होतात, समाजातील दुही नष्ट होते, जागतिक बंधुभाव निर्माण होतो. प्रत्येक देशाचा आणि प्रत्येक प्रांत व प्रत्येक भाषेचा माणूस या ठिकाणी आपली पूर्ण ओळख विसरून केवळ माणूस बनतो. अर्थातच माणूस या नात्याने विश्वातील प्रत्येक मानवास आपला बंधु समजतो. मग असा माणूस इतरांवर अन्याय, अत्याचार करूच शकत नाही. इतर माणसांचे रक्त सांडणार नाही. इतरांचे शोषण मुळीच करणार नाही.

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले की जो माणूस एकूण नियमांचे तंतोतंत पालन करीत हज करतो, त्याचे समस्त पाप नष्ट होतात. प्रेषितांचे शब्द अशा प्रकारचे आहेत.

"ज्या व्यक्तीने ईश्वराच्या प्रसन्नतेखातर 'हज' केला आणि हे करताना कोणतेही दुष्कर्म आणि दुराचार केले नाही, तर ती व्यक्ती अशाप्रकारे पापमुक्त होऊन आली, जणू ती मातेच्या पोटातून निष्पापपणे जन्मली." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह-बुखारी)

## इस्लामी उपासनांसंबंधी एक लक्षणीय बाब

इस्लामी उपासनांसंबंधी एक बाब येथे लक्षणीय होय की 'नमाज' ही अश्लीलता आणि दुष्कर्मांपासून रोखते, रोजासंबंधी म्हटले गेले की त्यामुळे ईशपरायणता येते व आत्मशुद्धी होते. जकात दिल्याने पावित्र्य तसेच हजमुळे मोक्ष प्राप्त होतो. अर्थात सर्व पाप धुतले जातात. यावरून स्पष्ट होते की या सर्वच बाबी गुन्हेगारीचे निर्मूलन करण्यास सहाय्यक ठरतात. येथे ही बाबसुद्धा लक्षणीय आहे की, नमाज ज्या

बाबींपासून रोखते, इतर माध्यमांनी त्यापासून मानवास रोखता येत नाही, रोजामुळे जी ईशपरायणता येते, ती इतर कोणत्याही गोष्टीमुळे येत नाही. जकातमुळे जे पावित्र्य लाभते, ते इतर कशानेच शक्य नाही. हजमुळे जे पाप नष्ट होतात, इतर कोणत्याच गोष्टीने होत नाहीत. म्हणून या सर्वच उपासनांचे एक आपले महत्त्व आणि वैशिष्ट्य आहे. त्याचप्रमाणे गुन्हेगारी निर्मूलनासाठी या सर्वच उपासनांची गरज आहे. कोणतीही एकच उपासना अगर काही निवडक उपासना करून ते सर्वकाही साध्य होऊ शकत नाही जे या सर्व उपासनांमुळे साध्य होते.

## ४.४) इस्लामची नैतिक शिकवण

इस्लामी उपासनांमुळे गुन्हेगारीचे कशाप्रकारे निर्मूलन होते, ते आपण उपरोक्त मजकुरात पाहिलेच आहे. याशिवाय इस्लामने प्रत्यक्षात काही अशा नैतिक शिकवणी दिल्या आहेत, ज्यामुळे माणसाच्या शिरावर केवळ नैतिकतेचे सुंदर मुकुटच येत नसून पूर्णपणे गुन्हेगारीचा समूळ नायनाटसुद्धा होतो. ज्या समाजात उच्च नीतीमूल्यांची जोपासना होते, तो समाज गुन्हेगारीपासून मुक्त होतो आणि तेथे शांती, समृद्धी आणि वैभवाचे शीतल वारे वाहू लागतात. वर्तमानकाळात नैतिकतेचा जो किळसवाणा ऱ्हास होऊन आणि मानवी मूल्ये पायदळी तुडवून समाज अपराधी वृत्तीच्या जुलमी जबड्यात जसा आवळला गेला आहे, त्यातून इस्लामी नैतिक शिकवणी निश्चितच समाजास मुक्त करू शकते, हेच आपण या प्रकरणात पाहणार आहोत.

### इस्लाममध्ये नैतिकतेचे महत्त्व

इस्लाममध्ये नैतिकतेचे जे महत्त्व आहे, त्याचा अनुमान या गोष्टीवरून लावता येईल की प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या प्रेषितत्त्वाचा एक हेतुच मुळात नैतिकतेची पूर्णता आहे. स्वत: प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"निश्चित मी चांगल्या नैतिकतेचे पूर्णत्व करण्यासाठी आलो आहे!"

(संदर्भ : प्रेषितवचन ग्रंथ-मुस्नदे अहमद)

एकदा माननीय आयशा (र.) यांना विचारण्यात आले, "प्रेषित मुहम्मद (स.) यांचे नैतिक आचरण कसे होते?" उत्तरादाखल प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या भार्या माननीय आयशा म्हणाल्या, "तुम्ही कुरआन वाचले नाही काय? प्रेषित मुहम्मद (स.) यांचे नैतिक आचरण म्हणजेच पूर्णपणे कुरआनाच्या शिकवणी आहेत." कुरआनानेसुद्धा या गोष्टीची साक्ष दिली की प्रेषित मुहम्मद (स.) हे अत्यंत उच्च नैतिक आचरणांच्या सिंहासनावर विराजमान होते. स्वयं ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"निश्चितच (हे मुहम्मद (स.)!) तुम्ही नैतिकतेच्या अत्युच्च दर्जावर विराजमान आहात." (संदर्भ : सूरह-ए-क़लम - ४)

इस्लाममध्ये ईशपरायणता व नैतिक आचरणांना एवढे अनन्यसाधारण महत्त्व आहे की केवळ याच्याच आधारावर माणूस हा इतरांपेक्षा श्रेष्ठ ठरू शकतो. ईश्वराने म्हटले आहे,

"वस्तुत: ईश्वराच्या दृष्टीमध्ये सर्वांत जास्त श्रेष्ठ माणूस तो आहे, जो सर्वांत जास्त ईशपरायण आणि सदाचारी आहे." (संदर्भ : सूरह-ए-हुजरात - १३)

प्रेषितकाळातील दोन स्त्रियांची एक घटना आहे. एक स्त्री खूप जास्त नमाज आणि रोजे नित्यनेमाने करीत असे. मात्र आपल्या शेजाऱ्या-पाजाऱ्यांना वाटेल तसे बोलून त्यांना त्रास देत असे. तिच्यासंबंधी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले की "तिच्या नमाज पढण्याचा आणि रोजे ठेवण्याचा तिला काहीच लाभ होणार नाही." याव्यतिरिक्त द्वितीयोल्लेखित स्त्री ही जास्त नमाज आणि रोजे व यांसारख्या उपासना करीत नव्हती आणि केवळ अनिवार्य असलेलीच नमाज पढत होती व अनिवार्य रोजे करीत होती, मात्र ती कधीच कोणालाही त्रास देत नव्हती. या स्त्रीबाबत प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले, "ही स्त्री मोक्षप्राप्तीकरिता पात्र आहे." (संदर्भ : प्रेषितवचन ग्रंथ-बुखारी)

अशा प्रकारच्या आणखीनही असंख्य शिकवणी आहेत, ज्यावरून हे स्पष्ट होते की, इस्लामने उपासनांना जे महत्त्व दिले आहे, नैतिक आचरणांनासुद्धा तेवढेच महत्त्व दिले आहे. ईश्वराने म्हटले आहे,

"हे श्रद्धावंतांनो! रुकुअ करा, सजदे करा, (अर्थात नमाज अदा करा) आणि आपल्या पालनकर्त्याची उपासना करा, तसेच सदाचाराने वागा, आशा आहे की तुम्ही यशस्वी व्हाल." (संदर्भ : सूरह-ए-हज ७७)

## आचरणांचे प्रकार

आचरणांचे दोन प्रकार आहेत, अर्थात सदाचार आणि दुराचार. इस्लामने ज्याअर्थी चांगले आचरण अवलंबण्याची शिकवण दिली आहे आणि त्यांचे ईहलोकी व परलोकी लाभ स्पष्ट केले आहेत, त्याचप्रमाणे दुराचारापासून दूर राहण्याची सक्तीने ताकीदसुद्धा केली. त्याचप्रमाणे त्यांचे समाजावर पडणारे दुष्प्रभाव आणि पारलौकिक तोटेसुद्धा स्पष्ट केले. या ठिकाणी थोडक्यात हे स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला की इस्लामने कशा प्रकारच्या नैतिक आचरणांना पसंत केले आहे आणि समाजावर त्यांचा कसा प्रभाव पडतो, तसेच मानवाचे जीवन कसे सुशोभित होते आणि यामुळे गुन्हेगारीचे कशारितीने निर्मूलन होते.

# अ) सदाचार

## १) सत्यता

सत्यता म्हणजेच खरे बोलणे, सत्य मनाने विचार करणे, सत्य काम करणे, सत्याची साथ देणे होय. सत्य हेच पुण्यकर्माचे स्त्रोत आणि दुष्कर्मांचा नायनाट करणे होय. याउलट असत्य म्हणजेच खोटे बोलणे, खोटे काम करणे, वाईट आणि अपराधी विचारांना मनात थारा देणे, असत्याची साथ देणे होय. सत्यतेमुळे माणसात रास्तबाजी, सडेतोडपणा, निर्भयता, ईमानदारी, विश्वास आणि आत्मविश्वास निर्माण होतो तर याउलट असत्य हे माणसाच्या अंगी दंभ, अहं, स्वयंघोष, स्वार्थ, अन्याय, भय व दौर्बल्यासारखे दुर्गुण निर्माण करते. एकदा आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या सेवेत एक माणूस आला आणि म्हणाला, ''हे प्रेषिता, माझ्यामध्ये चार प्रकारचे दुर्गुण आहेत. पहिला असा की मी व्यभिचारी आहे, दुसरा असा की मी चोरी करतो, तिसरा असा की मी दारु पितो आणि चौथा असा की मी खोटे बोलतो. या चार दुर्गुणांपैकी कोणताही एक दुर्गुण मी तुमच्या खातर सोडण्यास तयार आहे. कृपया आपणच आदेश द्यावा की कोणता दुर्गुण सोडू?'' प्रेषितांनी आदेश दिला, ''खोटे बोलणे सोडा!'' यावर त्या माणसाने खोटे न बोलण्याची प्रतिज्ञा केली आणि निघून गेला. जेव्हा रात्र झाली, तेव्हा त्यास मद्यपानाची इच्छा झाली आणि मग व्यभिचार करण्याचा विचार झाला. मात्र त्याला वाटले की सकाळी जेव्हा मी प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या सेवेत हजर होईन, तेव्हा त्यांनी विचारले तर, तुम्ही रात्री मद्यपान केले काय आणि व्यभिचार केला काय? तर मी त्यांना काय उत्तर देऊ? त्यांच्यासमोर खोटे तर बोलता येणार नाही. मग आपला त्यांच्यासमोर अपमान होईल आणि जर आपल्या दुष्कर्मावर पडदा टाकण्यासाठी खोटे बोललो तर प्रतिज्ञा भंग होईल. असा विचार करून तो दारूही पिला नाही आणि व्यभिचारदेखील केला नाही. मग चोरी करण्याचा त्याला विचार आला तर परत याच म्हणजे खरे बोलण्याच्या विचाराने चोरीसुद्धा केली नाही. अशा रीतीने तो खरे बोलण्याची प्रतिज्ञा केल्यामुळे सर्वच दुष्कर्मांपासून दूर राहिला. तो सकाळीच प्रेषित दरबारी हजर झाला आणि म्हणाला,

''हे प्रेषिता खोटे न बोलण्याच्या प्रतिज्ञेमुळे माझ्यातील इतर तिन्ही दुष्कर्मे नष्ट झाली.'' हे ऐकून प्रेषित मुहम्मद (स.) आनंदीत झाले.

ईश्वराने कुरआनात आदेश दिला की,

''हे श्रद्धावंतांनो! माझे भय बाळगा (अर्थात ईश्वराचे भय बाळगा) आणि सच्च्या लोकांच्या सोबत राहा.'' (संदर्भ : सूरह-ए-तौबा - ११९)

## २) दानशूरता

अर्थातच आपल्या स्वखुषीने आपली एखादी वस्तु अगर संपत्ती गोरगरीब अथवा गरजवंतास देणे म्हणजेच दानकर्म होय. दानकर्म करणे म्हणजे केवळ धन-संपत्ती आणि द्रव्य, वस्त्र आणि खाद्यवस्तु दान करणे नसून आपला इतरांवर असलेला अधिकार माफ करणे, इतरांच्या गरजपूर्ततांसाठी आपला वेळ खर्च करणे, आपली विचारशक्ती खर्च करणे, आपले सामर्थ्य आणि पात्रता खर्च करणे, ही सर्वच कर्मे दानशूरतेमध्ये मोडतात. एवढेच नव्हे तर इतरांच्या भल्यासाठी झटणे, न्याय मिळवून देणे, अत्याचार पीडिताची साह्यता करणे, प्राण वाचवणे नैतिक आचरणांचा पाया असून याउलट संकुचित बुद्धी, कंजूसी, वगैरेपासून बरीच दुष्कर्मे जन्म घेतात. म्हणूनच इस्लामने दान-धर्म करण्याची शिकवण दिली आणि इस्लामी उपासनांमध्ये 'जकात' ही उपासना माणसात दानशूरता आणि औदार्य निर्माण करण्यात मोलाचा वाटा उचलते. ईश्वराने म्हटले,

"हे श्रद्धाधारकांनो! आम्ही जी काही उपजीविका तुम्हास प्रदान केली आहे, त्यातून तो दिवस उजाडण्यापूर्वी खर्च करा, ज्या दिवशी ना व्यवहार होईल, ना मैत्री जमविण्यात येईल."

(संदर्भ : सूरह-ए-बक़रा - २५४)

## ३) श्लील अब्रू व इज्जत

मानवामध्ये वासना आणि लैंगिक भावना असतात. याच वासना आणि लैंगिक भावनांच्या आहारी जाऊन माणसाकरवी मोठमोठ्या अपराधांचा उद्रेक होतो. म्हणूनच या लैंगिक वासनांवर ताबा मिळविल्यास मानवतेच्या शालीनतेचे रक्षण करणे शक्य होते. यदाकदाचित या स्वैर आणि बिनवेसनी भावनांच्या आहारी माणूस गेला की, मग शालीनता, इभ्रत आणि इज्जतीची नग्न धिंड निघते. समाजात असंख्य अपराध घडतात, गुन्हेगारीचे नग्न तांडव माजते, वैरभाव निर्माण होतो, आपापसांत डोकी फुटतात, रक्तपात होतो आणि ना ना प्रकारचे नको ते अपराध जीवावर बेततात. याशिवाय माणसाने जर आपल्या भावनांवर ताबा मिळविला तर निश्चितच शालीनता, इभ्रत सुरक्षित आणि पवित्र राहते. म्हणूनच इस्लामने मानवाची शालीनता आणि अब्रू सुरक्षित ठेवण्यासाठी काही मर्यादा आणि बंधने घातली आहेत. ईश्वराने म्हटले आहे,

"तुम्ही अश्लीलता आणि लैंगिक दुष्कर्मांच्या जवळही फटकू नका, मग ते गुप्त असो वा उघड असो."

(संदर्भ : सूरह-ए-अनआम - १५१)

अश्लीलतेचे एक स्वरुप तर उघड व स्पष्ट आहे अर्थात उघडपणे व्यभिचार करण्यास इस्लामने सक्तीने मनाई केलेली आहे. याबरोबरच काही कमी प्रमाणाची

अश्लील कर्मेसुद्धा आहेत आणि इस्लामने यांचीसुद्धा सक्तीने मनाई केली आहे. याचाच अर्थ असा की केवळ अवैधरित्या किंवा विवाहबाह्य लैंगिक संबंध करणे, एवढेच दुष्कर्म आणि निर्लज्जतेचे वर्तन नसून स्त्री-पुरुषांनी परस्पर डोळे भरून पाहणे, वासनापूर्ण नजरांनी एक दुसऱ्यांना न्याहाळणे, हातवारे करणे, अश्लील गप्पा मारणे व ऐकणे, अश्लील चित्रे व चित्रपट पाहणे, अश्लील कर्म करण्याचा मनात विचार करणे, वगैरेसारख्या बाबींपासूनच इस्लामने सक्तीने मनाई केली आहे. ईश्वराने म्हटले आहे,

"हे प्रेषिता (स.)! श्रद्धावंतांना सांगा की, आपल्या नजरा खाली ठेवा आणि आपली लैंगिक अवयवे (व्यभिचारापासून सुरक्षित ठेवा." (संदर्भ : सूरह-ए-नूर - ३०)

## ४) लाज-लज्जा

लाज-लज्जा आणि शरम नावाचा माणसामध्ये असा गुणधर्म आहे, ज्यामुळे माणूस अश्लील वर्तन आणि व्यभिचारापासून दूर राहतो. जर माणसातून लाज-लज्जा नष्ट पावली की माणसाच्या हातून कोणतेही दुष्कर्म घडू शकते. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले की, "माणसातून जर लाज संपली तर मग त्यास दुष्कर्मांपासून रोखणारी इतर कोणतीच वस्तु नाही." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह-मुस्नदे अहमद) अर्थातच वाईट कर्म करण्याची कोणाला लाजच वाटत नसेल तर तो वाटेल ते करतो. एवढेच नव्हे तर इस्लामी कायद्याने लाज बाळगण्याचा आदेश माणसास अगदी एकांतातसुद्धा दिला आहे. एकदा एकाने प्रेषित मुहम्मद (स.) यांना विचारले की, माणूस एकांतामध्ये नग्न होऊ शकतो काय? प्रेषितांनी उत्तर दिले की, "एकांतामध्येही ईश्वराला तर सर्वकाही दिसते आणि ईश्वराशी तुम्ही सर्वांपेक्षाही जास्त लाज बाळगावयास हवी."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह-बुखारी)

## ५) निस्पृहता

गर्व, अहंकार, मीपणा हे सर्वच अपराधांचे मूळ असून यामुळे माणूस हा माणूस राहत नाही. मात्र गर्व आणि अहंकारी भावनांपासून जे उपद्रव घडतात, नेमके असेच अपराध स्वत:स हीन आणि खालच्या पातळीचा समजून घेण्यामुळेसुद्धा घडतात. स्वत:च्याच दृष्टीत स्वत:ची किंमत नसेल तर इतरांच्या दृष्टीतही आपले काय मोल राहणार. म्हणून माणसाने नेहमी स्वाभिमानाने जगावयास हवे. नसता समाजात आपली पत राहत नाही. आपण कितीही सत्य बोललो आणि जीव ओतून बोललो तरी कोणी ऐकायला तयार नसतो. लोकांना वाईट कर्मांपासून रोखणे अशक्य होऊन बसते. परिणामी समाजावर अपराधी वृत्तींचा विळखा पडतो.

याशिवाय आपल्या गरजपूर्तीसाठी इतरांसमोर हात पसरविणेसुद्धा स्वाभिमानाविरुद्ध आहे. कोणतीही हलाखीची परिस्थिती नसताना किंवा आपण स्वत: कष्ट करून आपली गरज भागविण्याची ऐपत असताना इतरांसमोर हात पसरविणे हे इस्लामने निषिद्ध ठरविले आहे. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे की, भीक मागणारा अंतिम निवाड्याच्या दिवशी अशा स्वरुपात ईश्वरासमोर हजर केला जाईल, की त्याच्या चेहऱ्यावर मांस राहणार नाही. (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह-बुखारी) अर्थातच आपली गरज पूर्ण करण्यासाठी इतरांसमोर हात पसरविण्यामुळे माणूस अपमानित मिंधा होतो, त्याचा स्वाभिमान नष्ट होतो. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी तर असेदेखील म्हटले आहे की, "तुमच्या हातून तुमचा कोरडा (अगर एखादी वस्तु) खाली पडली तर तीसुद्धा स्वतःच उचलावी, इतरांना विनंती करू नये." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह-बुखारी) स्वाभिमानाचा उच्च दर्जा असा आहे की जोपर्यंत अत्यंत बिकट आणि हलाखीची परिस्थिती उद्भवत नाही, तोपर्यंत इतरांसमोर याचना करता कामा नये. एवढेच नव्हे तर जे लोक सत्यस्थापनेच्या कार्यात इतके मग्न असतात की त्यांना उदरनिर्वाहासाठी अर्थार्जनाची सवडच नसते, अशा लोकांना तुम्ही सढळ हाताने मदत करावी. त्यांनी जर तुम्हाला मदतीची याचना केली नसली तरी तुम्ही त्यांच्या चेहऱ्यावरील भाव वाचून त्यांना आर्थिक मदत करावी. कुरआनात म्हटले आहे,

"खरे पाहता मदतीस पात्र ते लोक आहेत, जे ईश्वराच्या कार्यात असे घेरले गेले आहेत की, यामुळे त्यांना आपल्या उपजीविकेकरिता प्रयत्न करण्याची सवडच मिळत नाही."

(संदर्भ : सूरह-ए-बक़रा - २७३)

## ६) अनामतदारी व प्रामाणिकपणा

आपसांतील व्यवहार आणि देवाण-घेवाणीमध्ये अनामतदारी आणि प्रामाणिकपणाला अनन्यसाधारण महत्त्व आहे. ज्याचे घेतले, त्यास प्रामाणिकपणे ठरलेल्या वेळेवर परत करावे, इतरांच्या अनामती हडप करू नयेत, व्यवहार प्रामाणिक व पारदर्शक असावा, ज्यांचा ज्याच्यावर जेवढा अधिकार असेल, तेवढा बिनचूकपणे त्यास देऊन टाकावा. ही गोष्ट केवळ पैसाअडका, संपत्ती आणि द्रव्य वगैरेंच्या व्यवहारापर्यंतच मर्यादित नसून कायदा आणि नैतिक आचरणावरही व्याप्त आहे. एखाद्याची वस्तु वा अधिकार ज्या स्वरुपात तुमच्या जवळ आहे, त्याच स्वरुपात त्याला द्यावयास हवे. एखाद्याचे गुपित तुम्हाला कोणी सांगितले असेल आणि ते इतरांसमोर न उघडण्याचे तुम्ही त्यास वचन दिलेले असेल, तर हे वचन

काटेकोरपणे पाळणेसुद्धा अनामतच आहे. त्याचप्रमाणे एखादी व्यक्ती एखाद्या हुद्यावर असेल, तर तिने आपले कर्तव्य प्रामाणिकपणे बजावणेसुद्धा अनामतच होय. अर्थातच अनामत जोपासणे आणि प्रामाणिक व्यवहार ठेवणे हेसुद्धा असंख्य अपराधांना आळा घालते. ईश्वराने म्हटले आहे,

"निश्चितच ईश्वर तुम्हास आदेश देतो की, तुम्ही लोकांना त्यांच्या अनामती (वा ठेवी जशास तशा) परत करा." (संदर्भ : सूरह-ए-निसा - ५८)

## ७) वचनबद्धता

समस्त प्रकारच्या नैतिक, सामाजिक, व्यावहारिक, धार्मिक, आर्थिक आणि कायद्यात्मक बाबीसंबंधी जी-जी वचन देण्यात येतात, त्यांची पूर्तता करणे हे प्रत्येकाचे परमकर्तव्य असते. श्रद्धावंत हा दिलेला शब्द प्रत्येक परिस्थितीत पाळतोच पाळतो. जर कोण्या श्रद्धावंताने दिलेला शब्द पाळला नाही तर समजा त्याच्या श्रद्धेमध्येच खोट आहे. जो माणूस जसे बोलतो, तसेच वागतो, तोच खरा श्रद्धावंत होय. म्हणूनच एका संताने म्हटले की, 'बोले तैसा चाले, वंदावी त्याची पाऊले.' ईश्वराने कुरआनात वारंवार या गोष्टीचा आदेश दिला की,

"ईश्वराचे नाव घेऊन तुम्ही जेव्हा आपसांमध्ये एखादा करार करता, तो करार पूर्ण करा आणि शपथा खाऊन त्या तोडू नका, (कारण) ईश्वरास तुम्ही आपला जामीन ठरविले आहे." (संदर्भ : सूरह-ए-नहल - ९१)

## ८) न्याय

न्याय म्हणजे कायद्याच्या भाषेत सत्यानुसार हक्कदारांचा हक्क देणे होय. न्याय करणे आणि न्यायपूर्ण वागणे, ही सामाजिक गरज असण्याबरोबरच माणसाची वैयक्तिक गरज आणि गुणधर्मसुद्धा आहे. म्हणूनच कुरआनात याचा वारंवार उल्लेख करण्यात आला की, न्यायाची स्थापना करा. एवढेच नव्हे तर इस्लाम धर्म या जगात न्याय स्थापन करण्यासाठीच आला आहे. ईश्वराने म्हटले आहे,

"ईश्वर न्याय आणि उपकार करण्याचा आदेश देतो."

(संदर्भ : सूरह-ए-नहल - ९०)

न्याय मिळाला तर समाज सुखी समाधानी राहतो आणि अन्याय झाला की अन्यायपीडित हा पेटून उठतो, अवैध कामांकडे वळतो, अपराधी कर्म घडतात. अर्थातच न्याय हा अपराधी वृत्तींना आळा घालण्याचे अत्यंत महत्त्वाचे माध्यम आहे.

## ९) मध्यममार्गी वर्तन

न्यायाचा संबंध सामुदायिक जीवनाशी आहे, मात्र मध्यमपणाने वागण्याचा संबंध हा माणसाच्या व्यक्तिगत जीवनाशी आहे. एखादा माणूस अत्यंत कंजूस आणि संकुचित वृत्तीचा असेल तर त्याच्याकडून भल्याची अपेक्षा करणे चुकीचे आहे, याबरोबरच एखादा माणूस कोणत्याही गोष्टीची खूप उधळपट्टी करीत असेल, किंवा मर्यादेपेक्षा जास्त खर्च करीत असेल तर हेसुद्धा खूप नुकसानकारक आहे. म्हणूनच माणसाने मध्यममार्गाने वागावे, मध्यममार्गी चालावे, मध्यममार्गी व्यवहार करावा. आपल्या सवयी आणि आचरण मध्यममार्गी असावे. कुरआनात म्हटले आहे,

"आपल्या चालीमध्ये मध्यपणा राखा आणि आवाज थोडा लहान ठेवा, सर्व आवाजापेक्षा अधिक वाईट आवाज हा गाढवाचा असतो."

(संदर्भ : सूरह-ए-लुक़्मान - १९)

आणखीन एके ठिकाणी म्हटले आहे, "आपला हात मानेस बांधून ठेवू नका (अर्थात इतकी कंजूसी करू नका की पैसाच खर्च होणार नाही) आणि आपला हात इतका उघडाही ठेवू नका. (की, एकाच वेळेस सगळ्या संपत्तीची उधळपट्टी होईल) परिणामी पश्चात्ताप करावा लागेल."

(संदर्भ : सूरह-ए-बनी इस्त्राईल - २९)

## १०) शौर्य आणि धाडस

आपल्यावर होणाऱ्या जुलमी आणि अत्याचारी आक्रमणांचा धैर्याने सामना करणे आणि वाईट बाबीं नष्ट करणे म्हणजेच शौर्य होय. एखाद्या कामाची सुरुवात करून ते काम कोणत्याही संकटांना न जुमानता अंतिम टोकापर्यंत नेणे म्हणजे शौर्यच होय. माणसाच्या अंगी शौर्य आणि धाडस नसेल तर जगातील हिंस्र प्रवृत्ती त्याला कच्चे चावून खाईल, अन्यायी व अत्याचारी वृत्तींना तो बळी पडेल. अन्याय व अत्याचाराचा सामना करण्याचे धैर्य जर दाखविले नाही, तर अत्यंत अपमानास्पद जीवन नशिबी येईल आणि इस्लामने मात्र असे अपमानास्पद जीवन मुळीच पसंत केले नाही. इस्लाम नेहमीच धैर्य, धाडस, शक्ती, सामर्थ्य आणि शौर्य पसंत करतो. रणांगणातून शत्रूला भेदरून जाऊन काढता पाय घेणे इस्लामने निषिद्ध ठरविले आहे. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे की, "शक्तिशाली श्रद्धावंत हा शक्तीहीन श्रद्धावंतापेक्षा चांगला असतो." कुरआनात वारंवार विविध ठिकाणी शौर्य आणि धैर्य बाळगण्यासंबंधी ताकीद करण्यात आली आहे. ईश्वराने म्हटले आहे,

"हे श्रद्धावंतांनो! कोणत्याही लष्कराच्या मुकाबल्यात धैर्याने युद्ध करा."

(संदर्भ : सूरह-ए-अनफ़ाल - ४५)

“हे श्रद्धावंतांनो! जेव्हा रणभूमीवर ईशद्रोह्यांशी तुमचा सामना होईल, तेव्हा युद्धातून पळ काढू नका.” (संदर्भ : सूरह-ए-अनफ़ाल - ५१)

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे की, “श्रद्धावंताने अपमानास्पद जीवन जगणे हे निषिद्ध आहे.” (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह-तिर्मिजी - ५/६६)

## ११) दृढता व निश्चयसामर्थ्य

दृढ़ता आणि निश्चयसामर्थ्य हे शौर्याचे एक प्रतीक होय. कोणत्याही संकटांना जटील समस्यांनाही न जुमानता अन्याय व असत्यासमोर मान तुकविता कामा नये. सत्यासाठी आणि न्यायसंमत बाबीसाठी विरोधकांनी उभे केलेल्या संकटांना न घाबरता दृढ़ राहून सत्याभिमुख न होणे म्हणजेच दृढ़ता होय. ईश्वराने म्हटले आहे,

“निश्चितच ज्यांनी म्हटले की, ईश्वरच आमचा पालनकर्ता आहे, मग ते आपल्या दाव्यावर दृढ़ राहिले, त्यांना कोणतेही भय नसणार आणि ते दु:खीही होणार नाहीत.”

(संदर्भ : सूरह-ए-एहक़ाफ़ - १३)

## १२) सत्यवचन

सत्यवचन हे शौर्याचेच द्वितीय प्रतीक होय. कोणत्याही संकटास न घाबरता आणि कितीही मोठा लाभ झुगारून सत्य आणि असत्याच्या संघर्षामध्ये कोणत्याही आमिषास बळी न पडता सडेतोडपणे सत्याचीच बाजू मांडणेसुद्धा मोठे शौर्य आहे. एवढेच नव्हे तर आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे, “क्रूर आणि अत्याचारी शासकासमोरही सत्य तेच बोलावे आणि हे एक महान धर्मयुद्धच आहे.” असत्याच्या पाठीशी कितीही मोठी शक्ती व सामर्थ्य असले तरी खोटे बोलून आणि दांभिकपणे लाळघोटेपणा करून सत्याला पाठ दाखविणे हा तर षंढपणाच होय. कुरआनात ईश्वराने अशा लोकांची मुक्तपणे प्रशंसा केली आहे, जे सत्य भूमिका मांडताना कोणाच्याही धिक्कार अगर शाप-शिव्यांची पर्वा करीत नाहीत.

“तुम्हाला जो ईश्वरी आदेश मिळाला आहे, तो सडेतोडपणे आणि नि:संकोचपणे लोकांसमोर मांडा आणि मूर्तीपूजकांची मुळीच पर्वा करू नका.”

(संदर्भ : सूरह-ए-हिज्र - ९४)

जोपर्यंत सत्य बोलण्याचे नैतिक धैर्य दाखविण्यात येत नाही, तोपर्यंत अन्यायी व अत्याचारी दीन-दलितांचे शोषण करीतच राहतील आणि सत्य मात्र दारोदार ठेचाळत राहणार, अपराध्यांचा बोलबाला होत राहणार. म्हणूनच सत्य बोलणे इस्लामने अनिवार्य कर्तव्य ठरविले आहे. इस्लाम हा मुळात सत्य स्थापण्यासाठीच आहे.

## १३) निस्पृहता

इस्लामी नीतिमत्तेचा एक महत्त्वाचा घटक निस्पृहता होय. अर्थात मानवाने ईश्वराशिवाय कोणाशीच आशा धरू नये. हे खरेसुद्धा आहे ईश्वरेतरांजवळ मानवाला देण्यासारखे काय आहे? दुसरी गोष्ट अशी की मानवास जे काही ईश्वराने दिले आहे, त्यावरच समाधान मानून इतरांचा हेवा करता कामा नये. कारण हेवा आणि लालसा हा एक असा मानसिक आणि नैतिक रोग आहे की, याला जगात कुठेही औषध नाही. कोणत्याही उपचाराने हा रोग बरा होत नसतो. कितीही संपत्ती मिळत गेली, तरीही माणसाच्या मनोकामना आणि दौलतीचा हव्यास पिसाळपणे वाढतच असतो. या लालसा आणि हव्यासापाटी माणूस न्याय-अन्याय, सत्य-असत्य, वैध-अवैध, नैतिक-अनैतिक हे काहीच पहात नाही. केवळ संपत्तीत वाढ करणे हाच त्याच्या जीवनाचा सार असतो. म्हणून माणसाने इतरांची ईर्श्या न करता आणि हव्यास व लालसेला बळी न पडता ईश्वराने जे काही प्रदान केले आहे, त्यावरच समाधान मानणे, ही श्रद्धेची मागणी आहे. ईश्वराने कुरआनात स्पष्टपणे म्हटले आहे,

"ईश्वराने ज्या गोष्टी काहींना काहींपेक्षा जास्त प्रदान केल्या आहेत, त्या गोष्टींची लालसा (वा हव्यास) करू नका." (संदर्भ : सूरह-ए-निसा - ३२)

"आणि आपले डोळे विस्फारु नकोस, अशाजनांना पाहून, ज्यांना आम्ही (ईश्वराने) तऱ्हेतऱ्हेच्या साधन सामुग्री प्रदान केल्या आहेत."

(संदर्भ : सूरह-ए-ताहा - १३१)

अर्थातच इतरांची संपत्ती, सुखसाधने, सौंदर्य वगैरे पाहून माणसात लालसा निर्माण होते, परिणामी त्याच्या मनात द्वेष, मत्सर आणि हेवा निर्माण होतो आणि परिणामी नको तसे अपराध घडतात. नेमक्या याच इर्श्यालु भावनेस आवर घालून इस्लामने अपराधी वृत्तीवर यशस्वीपणे आळा कसला आहे. हीच मत्सराची ज्वाला शमविण्यासाठी प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे, "केवळ पैसा-अडका आणि संपत्तीने माणूस धनवान होत नसतो, तर खरी संपत्ती आणि दौलत ही निस्पृहता आहे."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह-बुखारी)

यामुळेच माणसाने आपली गरज पूर्ण करण्यासाठी इतरांसमोर हात पसरु नये, हीच खरी निस्पृहता होय.

## १४) दया, करुणा, ममत्व

इस्लामने दया, करुणा व ममत्वास विशेष महत्त्व दिले आहे. ज्याच्या अंत:करणामध्ये इतरांविषयी दया आणि ममत्व असेल, तो निश्चितच अन्याय व अत्याचार करणार नाही. या उलट ज्याच्या मनी दया-माया, करुणा आणि ममत्वच नसेल, अथवा जो माणुस क्रूर आणि निष्ठूर व पाषाणहृदयी असेल, त्याच्याकडून न्याय आणि भल्याची आशाच नसते. तो वाटेल त्याच्यावर अन्याय करीत असतो, वाटेल त्याच्यावर अत्याचार करून आपल्या स्वार्थाची पोळी भाजत असतो. अशा निर्दयी आणि निष्ठूर माणसासमोर नीतिमत्ता, लाज-लज्जा आणि मानवता किती जरी टाहो फोडून दयेची भीक मागत असली तरी त्याच्या पाषाणहृदयास पान्हा फुटत नाही. ईश्वराने वारंवार श्रद्धावंतांना उद्देशून म्हटले आहे की, मी परम दयाळू असून तुम्हीसुद्धा इतरांवर दया करा. तुम्ही जर दुसऱ्यांवर दया केली नाही तर मीसुद्धा तुमच्यावर दया करणार नाही.

## १५) क्षमाशीलता

दया-माया आणि ममत्वाचेच एक प्रतीक म्हणजे क्षमाशीलता होय. कोणी जर आपले काही नुकसान केले, अथवा कोणी काही चूक केली तर आपणही मोठ्या मनाने ती चूक माफ करणे म्हणजेच क्षमाशीलता होय. जगात असा कोण माणूस असेल बरे, ज्याने जीवनात कधी चूक केलेलीच नसेल. केवळ चुकाच धरून बसलो तर समाजात कितीतरी अनिष्ट बाबी जन्म घेतात. याउलट आपण इतरांना माफ केले तर आपणही सुखी राहतो आणि इतरांनाही शांती मिळते. इस्लामला हेच अभिप्रेत आहे की, समाजात शांती आणि समाधानाचे झुळझुळ वारे वाहावेत, वैभवाची नांदी असावी, मने स्वच्छ व शुद्ध असावीत, सर्वत्र प्रेम, स्नेह आणि बंधुत्वाची टवटव फुलावी. याकरिताच विविध तऱ्हेने क्षमाशीलतेची कुरआनात शिकवण देण्यात आली आहे. ईश्वराने म्हटले आहे की,

"तुम्ही इतरांना क्षमा करावी, तुम्हाला नाही वाटते काय की, ईश्वराने तुम्हास क्षमा करावी? आणि ईश्वर क्षमा करणारा आणि दयाळू आहे."

(संदर्भ : सूरह-ए-नूर - २२)

"क्षमाशील आचरणपद्धत अवलंबा आणि सत्याचा आदेश द्या, तसेच अज्ञानी जनांपासून दूर राहा." (संदर्भ : सूरह-ए-एअराफ़ - १९९)

एकदा आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांना एकाने विचारले, "हे प्रेषिता माझा नोकर वारंवार चुका करतो. मी त्याला किती माफ करु?"

"दररोज सत्तर वेळा माफ करा!" प्रेषित मुहम्मद (स.) उत्तरले.

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

मात्र शत्रुलासुद्धा माफ करावे काय? तर इस्लामी कायद्यात म्हटले आहे, शत्रुवर जेव्हा पूर्ण ताबा मिळाला आणि तो उपद्रव माजविण्याच्या परिस्थितीत नसला तर त्यास माफी द्यावी. कारण सूड घेण्याचे सामर्थ्य असतानाही पराभूत पक्षाला माफ करण्यात यावे, हेसुद्धा मोठे शौर्याचेच काम आहे. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे, "खरा पहिलवान तो नाही जो इतरांना कुस्तीच्या आखाड्यात पराभूत करतो, तर खरा पहिलवान तो माणूस आहे जो आपल्या क्रोधाग्नीवर अगर राग व संतापावर ताबा मिळवितो."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

**१६) नम्रता व निरहंकारता**

नम्रता म्हणजेच इतरांशी प्रेम आणि स्नेहाने तसेच मनमिळाऊ स्वाभावाने वागणे व बोलणे होय. इतरांशी तोंड फिरवून तुसड्यापणाने बोलता-वागता कामा नये. जमिनीवर गर्वाने मान ताठ करून ऐटीने चालू नये, आपल्या चालण्यातून आणि बोलण्या-वागण्यातून नम्रता प्रकट व्हावी. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"लोकांशी तोंड फिरवून बोलू नकोस आणि जमिनीवर ऐटीत चालू नकोस. कारण की, ईश्वर कोणत्याही अहंकारी आणि गर्व करणाऱ्यास पसंत करीत नाही आणि आपल्या चालीत मध्यमपणा राख आणि आवाज धीमा ठेव. कारण वाईट आवाजामध्ये सर्वांत वाईट आवाज गाढवाचा असतो." (संदर्भ : सूरह-ए-लुक़मान - १८,१९)

**१७) मृदू भाष्य**

आपसांत बोलताना व संवाद साधताना मुखावाटे अशी कोणतीही गोष्ट निघता कामा नये, ज्यामुळे समोरील व्यक्तीचा अहं दुखावेल. यामुळेच बोलताना संयम ठेवावा. इतरांचा आदर करून बोलावे. ज्याच्या त्याच्या दर्जानुसार आदरयुक्त शब्दांनी संबोधित करावे. यामुळे आपसात प्रेम, स्नेह आणि बंधुभाव पावतात. यासाठी सलाम करणे (शांती व सुरक्षेची प्रार्थना करणे), आभार व्यक्त करणे, आशीर्वाद देणे, चांगला सल्ला देणे, चांगले मार्गदर्शन करणे, नम्रपणे बोलणे व यासारख्या बऱ्याच पद्धती इस्लामने प्रदान केल्या आहेत. ईश्वराने म्हटले आहे,

"लोकांबरोबर चांगले बोल." (संदर्भ : सूरह-ए-बक़रा - ८२)

"तुम्ही आपसांत एक दुसऱ्यांना वाईट बोलू नका व टिंगल करू नका. एक दुसऱ्यांना टोमणे मारू नका. एकमेकांना वाईट नावाने संबोधू नका. श्रद्धा ठेवल्यानंतर दुराचारांत नाव घेणे फार वाईट बाब आहे." (संदर्भ : सूरह-ए-हुजरात - ११)

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"चांगले बोलणेसुद्धा दान-धर्म करण्यासम पुण्य आहे."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

आणखीन एके ठिकाणी म्हटले आहे, "जो माणूस मुस्लिम असतो, तो कोणाला टोमणे मारीत नाही, कोणाला धिक्कारत नाही, कोणाशी गैर बोलत नाही, कोणाशी अश्लील शब्दांत बोलत नाही." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

**१८) त्याग आणि बलिदान**

इस्लामी नीतिमत्तेचा सर्वांत मोठा दर्जा हा त्याग आणि बलिदान होय. आपल्या गरजा त्यागून इतरांच्या गरजा पूर्ण करणे, स्वत: उपाशी राहून इतरांची भूक भागविणे, स्वत: तहाणलेले राहून इतरांची तहाण भागविणे, इतरांना सुख-समाधान देण्यासाठी स्वत: दु:ख-कष्ट उचलणे, इतरांना सुरक्षा प्रदान करण्यासाठी स्वत:चा जीव धोक्यात घालणे, इथपावेतो की सत्यासाठी तन-मन-धनाची आणि आपल्या प्राणाची आहुती देणे म्हणजेच त्याग आणि बलिदान होय. हा एक असा गुणधर्म आहे की यामुळे समाजातील असंख्य प्रश्न समस्या व संकटे मार्गी लागतात. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"ते स्वत:पेक्षा इतरांना महत्त्व देतात, मग ते स्वत: कितीही गरजू का असेनात आणि खरी गोष्ट अशी आहे की जो माणूस तंगीतून वाचवण्यात आला (तर समजा की) तेच (त्यास वाचविणारे) यशस्वी होतील." (संदर्भ : सूरह-ए-हश्र - ९)

साधारणत: माणूस हा आपल्यावर झालेल्या अतिरेकाचा बदला अगर सूड अतिरेकानेच घेतो. कोणी जर आपले वाईट केले तर आपणही त्याचे वाईट करून सूड उगवतो. मात्र इस्लामची शिकवण अशी आहे की तुमचे कोणी वाईट केले तर तुम्ही मात्र त्याचे भले करा. द्वेषाचा बदला प्रेम आणि स्नेहाने द्या, रस्त्यात काटे टाकणाऱ्यांना उदारतेने माफ करा, या आचरणाने मोठमोठे विरोधक सत्याचे पुजारी होतील, शत्रुसुद्धा बंधुभावाने वागतील. समाजात स्नेह व बंधुभावाचे वातावरण निर्माण होईल. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"आणि हे प्रेषिता! सत्कर्म आणि दुष्कर्म समान असू शकत नाहीत. तुम्ही सत्कर्माने दुष्कर्माचा नायनाट करा. तुम्ही पाहाल की, जो तुमच्याविरुद्ध वैर आणि सूड-भावनेने पेटला आहे, तो तुमचा स्नेही आणि मित्र होईल."

(संदर्भ : सूरह-ए-हाममीम सजदा - ३४)

अर्थातच आग ही आगीने विझत नसते, ती पाण्यानेच विझवावी लागते. हा निसर्गनियम आहे.

## ब) दुराचार

### १) असत्य

असत्य आणि खोटेपण म्हणजे सत्यविरोधी बोलणे, सत्यविरोधी आचरण करणे आणि त्यास मनात जागा देणे होय. ही गोष्ट प्रत्येकालाच माहीत आहे की यामुळे समाजास किती मोठे नुकसान सोसावे लागते. याचे माणसाने नेहमीच पथ्य पाळावे. त्याचा थोडासाही अंश आपल्याजवळ फटकू देता कामा नये. प्रेषितकाळात एक स्त्री आपल्या मुलाला बोलावत होती की, "चल तुला खाऊ देते." मात्र ती केवळ मुलाला खाऊचे आमिष देत होती. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी याचीसुद्धा असे सांगून मनाई केली की, "हा खोटेपणा आहे." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - अबू दाऊद) असत्य आणि खोटेपणा हे अत्यंत घृणास्पद, निषिद्ध असल्याचे इस्लामने म्हटले आहे. कुरआनाने स्पष्ट शब्दांत बजावले आहे,

"मूर्तीपूजेच्या गलिच्छतेपासून स्वत:चे रक्षण करा आणि खोट्या गोष्टींचे पथ्य पाळा." (संदर्भ : सूरह-ए-हज - ३०)

### २) अप्रामाणिकता

इतरांचे अधिकार गिळंकृत करणे, इतरांकडून घेतलेल्या वस्तु परत न करणे, इतरांचे गुपित उघड करणे, जवाबदारी न निभावणे, कर्तव्य पूर्ण करण्यात हलगर्जीपणा करणे, अधिकारांचा गैरवापर करणे, शासकीय तिजोरीत भ्रष्टाचार करणे, या सर्व गोष्टी यामध्ये मोडतात. इस्लामने या गोष्टी निषिद्ध ठरवून या काळ्या कृत्यांवर जबर आळा बसविला आहे. ईश्वराने म्हटले आहे,

"हे श्रद्धावंतानो! प्रेषिताकरवी जी (सत्य शिकवणीची) अनामत तुम्हास मिळाली आहे, तिच्याप्रति गैरवर्तन करू नका आणि (लोकांच्या ज्या) अनामती (तुमच्याकडे आहेत,) त्यात अफरातफर करू नका." (संदर्भ : सूरह-ए-अनफ़ाल - २७)

त्याचप्रमाणे इतरांना शब्द देऊन वचनभंग करणे वा ऐन संकटाच्या वेळी दगा करणेसुद्धा इस्लामने निषिद्ध ठरविले आहे. कुरआनात ईश्वराने अगदी स्पष्टपणे म्हटले आहे,

"ज्यांच्याशी तुम्ही करार केला, मग त्यांनी प्रत्येक प्रसंगी तो करार भंग केला आणि त्यांना जराही ईश्वराच्या प्रकोपाचे भय वाटत नाही. म्हणून जर हे लोक तुम्हाला युद्धात सापडले तर त्यांचा असा समाचार घ्या की त्यांच्यानंतर जे लोक असे वर्तन

करतील, त्यांना धडा मिळेल. अपेक्षा आहे की करार भंग करणाऱ्यांच्या या अशा परिणतीने ते धडा घेतील. आणि जर तुम्हाला एखाद्या समूहाकडून दगलबाजीची भीती असेल तर त्यांचे करार जाहीरपणे त्यांच्या तोंडावर फेकून द्या. निश्चितच ईश्वर विश्वासघातकी लोकांना पसंत करीत नाही.''(संदर्भ : सूरह-ए-अनफाल - ५६ ते ५८)

अर्थातच हे असे दुष्कर्म आहे की कोणत्याही धर्मात यालासुद्धा स्थान नाही. सर्वच प्रकारचे लोक याप्रति घृणा करतात.

### ३) खोटा आरोप लावणे

इस्लामी कायद्यामध्ये गुन्हा करणे जसे पातककर्म आहे, तसेच गुन्ह्याचा खोटा आरोप लावणे हेदेखील पातककर्म ठरविण्यात आले आहे. एखाद्या निष्पापावर अपराधाचे कलंक लावून त्याच्यावर अन्याय करणे हे घोर पाप आहे. आरोप छोटा असो की मोठा असो, आरोप लावणे मात्र सारख्याच स्वरुपाचा अपराध आहे. एखाद्या शालीन स्त्रीवर व्यभिचाराचा आळ घेणे, एखाद्यावर चोरीचा आळ घेणे अथवा इतर स्वरुपाच्या गुन्ह्याचे आरोप लावणे म्हणजे समाजात भयानक उपद्रव निर्माण करणे होय. यासारख्या खोट्या आरोपामुळे बरेचजण आत्महत्या करतात, काही सूडभावनेने पेटून आरोप लावणाऱ्याचा वध करतात. अन्यायपीडितास आतोनात शारीरिक आणि मानसिक भोग भोगावे लागतात, नैतिक मूल्ये पायदळी तुडविणाऱ्या या घृणास्पद अपराधाची शिक्षा मात्र इस्लामने खूप कठोर सुनावली आहे. यासंबंधी कुरआनात म्हटले आहे,

''जे लोक शालीन स्त्रीवर आरोप लावतात आणि चार साक्षीदारांच्या साक्षीने आरोप सिद्ध करू शकत नाही तर त्यांना ऐंशी कोरडे मारावेत आणि यापुढे त्यांची साक्ष अपात्र ठरविण्यात यावी. हेच लोक मुळात घोर अपराधी आहेत.''

(संदर्भ : सूरह-ए-नूर - ४)

### ४) चुगलखोरी व चहाडी

एखाद्या व्यक्तीविषयी इतरांच्या मनात द्वेश निर्माण करण्यासाठी अगर प्रतिमा डागाळण्यासाठी त्याच्यातील एखादा दुर्गुण वर्णन करणे वा खोट्यानाट्या गोष्टी करणे म्हणजेच चुगली-चहाडी करणे होय. याचाच अर्थ स्नेह आणि बंधुभावासारख्या शुद्ध वातावरणात विष कालवणे होय. कधीकधी तर यामुळे अगदी दोन समाजांतच नव्हे तर दोन देशांत रक्तपात यामुळे होतो आणि याची इतिहासात असंख्य उदाहरणे आहेत. म्हणून इस्लामी कायद्यात या दुष्कर्मास घोर पाप ठरवून असे बजावण्यात आले की, जोपर्यंत कोणाच्या पापाची वा दुष्कर्माची पूर्ण पुराव्यानिशी व साक्षीदारानिशी सिद्धता

स्पष्ट होत नाही, तोपर्यंत आरोप लावणाऱ्यावर अगर चुगली करणाऱ्यावर विश्वास ठेवता कामा नये, जेणेकरून आपसामध्ये गैरसमज वाढू नयेत आणि विश्वासाला तडा जाऊ नये. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"हे श्रद्धावंतांनो! जर एखादा दुष्कर्मी (अगर चहाडीखोर) तुम्हास एखाद्या (वाईट) गोष्टीची खबर देत असेल तर, पूर्ण शहानिशा केल्याशिवाय त्याच्यावर विश्वास करू नका, असे न होवो की त्याच्या (खोट्या) वार्तेवर विश्वास ठेवून तुम्ही एखाद्या निष्पाप समुदायावर आक्रमण करावे आणि नंतर पश्चात्तापाची पाळी यावी."

(संदर्भ : सूरह-ए-हुजरात - ६)

एके प्रसंगी प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे की, "सर्वांत वाईट अगर दुष्कर्मी लोक ते आहेत, जे लोकांच्या चहाड्या करीत फिरतात आणि माणसांतील मैत्री व स्नेहामध्ये विष कालवितात." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

## ५) निंदा

निंदा म्हणजे एखाद्या माणसातील विकृती आणि वाईट कर्म त्याच्या अनुपस्थितीत इतरांसमोर बोलून दाखविणे होय. या गोष्टीमुळेसुद्धा ज्याची निंदा करण्यात येते, त्याला खूप मानसिक त्रास भोगावा तर लागतोच शिवाय दोन माणसांत व समाजांत दुही निर्माण होते. म्हणूनच इस्लाममध्ये इतरांची निंदा-नालस्ती करणे एक घोर पाप आहे. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"तुमच्यापैकी कोणीही कोणाच्या पाठीमागे निंदा करू नका. बरे तुम्हाला आपल्या मयत भावाचे मांस खाणे कसे काय आवडेल? ईश्वराचे भय बाळगा. निश्चितच तो दयाळू आहे."

(संदर्भ : सूरह-ए-हुजरात - १२)

## ६) गैरसमज

विनाकारणच आपल्या कोणत्याही बांधवाविषयी गैरसमज करून घेणे म्हणजे त्याच्यापासून दुरावा निर्माण करणे होय. कोणी जर पाणी पीत असेल तर तो दारू पीत असल्याचा गैरसमज करून घेता कामा नये. कोणतीही गोष्ट सिद्ध न होता विनाकारणच गैरसमज करून घेऊ नये अशी इस्लामने ताकीद केली आहे. ईश्वराने स्पष्टपणे म्हटले आहे,

"हे श्रद्धावंतानो! गैरसमज करून घेऊ नका. निश्चितच काही गैरसमज घोर पातक असतात."

(संदर्भ : सूरह-ए-हुजरात - १२)

## ७) स्वत:च्या प्रशंसेची आस - आत्मश्लाघा

आपणच इतरांपेक्षा भारी, चांगले आणि इतर मात्र मूर्ख, नालायक, अशा प्रकारच्या भावना ठेवून ऐटीत मिरविणे, इतरांनी आपल्या तोंडावर आपली प्रशंसा केल्यास उल्हासित व आनंदीत होण्याचा बायकीपणा करणे, फुशारकी मारणे आणि विनाकारणचा गर्विष्ठपणा बाळगणे, तसेच इतरांचे सद्‌गुण नजरे आड करून त्यांना तुच्छ लेखणे व यासारखे दुर्गुण माणसात असल्याने समाजातून नैतिकतेचा ऱ्हास होतो. गर्व, अहंकार, स्वश्रेष्ठत्वासारखे दुर्गुण फोफावतात. आत्मश्लाघांना बळी पडून माणूस हा विनाकारणच इतरांना तुच्छ लेखण्यामुळे समता व बंधुत्वाची राखरांगोळी होते. असत्य आणि दांभिकतेच्या निष्ठूर जबड्यात अवघा समाज याचे दुष्परिणाम भोगत असतो. म्हणूनच इस्लामने यावर जबर आळा आवळला. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"जे आपल्या कार्यांवर ऐट करतात आणि तुरा मिरवितात, इतरांनी केलेल्या प्रशंसेने आनंदीत होतात, त्यांना समजायला हवे की ते ईश्वराने निश्चित केलेल्या शिक्षेपासून वाचणार नाहीत. ईश्वराजवळ त्यांच्यासाठी यातनामय शिक्षा आहे."

(संदर्भ : सूरह-ए-आलि इम्रान - १८८)

## ८) क्रोधाग्नी

मनासारखे न घडल्यास अथवा स्वार्थाला बाधा पोचल्यास किंवा अहं दुखावल्यास माणसाला संताप येतो. खरे पाहता राग येणे हे गरजेचेही आहे. कोणी जर आपल्यावर अन्याय करीत असेल अथवा हकनाक अत्याचार करीत असेल तर अन्याय व अत्याचाराचा मुकाबला करण्यासाठी तसेच आपले प्राण, संपत्ती आणि शालीनतेचे रक्षण करण्यासाठी आपल्याला राग येणे आवश्यकच आहे. मात्र हा राग किंवा संताप अनावर झाल्यास त्याचा क्रोधाग्नीच्या स्वरुपात भडका होतो आणि माणूस आपले भान व विवेकशक्ती हरवून बसतो. नको त्या ठिकाणी आपला क्रोधाग्नी शांत करण्याचा वाटेल तसा प्रयत्न करतो. यामुळे लहानसहान अपराधांपासून ते मोठमोठे अपराध आणि भयंकर रक्तपात व आत्महत्यासारखे प्रकार घडतात. म्हणूनच इस्लामने आपला राग ताब्यात ठेवण्याचा आणि संयम बाळगण्याचा आदेश दिला आहे. अशा संयमी आणि संतापावर ताबा ठेवणाऱ्याची ईश्वराने अशा शब्दांत प्रशंसा केली आहे,

"असे लोक जे प्रत्येक अवस्थेत आपली संपत्ती खर्च करतात, मग ते गरिबीत असो की श्रीमंतीत असो, असे लोक जे आपल्या क्रोधावर ताबा ठेवतात आणि इतरांच्या चुका माफ करतात, ते सदाचारी लोक ईश्वराला खूप पसंत आहेत."

(संदर्भ : सूरह-ए-आलि इम्रान - १३४)

प्रत्येक माणसाला संताप येतोच. मात्र त्यास ताब्यात ठेवण्याच्या पद्धतीं प्रेषित मुहम्मद (स.) यांनी दाखविल्या आहेत. उदाहरणार्थ, राग ही आग असून तिला पाण्याने विझवावी लागते. म्हणून राग आल्यावर पाणी पिणे, स्नान करणे, उभे असल्यास खाली बसणे, बसलेले असल्यास निजणे वगैरेसारख्या पद्धतीं प्रेषित मुहम्मद (स.) यांनी दाखविल्या आहेत. शिवाय या क्रोधाग्नीमुळे घडणाऱ्या अनर्थापासून सुरक्षित राहण्याचीसुद्धा ताकीद प्रेषितांनी केली आहे. (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - इब्ने हजर)

### ९) द्वेष - मत्सर

माणसाला आपला संताप तत्काळ कोणावरही काढता आला नाही तर त्याच्या मनात द्वेष आणि मत्सराची आग धुमसत असते. आपल्यावर झालेल्या अतिरेकाचा वचपा काढण्याची संधी मिळताच तो सूड उगवितो. परिणामी या आगीमुळे रक्तपात आणि यासारखे घोर पातक आणि अनर्थ घडतात. म्हणूनच इस्लामने यापासून स्वतःस सुरक्षित ठेवण्याची ताकीद केली आहे. कुरआनात म्हटले आहे,

(हे ईश्वरा!) "आमच्या मनामध्ये श्रद्धावंतांविषयी कोणताही द्वेष ठेवू नकोस. हे आमच्या पालनकर्त्या! तू मोठा मेहेरबान आणि दयावंत आहेस."

(संदर्भ : सूरह-ए-हश्र - १०)

एकदा आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी अत्यंत सविस्तरपणे गैरसमज, ईर्ष्या बाळगणे, इतरांचे गुपित माहीत करण्याच्या मागावर राहणे, द्वेष, मत्सर बाळगणे आणि एकदुसऱ्यांविरुद्ध कुभांड रचण्यासारख्या गोष्टींची मनाई करताना म्हटले आहे,

"गैरसमज करुन घेऊ नका. कारण हा अत्यंत घृणास्पद खोटारडेपणा आहे, इतरांच्या गुप्त त्रुट्या आणि गुपिते माहीत करून घेण्याच्या प्रयत्नात राहू नका, इतरांचा हेवा करू नका, दलाली करू नका, कुभांड व कट रचू नका आणि आपसांत द्वेष, मत्सर ठेवू नका. ईश्वराच्या आदेशाचे प्रामाणिकपणे पालन करून इतरांशी बंधुभावाने वागा."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - मुस्नदे अहमद)

एके ठिकाणी तर प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले की, "जी व्यक्ती मनामध्ये इतरांविषयी द्वेष आणि मत्सर बाळगते, तिला मोक्ष मिळणार नाही."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - अदबुल मुफ़र्रद)

क्रोध, द्वेष व मत्सराबरोबरच माणसाजवळ थोडी शक्ती आणि सामर्थ्य असेल तर तो इतरांवर अन्याय व अत्याचारांची कुऱ्हाड उगारायला सुरुवात करतो. कुरआनामध्ये अन्यायाचे विभिन्न अर्थ अगर स्वरुप वर्णन करण्यात आले आहेत.

मात्र मानवांवर होणाऱ्या अन्याय व अत्याचारांचा अर्थ असा आहे की लोकांना त्यांच्या अधिकारापासून वंचित करावे. ज्याप्रमाणे लोकांच्या अधिकारांचे विविध स्वरुप आहेत, त्याचप्रमाणे अधिकार हिरावून घेण्याचेसुद्धा विविध प्रकार असू शकतात. प्राण, संपत्ती आणि शालीनतेवर हल्ला करणेसुद्धा अन्याय आहे. तसेच एखाद्याविरुद्ध कट-कारस्थान रचणे, याद्वारे प्राण, वित्त आणि शीलतेवर घाला घालणेसुद्धा घोर अन्याय होय. म्हणूनच इस्लामी कायदा अशा समस्त प्रकारांना निषिद्ध ठरवितो. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"हे प्रेषिता (स.)! त्यांना सांगा की माझ्या पालनकर्त्याने निषिद्ध केलेल्या वस्तु अशा आहेत की निर्लज्ज वर्तन, मग ते उघड असो की गुप्त आणि पाप आणि सत्याच्या विरोधात अतिरेक." (संदर्भ : सूरह-ए-आअराफ - ३३)

"जी पाप व अत्याचाराची कामे आहेत, त्यामध्ये कोणाचेच सहकार्य करू नका, ईश्वराचे भय बाळगा, अशा कर्माची शिक्षा फार कठोर आहे."

(संदर्भ : सूरह-ए-माइदा - २)

अन्याय करतेवेळेस अन्यायी व अत्याचारींना असे वाटते की अन्याय व अत्याचारपीडित माणूस दुर्बल आणि सामर्थ्यहीन असून तो आपले काहीच वाकडे करू शकत नाही आणि मग अन्याय व अत्याचारांची जणू शृंखलाच सुरु असते, ती थांबता थांबत नाही. मात्र प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सडेतोडपणे म्हटले आहे की अंतिम निवाड्याच्या दिवशी अन्याय व अत्याचारपीडितास अन्यायी व अत्याचाऱ्याकडून एकन्-एक अत्याचाराचा बदला मिळेल. पीडितास याची पूर्ण संधी असेल की त्याने आपल्यावर झालेल्या प्रत्येक अन्यायाचा बदला घ्यावा. ही बाब स्पष्ट करताना प्रेषित मुहम्मद (स.) यांनी असे शब्द वापरलेत,

"अंतिम निवाड्याच्या दिवशी तुम्हाला लोकांचे अधिकार अवश्य चुकवावेच लागतील. एवढेच नव्हे तर शिंगे नसलेल्या शेळीलाही शिंगे असणाऱ्या शेळीने जर मारलेले असेल तर शिंगे नसलेल्या शेळीस शिंगे प्रदान करून बदला घेण्याची पूर्ण संधी देण्यात येईल." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - मुस्लिम)

**१०) अहंकार**

इतरांकडे नसलेली गोष्ट अगर वैशिष्ट्ये अथवा शक्ती व सामर्थ्य एखाद्या माणसाकडे असेल, तर तो इतरांना तुच्छ समजतो, हिणवितो आणि याच भावनेला गर्व किंवा अहंकार म्हटले जाते. अहंकार आणि गर्वाचा माज चढला की मात्र उपद्रवी

कर्मे व गुन्हेगारीचा उद्रेक होतो. एवढेच नव्हे तर हीच भावना अपराध वा गुन्हेगारींची जननी आहे. या जननीच्या भरपूर शाखा आणि पालेमुळे आहेत. माणूस अहंकारी भावनांच्या आहारी गेला की तो सैतानास शोभेल असे कर्म करू लागतो. या कर्मांना मग काहीच मर्यादा नसते. अहंकारामुळेच माणूस ईश्वराचा इन्कार आणि त्याची अवज्ञा करण्याइतपत मजल मारतो. सैतानानेसुद्धा हेच केले. गर्व आणि अहंकारामुळेच तो इतरांना पाण्यात पाहतो, ईर्ष्या बाळगतो. कारण आपल्यापेक्षा कोणी वरचढ असेल तर त्याला मुळीच खपत नाही. अहंकाराचा कोरडा सर्वांवरच उगारतो आणि लोक त्याच्या अन्याय व अत्याचारास बळी पडतात. यामुळे गर्विष्ठाला एक अघोरी शांती मिळत असते. अहंकाराच्या झिंगेत इतरांना पायदळी चिरडल्याशिवाय त्याचा आसुरी अहं सुखावत नाही. त्यामुळे गर्व अगर अहंकारामुळे बऱ्याच अपराधाचा जन्म होतो. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"त्यांच्या मनात गर्व भरलेला आहे, परंतु ते मोठेपणा व श्रेष्ठत्वास पोचणार नाहीत ज्याचा ते अभिमान बाळगतात. म्हणून ईश्वराचा आश्रय मागा. तो सर्वकाही पाहतो आणि ऐकतो.' (संदर्भ : सूरह-ए-मुअमिन - ५६)

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले की, "चांगले खाणे, चांगली वस्त्रे व पोषाख वापरणे हा गर्व मुळीच नसून इतरांना आपल्यापेक्षा तुच्छ लेखणे हा गर्व होय."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - अबू दाऊद)

आणखीन एके ठिकाणी म्हटले आहे की "ज्याच्या मनात तिळमात्रसुद्धा गर्व असेल, तो स्वर्गात जाऊ शकणार नाही." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - अबू दाऊद)

## ११) ईर्ष्या

अहंकार आणि गर्वाचीच अनौरस संतान ही ईर्ष्या होय. गर्व म्हणजे माणसाला इतरांच्या तुलनेत, शक्ती, संपत्ती, सौंदर्य, प्रसिद्धी वा एखाद्या गोष्टीचे सामर्थ्य किंवा कोणतीही वस्तु जास्त मिळाली तर याचा माज चढतो. मात्र ईर्ष्या याच्या अगदी उलट आहे. इतरांजवळ जे आहे ते जर आपल्या जवळ नसेल, तर माणसाच्या मनात ईर्ष्या अगर हेवा निर्माण होतो. आपल्याला प्राप्त नसलेल्या मात्र इतरांजवळ असलेल्या बाबी जर नष्ट होत असतील तर त्याला आनंद होतो. ईर्ष्येची आणखीनही बरीच कारणे असली तरी त्याचे मूळ कारण हे गर्व आणि अहंकारच होय. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"काय ते लोकांचा हेवा करतात अशा वस्तुंचा, ज्या त्यांना ईश्वराने आपल्या कृपेने जास्त प्रदान केल्या आहेत." (संदर्भ : सूरह-ए-निसा - ५४)

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी याचा असा विलाज दाखवला की,

"जेव्हा तुमच्यापैकी कोणी आपल्यापेक्षा जास्त संपत्ती आणि संतती असलेला पाहील तेव्हा त्याने अशाजणांनासुद्धा पाहावे, ज्यांना या वस्तु तुमच्यापेक्षाही कमी मिळालेल्या आहेत." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

## १२) प्रसिद्धीची व्यर्थ लालसा

लोकांमध्ये आपली प्रतिष्ठा निर्माण करण्याची आणि इतरांपेक्षा आपणच चांगले वं श्रेष्ठ सिद्ध करण्याची लालसा म्हणजेच गर्विष्ठपणा आणि अहंकाराचाच परिणाम होय. याच अहंकारी भावनेमुळे माणूस गर्वाच्या झिंगेत वावरत असतो. आत्मश्लाघा आणि स्वश्रेष्ठत्वाच्या आसुरी भावनेने माणूस ऐहिक बाबतीतही पेटू शकतो आणि धार्मिक कर्मांच्या बाबतीतही पेटून उठू शकतो. धार्मिक कर्मांबाबतीत तर ही बाब आणखीनच गंभीर सिद्ध होते. कारण ईश्वराच्या प्रसन्नतेखातर जे कर्म करण्यात येते, तेच कर्म ईश्वर स्वीकारतो, तर याउलट जे कर्म ईश्वरेतराच्या प्रसन्नतेखातर करण्यात येते, ते कर्म पुण्य सिद्ध होण्याऐवजी पाप आणि अपराध सिद्ध होते. मोक्षप्राप्तीऐवजी ईश्वराचा कोप पदरी पडतो. याशिवाय स्वत:ची ऐट मिरविण्याच्या अभिलाषेमुळे समाजावर अनिष्ट परिणाम होतो. स्पर्धेची भावना निर्माण होते, स्वत:ला श्रेष्ठ सिद्ध करण्याच्या अघोरी लालसेला बळी पडून सर्व वैध-अवैध आणि सत्य-असत्य मार्गांचा अवलंब माणूस करीत असतो. म्हणूनच इस्लामने या गर्विष्ठपणाचा धिक्कार केला.

ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"त्या लोकांसमान रंगढंग अंगिकारु नका, जे आपल्या घरातून ऐटीत आणि लोकांना आपली शान दाखवीत निघाले." (संदर्भ : सूरह-ए-अनफाल - ४७)

स्वत:ला श्रेष्ठ सिद्ध करण्याची भावना आणि आपल्या चांगल्या कामांची व शौर्याची प्रशंसा लोकांकडून मिळविण्याची लालसा, हासुद्धा अनेकेश्वरवादासम घोर अपराध असून प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले की,

"मला या गोष्टीचे भय वाटते तुम्ही अनेकेश्वरवाद अगर मूर्तीपूजासारखा अपराध कराल. अनेकेश्वरवाद आणि मूर्तीपूजा म्हणजे केवळ एवढेच नव्हे की तुम्ही चंद्र, सूर्य अगर मूर्तींची पूजा करावी, तर अनेकेश्वरवाद आणि मूर्तीपूजा म्हणजे असे कोणतेही पुण्यकर्म जे ईश्वराऐवजी लोकांना प्रसन्न करण्यासाठी अगर लोकांची प्रशंसा मिळविण्यासाठी अथवा प्रसिद्धी मिळविण्यासाठी करण्यात येते."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - इब्ने माजा)

## १३) स्वार्थ

इतरांपेक्षा स्वत:लाच महत्त्व देणे, इतरांच्या हितांची मुळीच पर्वा न करता स्वत:चेच हित जोपासणे, ही एक किळसवाणी भावना माणसाच्या मनात निर्माण होते. जर त्याच्यात एखादी खुबी अगर कौशल्य अथवा कसब किंवा सौंदर्य अथवा संपत्ती, हुद्दा असेल तर त्याला त्यावर बायकी नखरे सुचतात. स्त्रियांमध्ये हा गुणधर्म जरा जास्तच असतो. आपल्या सौंदर्यावर लटकण्या-मटकण्याची भावना पुरुषांच्या तुलनेत स्त्रियांमध्ये जास्त असते. कोणी जर त्यांच्या सौंदर्याची लटकी प्रशंसा जरी केली की त्यांचा आनंद गगनात मावत नसतो. स्त्रिया कधीच आपले वय सांगत नसतात अथवा दहा वर्षांनी कमी करून सांगतात. त्यांना भीती वाटते की आपले मूळ वय सांगितल्यामुळे इतरांच्या तुलनेत कमी तरुण अगर सौंदर्यहीन दिसू. अर्थातच आपल्या सौंदर्य अथवा कौशल्य आणि शौर्य व संपत्तीवर इतरांची प्रशंसा मिळविण्याची भावना हा मुळात बायकीपणा होय. यामुळे इतरांचे अधिकार पायाखाली चिरडण्यात येतात. इतरांना तुच्छ लेखले जाते. हा प्रकार स्वत:लाच धोका देण्यासारखा आहे. म्हणूनच कुरआनामध्ये याची सक्तीने मनाई करण्यात आली आहे. ईश्वराने म्हटले आहे,

"तु स्वत:ला पवित्र (आणि श्रेष्ठ) असल्याचे सिद्ध करण्याचा प्रयत्न करु नकोस. ईश्वरच उत्तमरित्या जाणतो की खरा ईशपरायण कोण आहे."

(संदर्भ : सूरह-ए-नजम - ३२)

अर्थातच आपल्या ईशपरायणता अगर धर्मश्रेष्ठत्व आणि पुण्यकर्माची लोकांकडून प्रशंसा मिळविणे घोर पाप आहे. प्रसिद्धीचे भूत मानगुटीवर बसले की, माणूस चांगले वा पुण्यकर्म करतो मात्र त्याचा लोकांना फायदा होण्याऐवजी नुकसानच होते. समाजावर याचे अनिष्ट परिणाम होतात. आजकाल राजकारण्यांना हा बायकीपणा करण्याचा भलताच छंद लागलेला आहे.

## १४) लालसा व हव्यास

हव्यास आणि लालसा ही एक अशी घृणास्पद भावना आहे की, माणूस यामुळे नैतिक पतनाच्या रसातळाला जाऊन पोचतो, इतरांचे अधिकार पायदळी तुडविले जातात, इतरांची निंदा-नालस्ती आणि द्वेष व मत्सरसारखे अपराध घडतात. लालसेमुळेच माणूस चोऱ्याचकाऱ्या, खून, हत्या व बलात्कारांसारखे गंभीर अपराध करतो. लाच घेतो, मटका, जुगार आणि देहविक्रीसारख्या अवैध मार्गाने पैसा कमावितो,

व्याजखोरी करतो. अर्थातच लालसेमुळे माणूस असे सर्वकाही करतो, जे धार्मिक आणि नैतिक दृष्टिकोनातून अत्यंत घृणास्पद होय. एवढेच नव्हे तर माणूस बऱ्याच वेळा केवळ लालसा आणि हव्यासाला बळी पडूनच नष्टतेच्या खोल गर्ततेत पडतो. म्हणूनच इस्लाममध्ये ही बाब अत्यंत घृणास्पद आणि दुर्दैवी असल्याचे म्हटले गेले आहे. कुरआनात ईश्वराने म्हटले आहे,

"आणि नजरदेखील टाकू नकोस त्या लौकिक जीवनामधील वैभवाकडे, जे आम्ही विविध जणांना दिले आहे, ते तर आम्ही त्यांची परीक्षा घेण्यासाठी दिले आहे, आणि तुझ्या पालनकर्त्याने दिलेली वैध उपजीविकाच उत्तम व चिरस्थायी आहे."

(संदर्भ : सूरह-ए-ताहा - १३१)

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"ज्याप्रमाणे दोन भुकेले लांडगे शेळ्यांसाठी हानीकारक सिद्ध होतात, अगदी यापेक्षाही जास्त माणसासाठी संपत्तीलोलुपता, धार्मिक श्रेष्ठत्व आणि प्रसिद्धीची लालसा हानीकारक सिद्ध होतात." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - मुस्नदे अहमद - ३/४५६)

म्हणजेच माणसाने संपत्तीच्या लालसेपोटी इतके आंधळे होता कामा नये की त्यास नैतिकता आणि अनैतिकतामधील फरकच समजू नये, पैशांचा इतकाही हव्यास असू नये की त्यासाठी वाटेल ते करावे, खून, रक्तपात, देहव्यापार, चोऱ्या-माऱ्या व इतर अन्याय व अत्याचार करता कामा नये. त्याचप्रमाणे कोणतेही पुण्यकर्म आणि कला- कौशल्य तसेच शौर्य हे लोकप्रसिद्धीसाठी करू नये. प्रशंसा मिळविण्यासाठी प्राणांचा बळी देण्यासारखे कर्मसुद्धा ईश्वर स्वीकारीत नाही. लोकांनी आपल्याला दानशूर, धर्मात्मा, महात्मा, साधू-संत, शूरवीर, शहीद वगैरे म्हणावे, आपली खूप प्रसिद्धी व्हावी, जागोजागी आपले नाव व्हावे, पुतळे उभे राहावेत, इतिहासात अगर प्रसारमाध्यमात नाव झळकावे. या भावनेपोटी केलेले कोणतेही पुण्यकर्म ईश्वर स्वीकारणार नाही. कारण अशा भावनांनी पछाडलेली व्यक्ती कधीच कोणाचे भले करू शकणार नाही. याउलट केवळ ईश्वराच्या प्रसन्नतेखातर एखाद्या भुकेल्यास जेवण दिले, तहाणलेल्यास पाणी पाजले, पीडिताचे अश्रु पुसले, तर हे कर्म निश्चितच ईश्वर स्वीकारणार, समाजाचेही भले होणार व त्या व्यक्तीला मोक्षही प्राप्त होईल. म्हणूनच प्रसिद्धी आणि लोकप्रियता मिळविण्यासाठी केलेले कोणतेही कर्म हे अनेकेश्वरवाद आणि मूर्तीपूजेपेक्षा कमी दर्जाचे पाप नाही. म्हणून या पापापासून दूर राहणेच बरे.

## १५) कंजूशपणा

लालसा आणि हव्यासाचेचे एक प्रतीक हे कंजूसी आहे. माणसाच्या मानगुटीवर एकदा का लालसा आणि संपत्तीलोलुपतेचे भूत बसले की मग तो इतका कंजूस होतो की, जेवणातल्या थाळीत पडलेली माशीसुद्धा चाखून खातो. एवढेच नव्हे तर स्वत:च्या भल्यासाठीसुद्धा पैसा खर्च करीत नाही. स्वत:च्या जीवनावश्यक गरजा पूर्ण करण्यासाठीसुद्धा खिशातली दमडी खर्च करण्याचे धाडस त्याला होत नाही. परिणामी स्वत:लाच याचे भयंकर भोग भोगावे लागतात. असा माणूस ना-ना प्रकारच्या संकट आणि समस्यांच्या विळख्यात सापडतो. म्हणूनच इस्लामी कायद्याच्या दृष्टिकोनात ही बाब अतिशय दुर्दैवी आणि घोर अपराध आहे. एवढेच नव्हे तर श्रद्धा आणि कंजूशपणा या दोहोंचा संबंध पाणी आणि अग्नीसारखा आहे. म्हणूच ईश्वराने कुरआनात म्हटले आहे की,

"ज्या लोकांना ईश्वराने आपल्या अनुग्रहाने उपकृत केले आहे, (अर्थात भरपूर संपत्ती प्रदान केली) आणि ते कंजूसी करतात, त्यांनी असे समजू नये की, ही कंजूशपणा त्यांच्यासाठी चांगला आहे. हा तर त्यांच्यासाठी अत्यंत घातक आहे."

(संदर्भ : सूरह-ए-आलि इम्रान - १८०)

## १६) बेईमानी

माणसाच्या मानगुटीवर लालसेचे भूत बसले की, तो कंजूशपणा तर करतोच, शिवाय आपली संपत्ती वाढविण्याचा शक्य त्या पद्धतीने प्रयत्न करतो. यासाठी चोरी, रक्तपात, लाचलुचपत, भ्रष्टाचार, व्याजखोरी, देहव्यापार आणि जुगार व सट्टा अशा ना-ना प्रकारचे अवैध धंदे करतो. यासाठी कोणतीच संधी हातातून जाऊ देत नाही. म्हणूनच याची अर्थात बेईमानीची इस्लामने सक्तीने मनाई केली आहे. ईश्वराने कुरआनात स्पष्टपणे म्हटले आहे,

"हे श्रद्धावंतांनो! एकमेकांची संपत्ती खोट्या पद्धतीने खाऊ नका."

(संदर्भ : सूरह-ए-निसा - २९)

"विनाश आहे काटा मारणाऱ्यांसाठी, ज्याची स्थिती अशी आहे की जेव्हा लोकांकडून घेतात तेव्हा पुरेपूर घेतात आणि जेव्हा त्यास मापून किंवा तोलून देतात, तेव्हा त्यांना कमी देतात." (संदर्भ : सूरह-ए-मुतफ्फि फीन - १ ते ३)

## १७) दारु आणि मादक पदार्थांचे सेवन

अगदी प्राचीन काळापासूनच माणसाला दारु आणि इतर मादक पदार्थांच्या सेवनाची घातक सवय असल्याचे इतिहासात नमूद आहे. शिवाय आजच्या तथाकथित सुसंस्कृत काळात तर ही सवय अगदी शिगेला पोचली आहे. नेहमीच वर्तमानपत्रात

आणि टी.व्ही.च्या बातम्यांतून आपल्याला याचे दुष्परिणाम पाहायला मिळतात. शिवाय आपण हे सर्वकाही डोळ्यांनीसुद्धा पाहतो आहोत. मात्र दारू आणि मादक पदार्थांचे व्यसन हे केवळ जीवावरच बेतते असे नाही, तर यामुळे माणूस असंख्य अपराध करतो. म्हणूनच दारू ही अपराधांची आणि अवैध कामांची जननी होय. याबाबतीत कुरआनात ईश्वराने म्हटले आहे,

"हे श्रद्धावंतांनो! ही दारू आणि जुगार व वेदी आणि शकून ही सर्व अमंगल सैतानी कामे होत, त्यांच्यापासून दूर राहा. आशा आहे की तुम्हाला यश मिळेल. सैतानाची तर हीच इच्छा आहे की दारू व जुगारामुळे तुमच्यात कपट निर्माण करावे आणि नमाजपासून रोखावे." (संदर्भ : सूरह-ए-माइदा - ९०)

या ठिकाणी केवळ दारुच नव्हे तर प्रत्येक पेय आणि पदार्थ, ज्यामुळे माणसाला झिंग येते, विवेकशक्ती हरवते, ते सर्व निषिद्ध ठरविण्यात आले आहे, असे प्रेषित मुहम्मद (स.) यांनीही म्हटले आहे. (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

## ५) इस्लामची अधिकार व कर्तव्यपूर्ती व्यवस्था

वर्तमानकाळामध्ये अपराध अगर गुन्हेगारीच्या धगधगणाऱ्या ज्वालांचे एक मोठे कारण हे मानवी अधिकार पायदळी तुडविणेसुद्धा आहे. पाश्चात्य विचारसरणीच्या गोड विषारी प्रभावामुळे माणूस हा धर्माच्या बंधनांतून मुक्त झाला आणि या बंधनमुक्तीबरोबरच तो नैतिक पतन आणि प्रत्येक प्रकारच्या बेजबाबदारपणाच्या अत्यंत अंधकारमय दलदलीत किचपत पडला आहे. यातून बाहेर निघणे आता जवळपास अशक्य होऊन बसले आहे. माता-पिता, भाऊ-बहीण, सगे-सोयरे, शेजारी-पाजारी, मित्र-स्नेही, समाज-देश वगैरेंचे आपल्यावर काय आणि कोणते अधिकार आहेत, याचा त्याला मागमूसही राहिलेला दिसत नाही. आज माणूस केवळ आणि केवळ स्वत:करिताच जगतो आहे. इतरांच्या अधिकारांची पूर्तता करण्याची नैतिक शिकवण आता इतिहासातच तेवढी दिसते. हेच कारण आहे की या अत्यंत प्रगत आणि आधुनिक काळात, मानवहित, सहानुभूती, त्याग, बलिदान, दया-माया आणि सहकार्य वगैरेसारख्या बाबींची पुरती विल्हेवाट लागलेली दिसत आहे. परिणामी सर्वत्र हाहाकार, उपद्रव आणि अपराध व गुन्हेगारीचा ज्वालामुखी फाटत असताना आपण आपल्या डोळ्यांनी पाहतो आहोत. मात्र इस्लाम धर्माने याबाबतीत अत्यंत यशस्वी उपाययोजना केली आहे. ही उपाययोजना म्हणजे अधिकार आणि कर्तव्यपूर्ततेची परिपूर्ण व्यवस्था होय. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"खबरदार व्हा की, तुमच्यापैकी प्रत्येकजण जवाबदार आहे. नेता हा जनतेप्रति जवाबदार आहे, ईश्वर जनतेसंबंधी त्याला जाब विचारणारच. पुरुषाला आपल्या परिवारासंबंधी ईश्वरासमोर जाब द्यावा लागणार आहे. पत्नी ही आपल्या पतीच्या घरदार व संसाराची देखभाल करण्याचे कर्तव्य पूर्ण करील आणि या कर्तव्यपूर्तीसंबंधी तिला ईश्वरासमोर जाब द्यावा लागणार आहे. नोकराला आपल्या मालकाने दिलेल्या काम आणि मालासंबंधी ईश्वरासमोर जाब द्यावा लागेल. खबरदार! तुमच्यापैकी प्रत्येकास आपल्या अधिकार आणि कर्तव्यासंबंधी ईश्वरासमोर जाब द्यावा लागणार आहे."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

उपरोक्त प्रेषितवचनामध्ये मालकापासून ते नोकर व गुलामापर्यंतच्या अधिकार आणि कर्तव्याच्या जवाबदारीचा उल्लेख करण्यात आला आहे. आणखीन इतर ठिकाणीसुद्धा प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"निश्चितच तुमच्यावर तुमच्या प्राणाचा अधिकार आहे, तुमच्या शरीराला तुमच्यावर अधिकार आहे, तुमच्या परिवारजनांचा तुमच्यावर अधिकार आहे, तुमच्या बायकोचा तुमच्यावर अधिकार आहे, येणाऱ्या पाहुण्याचा तुमच्यावर अधिकार आहे."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

इस्लामने मानवाधिकार आणि कर्तव्यपूर्तीची केवळ विचारसरणी देऊन मानवजातीस वाऱ्यावर सोडले नसून एकन्-एक अधिकार व कर्तव्याचे तंतोतंत मोजमापसुद्धा प्रदान केले आहे. मानवांच्या इतर मानवांप्रति काय काय जबाबदाऱ्या आहेत, त्या मोजून-मापून कायदेशीररित्या ठरवून दिल्या आहेत. प्रत्येक अधिकाराचे नियमानुसार प्रमाण दिले आहेत. असे प्रमाण जगातील इतर कोणत्याच धर्मामध्ये नाहीच मुळी. आता आपण पाहू या की ज्या मानव समाजात आपण राहतो, अर्थात माता-पिता, परिवारजन अगर बायको-मुले, नातलग व गणगोत, शेजारी-पाजारी, स्नेही व मित्रमंडळी, अनाथ, दुर्बल व याचक, विधवा आणि अबला स्त्रिया, गरजवंत, रोगग्रस्त, सामान्यजन, मानव-बांधव, प्राणीमात्र आणि सृष्टीतील इतर सर्वच घटकांचे आपल्यावर काय अधिकार आहेत, त्यांच्या आपल्यावर कोणकोणत्या जवाबदाऱ्या आहेत.

## १) माता-पित्यांचे अधिकार

या जगामध्ये ईश्वरानंतर सर्वांत जास्त उपकार आपल्यावर आपल्या जन्मदात्याचेच आहेत. जन्मापासून तारुण्याच्या उंबरठ्यावर पोहचेपर्यंत माता-पिताच हर-प्रकारे देखभाल करतात. आपली प्रत्येक गरज पूर्ण करण्यासाठी ते तन-मन-धनाची बाजी

लावतात. याबाबतीतही पित्यापेक्षा मातेचा दर्जा जास्तच आहे. कारण ती नऊ महिन्यापर्यंत आपल्या पोटात मूल वाढविते आणि खरे पाहता जगातील कोणतीही लेखणी अशी नाही, जी मातेचे उपकार वर्णन करू शकेल. तिच्या बलिदान आणि त्यागाचे वर्णन करणे हे कोणालाच शक्य नाही. तिचे असीम प्रेम, अमर्याद ममत्व, अथांग दयेचा सागर, तिला पाहून पाषाणालाही फुटणारे पाझर, अगदी सर्वत्र उदासीनता आणि दु:खांचे भयानक सावट असताना तिच्या कुशीत मिळणाऱ्या स्वर्गरुपी शांती-समाधानाची ऊब आणि विसावा, तिच्या डोळ्यांतून पाझरणारे ममत्वाचे कधीही न संपणारे झरे, अर्थात माता ही मानवाला ईश्वराने प्रदान केलेली सर्वात मोठी देणगी! या जगात माता-पित्यांच्या उपकारांना खरोखरंच तोड नाही. म्हणूनच इस्लामने मानवांवर सर्वप्रथम अधिकार हे मातापित्यांचेच असल्याचे बजावले आहे. कुरआनात ईश्वराने माता-पित्याचे अधिकार अशा रीतीने वर्णन केले की,

(१) माता-पित्यांचे आभारी व कृतज्ञ राहावे. (संदर्भ : सूरह-ए-लुक़मान - १४)

(२) त्यांच्याशी चांगले व उत्तमोतम वर्तन करावे. (संदर्भ : सूरह-ए-बनीइस्त्राईल - २३)

(३) त्यांचा यथायोग्य आदर करावा. (संदर्भ : सूरह-ए-बनी इस्त्राईल - २३)

(४) त्यांच्याकरिता आपली संपत्ती खर्च करावी. (संदर्भ : सूरह-ए-बक़रा - २१५)

(५) त्यांच्या प्रत्येक आवडी-निवडीना महत्त्व द्यावे.

(संदर्भ : सूरह-ए-बनीइस्त्राईल - २३)

(६) त्यांच्यासमोर अत्यंत नम्रतेने वागावे. (संदर्भ : सूरह-ए-बनी इस्त्राईल - २४)

(७) त्यांच्यासाठी ईश्वरासमोर प्रार्थना करावी. (संदर्भ : सूरह-ए-बनी इस्त्राईल - २४)

जोपर्यंत माता-पित्यांची छत्रछाया आपल्यावर असेल, तोपर्यंत त्यांची मनोभावाने सेवा करावी. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांना मोक्ष मिळण्याची प्रार्थना करावी. माता-पित्यांचे आपल्यावर किती जास्त अधिकार आहेत, याचा अनुमान कुरआनाच्या या ईश्वरी आदेशावरूनही लावता येतो की, "जर माता-पित्यांनी तुमच्यावर दबाव आणला की, माझ्या (ईश्वराच्या) समवेत कोणासही भागीदार ठरवावे तर, त्यांचे म्हणणे मुळीच ऐकू नकोस. जगात त्यांच्याशी सद्व्यवहार करीत राहा परंतु अनुकरण त्या व्यक्तीचे कर जो माझ्याकडे रुजू झाला." (संदर्भ : सूरह-ए-लुक़मान - १५)

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी असेदेखील म्हटले आहे की, "माता-पिता जर तुमच्यावर अन्याय व अत्याचार करीत असतील तरी तुम्ही ते निमूटपमे सहन करावे आणि त्यांच्याशी उत्तम व्यवहार करावा." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

## २) संततीचे अधिकार

वर्तमानकाळात मुलांवर अतोनात अन्याय व अत्याचार होत आहेत. भौतिकवाद बोकाळल्यामुळे आणि चंगळवादाचे भूत ऊरावर नाचत असल्यामुळे भ्रूणहत्या, गर्भपात, मुलींशी माता-पित्यांची दुय्यम दर्जाची वर्तणूक, लहान वयांत मुलांकडून मजुरीची कामे करून घेणे, त्यांचे शारीरिक, मानसिक आणि लैंगिक शोषण करणे, त्यांची देहविक्रीच्या बाजारात पशु-प्राण्याप्रमाणे विक्री करणे, वगैरेंसारख्या घोर अपराधांनी परिसीमा गाठली आहे. या सर्वच अपराधांना आळा घालण्यासाठी इस्लामने संततीचे अधिकार नेमून दिले आहेत. हे अधिकार जर माता-पित्यांनी पूर्ण केले नाहीत तर त्यांना मात्र ईश्वरासमोर निश्चितच जाब द्यावा लागणार आहे. कुरआनात त्यांचे निम्नलिखित अधिकार स्पष्ट करण्यात आले.

**(१) त्यांना जगण्याचा अधिकार द्यावा.**

"गरिबी व दारिद्र्याच्या भीतीने आपल्या संततीची हत्या करू नका. आम्ही त्यांनाही उपजीविका देतो आणि तुम्हालाही देतो. वस्तुत: त्यांची हत्या करणे हे घोर पाप आहे." (संदर्भ : सूरह-ए-बनी इस्राईल - ३१)

**(२) त्यांचे पालनपोषण करण्यात यावे.**

"मातांनी आपल्या संततीस पूर्ण दोन वर्षे स्तनपान करावे."

(संदर्भ : सूरह-ए-बकरा - २३३)

**(३) त्यांच्या शिक्षण-प्रशिक्षणाची योग्य व्यवस्था करावी.**

"हे श्रद्धाधारकांनो! वाचवा स्वत:ला आणि स्वत:च्या परिवारजणांना त्या नरकाग्नीपासून, जिचे इंधन पापीजन आणि पाषाण आहेत."

(संदर्भ : सूरह-ए-तहरीम - ६)

**(४) मुलगा आणि मुलगीमध्ये भेदभाव करू नये.**

"जेव्हा एखाद्यास मुलीच्या जन्माची खुशखबर मिळते, तेव्हा त्याच्या चेहऱ्यावर काळीमा पसरते व तो रक्ताचे घोट गिळून बसतो. लोकांना तोंड दाखवित नाही. विचार करतो की अपमानित होऊन मुलीला घेऊन राहावे की तिला जमिनीत गाडावे. पाहा कसे वाईट निर्णय आहेत हे." (संदर्भ : सूरह-ए-नहल - ५८,५९)

**(५) त्यांना माया करावी, त्यांच्याशी प्रेमपूर्वक वागावे.**

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी एकदा आपले नातू माननीय हसन (रज़ि) यांचा अत्यंत प्रेमाने मुका घेतला. हे पाहून माननीय इक़रा बिन जाबिर (रज़ि) म्हणाले, "हे प्रेषिता (स.)! मला दहा मुले आहेत, मात्र मी कधीच त्यांचा मुका वगैरे घेत नाही."

यावर प्रेषित मुहम्मद (स.) म्हणाले, ''जो दया-माया करीत नाही, ईश्वरसुद्धा त्याच्यावर दया करीत नाही.'' (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

अशा रितीने इस्लामने मुलांच्या परिपूर्ण रक्षणाचा, शिक्षण-प्रशिक्षण आणि सर्वांगीण विकासाचा परिपूर्ण बंदोबस्त केला आहे.

## ३) पत्नीचे अधिकार

आज या जगामध्ये नव्हे, तर अत्याधुनिक जगामध्ये स्त्री ही ना-ना अन्याय व अत्याचारांच्या ज्वालांमध्ये धगधगत आहे, स्वैर वासनांच्या देवतेसमोर तिची नग्न धिंड काढून तिच्या इभ्रतीसहित तिचा निर्घृणपणे बळी चढविण्यात येत आहे. दोन पैशांच्या फायद्यासाठी तिला विवस्त्र करून तिच्या शालीनतेची लक्तरे टांगण्यात येत आहेत. ती घरात असली की हुंडाबळी आणि बाजारात असली की जाहिरात आणि संस्कृतीच्या नावावर बळी जात आहे. तिला आणि तिच्या शालीनता व दाक्षिण्याला अगदी कवडीमोल उरला नाही. स्त्री-स्वातंत्र्याच्या नावावर तिची वस्त्रे ओरबाडून व तिच्या शरीराचे लचके तोडून तिला रक्तबंबाळ करण्यात येत आहे. पुरुषासारखा पुरुष घरामध्ये बांगड्या घालून तिच्या कमाईवर डल्ला मारीत आहे. तिच्या सहनशीलतेपेक्षाही जास्त ओझे टाकून तिचे दुर्दैवी शोषण करीत आहे. याच जासाच कंटाळून स्त्रियांच्या आत्महत्यांचे प्रमाण पुरुषांपेक्षाही जास्तच आहे. ती प्रत्येकक्षणी सती जात आहे. मात्र इस्लामने तिच्यावर असीम कृपा केली, तिच्या अधिकारांची पूर्तता करण्यासाठी मानवजातीला नियम घालून दिले आणि यामुळे उद्‌भवणाऱ्या गुन्हेगारी परिस्थितीस यशस्वी आळा घातला आहे. तिचे कुरआनात असलेले अधिकार खालीलप्रमाणे आहेत.

### (१) तिला जगण्याचा अधिकार द्यावा.

''जीवंत गाडलेल्या मुलीस विचारण्यात येईल की, (बाळे) तुला कोणत्या अपराधास्तव जीवंत पुरण्यात आले होते?'' (संदर्भ : सूरह-ए-तकवीर - ८,९)

### (२) त्यांचा महर (विवाह भेट) देण्यात यावा.

''स्त्रीयांचे मिहिर सानंद द्या.'' (संदर्भ : सूरह-ए-निसा - ४)

### (३) त्यांच्या जीवनावश्यक वस्तुंचा पुरवठा करा.

''प्रत्येक पित्याने वैधरित्या आपल्या पत्नीला तिला आवश्यक असलेली जीवन साधने उपलब्ध करून द्यावी.'' (संदर्भ : सूरह-ए-बक़रा - २३३)

### (४) त्यांना कैद करता कामा नये.

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे की,

"ईश्वराने स्त्रियांना या गोष्टीची परवानगी दिली आहे की त्यांनी आपल्या गरजेस्तव घराबाहेर पडावे." (संदर्भ : प्रेषित वचन संग्रह - बुखारी)

**(५) त्यांना संपत्तीमध्ये वारसाहक्क द्यावा.**

"जी संपत्ती पुरुषांनी कमाविली आहे, त्यानुसार त्यांचा वाटा आहे आणि जी संपत्ती स्त्रियांनी कमाविली, त्यानुसार त्यांचा वाटा आहे."

(संदर्भ : सूरह-ए-निसा - ३२)

**(६) त्यांच्या शीलत्व आणि प्रतिष्ठेचे रक्षण करावे.**

"जे लोक शीलवान स्त्रीवर व्यभिचाराचा आरोप करतात, जर त्यांनी चार साक्षीदार उभे करून आरोप सिद्ध केले नाही तर, त्यांना (आरोप करणाऱ्यांना) ऐंशी कोरडे मारावेत आणि यापुढे त्यांचा साक्ष देण्याचा अधिकार हिरावून घ्यावा."

(संदर्भ : सूरह-ए-नूर - ४)

**(७) त्यांचा वारसाहक्क देण्यात यावा.**

"माता-पिता आणि नातेवाईकांनी त्यांच्या पश्चात जी काही वारसासंपत्ती सोडली आहे, त्यात पुरुषांप्रमाणेच स्त्रियांचासुद्धा वाटा आहे." (संदर्भ : सूरह-ए-निसा - ७)

**(८) त्यांना भूमिका-स्वातंत्र्यापासून वंचित ठेवू नये.**

"श्रद्धावंत पुरुष आणि श्रद्धावंत स्त्रिया एकदुसऱ्यांचे मित्र आणि काळजीवाहक आहेत. ते एकदुसऱ्यांना सदाचाराचे आदेश देतात आणि दुराचारांपासून रोखतात."

(संदर्भ : सूरह-ए-तौबा - ७१)

याशिवाय इस्लामने पतींना आपल्या पत्नींबाबतीत आदेश दिला आहे,

"पत्नींशी स्नेहपूर्ण आणि उत्तम व्यवहार करावा."

"त्यांच्या हितांची जोपासना करावी." (संदर्भ : सूरह-ए-निसा - १९)

त्यांच्या काही त्रुट्यांकडे दुर्लक्ष करावे. (संदर्भ : सूरह-ए-निसा - १२८)

"त्यांच्या हातून होणाऱ्या चुका उदारमनाने माफ करा."

(संदर्भ : सूरह-ए-निसा - १९)

हे स्त्रियांचे वैधानिक आणि नैतिक अधिकार होत. याशिवाय त्यांच्यावर आपल्या पतिच्या प्रति काही जवाबदाऱ्यांसुद्धा आहेत, त्या खालीलप्रमाणे,

"स्त्रियांनी वैवाहिक जीवनातील आपली वर्तणूक चांगली ठेवावी."

(संदर्भ : सूरह-ए-निसा - ३४)

"आपल्या पतीच्या वैध आदेशाचे पालन करावे."

(संदर्भ : सूरह-ए-निसा - ३४)

"पतीची जी अनामत आपल्याकडे आहे, तिचे रक्षण करावे."

(संदर्भ : सूरह-ए-निसा - ३४)

"वैवाहिक जीवन संयमाने व्यतीत करावे."

(संदर्भ : सूरह-ए-निसा - १२८)

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे, "या जगामध्ये ईशपरायणतेनंतर सर्वांत मोठे ईश्वराचे कृपाफळ हे सदाचारी पत्नीच आहे. अर्थात तिने पतीस समाधान द्यावे. पतीने तिला पाहिल्यास त्याच्या नजरेचे हसतमुखाने स्वागत करावे, पतीने एखाद्या गोष्टीची शपथ दिली तर ती पूर्ण करावी, पती घरी नसल्यास आपल्या शालीनता व पतीच्या संपत्तीचे रक्षण करावे." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - मिश्कात)

## ४) नातलगांचे अधिकार

याचप्रमाणे इस्लामने नातलगांचे अधिकारसुद्धा निश्चित करून दिले आहेत. कुरआन आणि प्रेषितवचन संग्रहात वारंवार नातलगांचे अधिकार जोपासण्याची ताकीद करण्यात आली आहे. त्यांच्याशी संबंधविच्छेद करण्याची मनाई करण्यात आली आहे. ईश्वराने कुरआनात स्पष्टपणे म्हटले आहे,

"निश्चितच ईश्वर न्याय आणि भलाई तसेच नातलगांचे हक्क अदा करण्याची आज्ञा देतो." (संदर्भ : सूरह-ए-नहल - ९०)

कुरआनात नातलगांशी स्नेहपूर्ण संबंध ठेवण्याबरोबरच त्यांची आर्थिक मदत करण्याच्या स्वरुपात भलाई करण्याचा स्पष्टपणे आदेश देण्यात आला आहे. कुरआनात ईश्वराचा आदेश आहे,

"लोक (प्रेषित मुहम्मद (स.)) यांना विचारतात की, आम्ही काय खर्च करावा? तर (हे प्रेषित !) तुम्ही सांगा की, जे काही तुम्ही खर्च कराल, तो आपल्या माता-पित्यांवर, नातेवाईकांवर, अनाथ आणि गोरगरिबांवर आणि वाटसरूंवर (प्रवासात अडचणीत सापडलेल्यांवर) खर्च करा आणि जे काही भले तुम्ही कराल ते ईश्वरास माहीत असेल." (संदर्भ : सूरह-ए-बक़रा - २१५)

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे, "ज्याने तुमच्याशी स्नेहपूर्ण संबंध जोडले, केवळ त्यांच्याशीच संबंध जोडून चालणार नाही, तर ज्याने तुमच्याशी संबंध तोडले, त्यांच्याशी तुम्ही स्नेहपूर्ण संबंध जोडावे."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

## ५) शेजाऱ्याचे अधिकार

माणसाला जगण्यासाठी समाजाची नितांत गरज आहे, एक दुसऱ्याच्या सहकार्याशिवाय माणसाचे जगणे अशक्य होऊन बसते. याच सहकार्याच्या भावनेतून समाज, गल्ली, वसती आणि शहरे व देश उदयास आले, जेणेकरून गरज पडल्यास माणसाला इतरांचे सहकार्य लाभावे. इस्लामी कायद्याने अशा दोन व्यक्ती, ज्या एकदुसऱ्यांच्या जवळ राहतात, त्यांना शेजारी म्हटले आहे आणि याबरोबरच त्यांचे अधिकार आणि कर्तव्य ठरवून दिले आहेत. याविषयी कुरआन आणि प्रेषितवचन संग्रहात शेजाऱ्यांचे जे अधिकार निश्चित करून देण्यात आले आहेत, त्यांपैकी आपण केवळ प्रेषित वचनांचा संदर्भ घेऊ या.

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"शेजाऱ्यांचा तुमच्यावर हा अधिकार आहे की जेव्हा तो आजारी असेल, तुम्ही त्याची शुश्रूषा करावी, तो मरण पावल्यास त्याच्या अंत्यविधीस जावे, जर तुम्ही त्याच्यात एखादी वाईट गोष्ट पाहिली तर इतरांसमोर बोभाटा न करता त्याची सुधारणा करावी, त्याने कर्ज मागितल्यास त्याला कर्ज द्यावे, त्यास आनंद झाल्यास शुभकामना द्यावी, तो संकटात सापडल्यास त्याला संकटमुक्त करावे, त्याच्या घरापेक्षा आपले घर उंच बांधू नये, ज्यामुळे त्याला मोकळी हवा मिळू नये, असे पक्वान्न तयार करू नयेत, ज्याच्या सुगंधामुळे त्याला या गोष्टीची जाणीव व्हावी की आपण असे पक्वान्न प्राप्त करू शकत नाही. म्हणून आपल्या खाद्यान्न आणि सुखात त्याला सहभागी करण्याचा आपल्या ऐपतीनुसार प्रयत्न करावा." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - तिबरानी व हाकिम)

काहीप्रसंगी प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले की,

"तुमच्या शेजाऱ्यास तुमच्या घराच्या भिंतीमध्ये खुंटी ठोकायची असेल तर तुम्ही त्यास परवानगी द्यावी."

"तुमचा शेजारी तुम्हास एखादी भेट देत असेल तर ती परत करू नका, मग ती भेट छोटीशी का असेना."

"तो माणूस श्रद्धावंत (अर्थात मुस्लिम) असूच शकत नाही, ज्याचा शेजारी उपाशी असेल आणि हा त्याच्या भुकेची पर्वा न करता पोटभरून जेवून झोपला असेल."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

वर्तमान अत्याधुनिक युगामध्ये स्नेहसंबंध आणि शेजारधर्म जोपासणारी वाडा-संस्कृती हळूहळू लोप पावत असून त्या ठिकाणी अगदीच भौतिकवादी आणि स्वार्थी असलेली फ्लॅट संस्कृती फोफावली. दया-माया, प्रेम व स्नेह आणि सहकार्याची भावना व

सामाजिक बांधिलकीचा लवलेशही नसलेली ही अप्पलपोटी संस्कृती, चंगळवाद आणि भौतिकतेच्या झिंगेत वावरणारी संस्कृती, कोणाशी काहीही घेणे देणे नसलेली आणि कोणी मरो की जळो याशी काडीमात्र संबंध नसलेली ही विचित्र संस्कृती असल्याने शेजारी हा शेजाऱ्याच्या रक्तासाठी तहाणलेला दिसतो, मने दुभंगलेली आणि चेहऱ्यावर कृत्रिम हसू, संधी मिळताच शेजाऱ्याच्या इज्जतीचे, प्राण व संपत्तीचे रक्षण करण्याऐवजी त्यास बरबाद करण्याची आसुरी इच्छा मनात असल्याने आज संपूर्ण समाज नष्टतेच्या खोल गर्ततेत जाऊन पडला आहे. माणूस हा माणूस असल्याचे दिसत नाही. म्हणूनच या मानवस्वरुपात असलेल्या श्वापदास मानव बनविण्यासाठी इस्लामी शिकवणी आत्मसात केल्याशिवाय पर्याय नाही.

## ६) अनाथ आणि विधवांचे अधिकार

अनाथ मुलांच्या पालनपोषण आणि शिक्षण-प्रशिक्षणाची सर्वस्वी जवाबदारी ही समाजावरच असते. इस्लामने त्यांच्याप्रति आपले काय कर्तव्य आहेत, ते कुरआनात अशाप्रकारे स्पष्ट केले आहेत.

"त्यांच्याशी चांगला व्यवहार करावा." (संदर्भ : सूरह-ए-निसा - ३६)

"त्यांच्या भल्यासाठी आपली संपत्ती खर्च करावी."
(संदर्भ : सूरह-ए-बक़रा - २१५)

"त्यांना कोणत्याही गोष्टीवर झिडकारु नये." (संदर्भ : सूरह-ए-ज़ुहा - ९)

"त्यांच्या संपत्तीचे रक्षण करावे." (संदर्भ : सूरह-ए-अनआम - १५२)

"त्यांच्याशी न्यायाचे वर्तन करावे." (संदर्भ : सूरह-ए-निसा - १२७)

"त्यांच्याशी असा व्यवहार करावा, जसा आपण आपल्या पोटच्या मुलाशी करतो." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

आज अख्ख्या जगामध्ये कोट्यवधी मुले अशी आहेत, जे आपल्या माता-पित्यांपासून दूर, बेवारशीप्रमाणे जीवन जगत आहेत, गलिच्छ वस्त्यांमध्ये खडतर जीवन कंठित आहेत, अपराधी वृत्तींना बळी पडत आहेत. अशा परिस्थितीत इस्लामी शिकवणीचा अंगीकार केल्यास ही समस्या अगदी चुटकीसरशी सुटेल.

ज्याप्रमाणे अनाथ हा समाजाचा अत्यंत दुर्बल घटक असून समाजाच्या सहकार्य आणि स्नेह व प्रेमास पात्र आहे, त्याचप्रमाणे विधवा स्त्रियांसुद्धा समाजाचा अत्यंत दुर्बल घटक असून सर्व समाजाच्या मदतीस पात्र आहे. आजही आपण पाहतो की, इस्लामेतर विभिन्न समाज आणि धर्मांमध्ये विधवा स्त्रियांची कशी अवहेलना होते, तिला किती तुच्छ

लेखण्यात येते, विधवा असल्याने तिच्या विवशतेचा गैरफायदा उचलून तिचे कसे आर्थिक, शारीरिक आणि लैंगिक शोषण करण्यात येते. बऱ्याच ठिकाणी तिचा जगण्याचा व आनंदी वातावरणात वावरण्याचा अधिकार हिरावून घेण्यात आला आहे, तिच्याविषयी अनिष्ट आणि शापित कल्पना व विचारसरणी समाजात पेरण्यात आल्या आहेत, तिला समाजजीवनापासून कलंकिनी व शापिनी म्हणून विभक्त करण्यात आले आहे. एवढेच नव्हे तर तिच्यावर अत्याचाराची यापेक्षा आणखीन गंभीर आणि दुर्दैवी अवस्था काय असू शकते की तिला पतीच्या चितेवर जीवंत जाळून टाकण्यात यावे. मात्र इस्लामने त्या सर्व जुलमी व अत्याचारी जोखडांतून तिला मुक्त केले आणि सन्मानाने जगण्याचा हक्क प्रदान केला. शिवाय तिच्यावर कृपाफळांचा आणि सहकार्य व सहानुभूतीचा वर्षाव करून तिला मान-सन्मान दिला. तिचा नितांत आदर केला. इतरांप्रमाणेच दुसरा विवाह करण्याचा, दांपत्यिक जीवन सुखासमाधानाने व्यतीत करण्याचा, पतीच्या वारसासंपत्तीत भागीदारी होण्याचा परिपूर्ण हक्क दिला आणि मानवजातीस इस्लामने सडेतोडपणे बजावले की, त्यांच्या अधिकारांत कुचराई करणे हा घोर आणि शिक्षापात्र अपराध आहे. शिवाय त्यांना सहकार्य करण्याबाबतीत प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"अनाथ आणि विधवांच्या कल्याणासाठी प्रयत्न करणे हे धर्मयुद्ध करण्यासम आणि दिवसभर रोजा (उपवास) ठेवून रात्रभर नमाज पढण्यासम पुण्य कर्म आहे."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

## ७) इस्लामची न्यायव्यवस्था

न्याय म्हणजे काय हे सर्वांनाच माहीत आहे. अन्यायग्रस्ताला वस्तुतः न्यायाची खरी व्याख्या ताबडतोब समजते. परिभाषा करायची असेल तर दोन वस्तु अगदी तंतोतंत समान प्रमाणात वाटणे म्हणजे न्याय, अर्थात अफरातफरीमध्ये समतोल कायम करणे म्हणजेच कायद्याच्या भाषेत न्याय होय. दुसऱ्या भाषेत असे की एखाद्या प्रकरणात सत्यानुसार निवाडा करण्यात यावा.

कोणत्याही समाजाची सामाजिक बंधने अबाधित ठेवायची असेल तर न्याय हाच मूळ आधार होय. या शिवाय समाजव्यवस्था टिकू शकत नाही. हेच कारण आहे की समाज आणि राज्य टिकविण्यासाठी इस्लामने न्यायव्यवस्थेला असे महत्त्व दिले, जे इतर कोणत्याच धर्मात देण्यात आले नाही. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"ईश्वर न्याय, भलाई आणि नातेवाईकांचे हक्क अदा करण्याची आज्ञा देतो आणि दुष्कर्म व स्वैराचार आणि अन्याय व अत्याचाराची मनाई करतो."

(संदर्भ : सूरह-ए-नहल - ९०)

न्यायपूर्ण वर्तन हेच ईशपरायणतेचा परमोच्च दर्जा असल्याचे कुरआनात म्हटले आहे,

"हे श्रद्धावंतांनो! ईश्वरासाठी सत्यावर अढळ राहणारे आणि न्यायाची ग्वाही देणारे बना. एखाद्या गटाच्या शत्रुत्वाने तुम्हाला इतके प्रक्षोभित करू नये की तुम्ही न्यायापासून विमुख व्हाल. न्याय करा, हे ईशपरायणतेशी अधिक निकटवर्ती आहे."

(संदर्भ : सूरह-ए-माइदा - ८)

न्याय स्थापन करण्याचे विविध प्रसंग असतात. पहिल्या प्रसंगी मानवाने स्वत: आपल्यावरच न्याय स्थापन करावा. याचा अर्थ असा आहे की त्याने इतरांसाठीही तेच पसंत करावे, जे स्वत:साठी करतो. त्याच प्रमाणे स्वत:च्या अधिकारांइतकीच त्याला इतरांच्या अधिकारांचीही जाणीव असावी. म्हणून कुरआनात ही बाब सविस्तरपणे वर्णन करण्यात आली आहे की, न्यायाची स्थापना करायची असेल तर सर्वप्रथम स्वत:वर आणि आपल्या नातलग आणि सगेसोयऱ्यांवर स्थापन करा. कुरआनात म्हटले आहे,

"हे श्रद्धावंतांनो! न्यायावर दृढ़ राहणारे आणि ईश्वरासाठी साक्षीदार बना. यद्यपि तुमच्या न्यायाचा आणि तुमच्या साक्षीचा आघात तुम्हा स्वत:वर अथवा तुमच्या आई-बापावर व नातेवाईकांवर जरी होत असेल तरीदेखील मामल्यातील पक्षकार मग तो श्रीमंत असो वा गरीब, ईश्वर तुमच्यापेक्षा जास्त त्यांचा हितचिंतक आहे. म्हणून आपल्या मनोवासनेच्या अनुकरणात न्यायापासून दूर राहू नका आणि जर तुम्ही पक्षपाताची गोष्ट बोललाच अथवा सत्याला बगल दिली, तर समजून असा की जे काही तुम्ही करता, ईश्वराला त्याची पूर्ण माहिती आहे." (संदर्भ : सूरह-ए-निसा - १३५)

हीच गोष्ट प्रेषित मुहम्मद (स.) यांनी अशाप्रकारे वर्णन केली आहे,

"शपथ आहे त्या ईश्वराची, ज्याच्या हाती माझे प्राण आहे, ती व्यक्ती श्रद्धावंत (मुस्लिम) असूच शकत नाही, जो आपल्या शेजाऱ्यासाठी तीच बाब पसंत करीत नाही, जी स्वत:करीता पसंत करते." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - मुस्लिम)

नेमक्या याच विचारसरणीचा अभाव असल्याचे आज पूर्ण समाजात आणि जगामध्ये अरेरावी माजली आहे. इतरांची चिता जळू द्या, मात्र आपली पोळी तुपात भाजली पाहिजे, या आधुनिक काळातील विचारसरणीमुळे असंख्य जणांचे अधिकार पायदळी चिरडले जात आहेत. यातूनच गुन्हेगारीचे अक्राळविक्राळ राक्षस न्याय, मानवता आणि नैतिकताचा बळी घेत आहे. मात्र इस्लामच्या या मोजक्या विचारसरणीचा अवलंब केला तर निश्चितच गुन्हेगारीवर आळा बसेल आणि मानवतेला अन्यायास बळी पडून न्यायासाठी दारोदार ठेचाळत हिंडण्याची दुर्दैवी पाळी येणार नाही.

न्याय स्थापन करण्याचा दुसरा प्रसंग हा राज्य अगर शासन होय. राज्यशासनानुसार न्याय स्थापन करता येते, मात्र हे लक्षात असावे की, याआधारावर शासन स्थापन जर करायचे असेल तर शासकाने स्वत: आपल्यावर न्यायाची स्थापना करावी. प्रेषित मुहम्मद (स.) आणि सुरुवातीच्या काळातील चारीही इस्लामी शासकांची न्यायव्यवस्था हे याचे उत्तम उदाहरण आहे. हे स्वत: सक्तीने यावर कार्यरत होते.

## न्यायाचे तीन पैलू आहेत

१) वैधानिक न्याय २) सामूहिक न्याय आणि ३) आंतरराष्ट्रीय न्याय. या ठिकाणी आपण सर्व पैलूंवर थोडक्यात चर्चा करू या.

### १) वैधानिक न्याय

वैधानिक न्याय म्हणजे सर्वांना समान न्याय मिळावा. कोणत्याही प्रकारचा वांशिक, आर्थिक, प्रादेशिक, धार्मिक भेद न पाळता आणि आपला व परका न समजता अन्यायपीडितास न्याय देणे हे इस्लामी कायद्याचे पहिले दंडविधान होय. इतिहासामध्ये इस्लामने प्रस्थापित केलेल्या न्यायव्यवस्थेची असंख्य उदाहरणे विरोधकांना तोंडघशी पाडणारे आहेत. विस्तार भयास्तव येथे केवळ एका घटनेचाच उल्लेख करण्यात येत आहे.

प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या काळामध्ये एका उच्चकुलीन अर्थात कुरैश परिवारातील स्त्रीने चोरी केली व प्रेषित मुहम्मद (स.) यांनी इस्लामी दंडविधानानुसार तिचे हात कापण्याचा निवाडा दिला. मात्र कुरैश परिवारजणांना प्रेषितांचा हा निर्णय त्यांच्या प्रतिष्ठेस धक्का लावणारा वाटला. त्यांना वाटले की आपण इतके उच्चकुलीन आहोत आणि समाजामध्ये आपली प्रतिष्ठा राहणार नाही. हात कापण्याच्या शिक्षेमुळे आपण समाजात तोंड दाखवायच्या लायकीचे राहणार नाहीत. म्हणून त्यांनी प्रेषितांच्या जवळचे असलेले उसामा बिन झैद (र.) यांना या बाबतीत शिफारस करण्यास सांगितले की, या शिक्षेत काही कमी करावी. मात्र जेव्हा ही सगळी हकीकत उसामा (र.) यांनी सांगितली, तेव्हा प्रेषित मुहम्मद (स.) यांना खूप संताप चढला आणि त्यांनी स्पष्टपणे बजावले की,

"हे तुम्हाला काय झाले की ईश्वराने निश्चित केलेल्या शिक्षांमध्ये कमतरता करण्याची शिफारस करतात. तुम्हाला माहीत असायला पाहिजे की तुमच्या पूर्वीचे मानवसमुदाय याच कारणास्तव नष्ट झाले आहेत. त्यांच्यातील प्रतिष्ठित व्यक्ती जेव्हा गुन्हा करीत, तेव्हा तिला शिक्षा देत नसे आणि साधारण व्यक्ती जेव्हा एखादा अपराध

करीत तेव्हा तिला शिक्षा देत असे. मी तुम्हाला स्पष्टपणे बजावतो की, जर माझी मुलगी फ़ातिमा (र.) हिने जरी चोरी केली असती तर तिलासुद्धा शिक्षा देण्यात माझी आत्मप्रतिष्ठा आडवी आली नसती. ईश्वराची शपथ! मी तिचेही हात कापले असते.''

(संदर्भ : प्रेषित वचन संग्रह - बुखारी)

इस्लाममध्ये वैधानिक न्यायाचे हेच वैशिष्ट्य आहे की न्याय हा सर्वांसाठी कोणाताही भेदभाव न पाळता करणे आवश्यक आहे. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

''तुम्ही मुस्लिमांपैकी जेव्हा कोणी न्यायाधीश न्यायनिवाडा करीत असेल, तेव्हा त्याने रागाच्या भरात निर्णय देता कामा नये, आणि न्यायालयात हजर असलेल्या पक्ष प्रतिपक्षादरम्यान बसविण्यात आणि पाहण्यातसुद्धा भेदभाव करता कामा नये. एवढेच नव्हे तर इशारा करण्यातसुद्धा भेदभाव करता कामा नये.''

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - जामिउस्सग़ीर)

## २) सामूहिक न्याय अगर सामाजिक न्याय

कोणत्याही मानवास स्पृश्य-अस्पृश्य, प्रतिष्ठित-अप्रतिष्ठित, श्रेष्ठ-कनिष्ठ, गरीब-श्रीमंत आणि आपला परका न मानता समाजातील प्रत्येक व्यक्तीस केवळ माणूस या नात्याने समानरित्या न्यायदानास सामाजिक न्याय असे म्हणता येईल. याच न्यायाची शिकवण इस्लामने दिली आणि केवळ शिकवणच न देता ही न्यायव्यवस्था स्थापन करण्याचा जागतिक आणि ऐतिहासिक विक्रम नोंदविला. कुरआनाने श्रेष्ठत्वाचा अगर प्रतिष्ठेचा आधार सदाचार आणि ईशपरायणतेस देऊन समस्त मानवजातीतील सडक्या व बुरसटलेल्या स्पृश्यास्पृश्यतेचे कृत्रिम भेदभाव नष्ट करून लोकांना केवळमात्र मानवाचा दर्जा दिला आणि याच आधारे न्यायव्यवस्था स्थापन केली. कुरआनात सडेतोडपणे म्हटले आहे,

''तुमच्यापैकी सर्वांत जास्त प्रतिष्ठित माणूस तो आहे, जो तुमच्यापैकी सर्वांत जास्त ईशपरायण आणि सदाचारी आहे.'' (संदर्भ : सूरह-ए-हुजरात - १३)

म्हणजेच प्रतिष्ठा ही ईशपरायणता आणि सज्जनतेतच आहे.

दुसरी गोष्ट अशी की सामाजिक जीवनामध्ये प्रत्येक व्यक्तीस या गोष्टीचा जन्मसिद्ध अधिकार आहे की त्याने आपल्या पात्रता व शिक्षण-प्रशिक्षणानुसार काम करावे. शिक्षण-प्रशिक्षण, प्रगती आणि विकासाची दारे सर्वांसाठीच खुली आहेत. कोणावरही कोणतेही काम करण्याची बळजबरी करणे अगर त्याचे शोषण करणे मुळीच

खपवून घेतले जाणार नाही. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी परखडपणे घोषणा केली आहे की, "ज्या व्यक्तीने ज्या माणसाकडून मजुरी करून घेतली आणि त्याची मजुरीची रक्कम दिली नाही, त्या व्यक्तीविरुद्ध (स्वयं) ईश्वराने युद्धाचे रणशिंग फुंकले."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

अर्थातच एखाद्या माणसाकडून काम करून घेतल्यावर त्याच्या कामाचा मोबदला न देणे म्हणजे ईश्वरी कोपास बळी पडणे होय. म्हणजे कोणाची मजुरीची रक्कम बुडविणारा माणूस हा मुस्लिम होऊच शकत नाही.

## ३) आंतरराष्ट्रीय न्याय

इस्लामने न्याय स्थापन्याची गोष्ट केवळ मुस्लिमांपर्यंतच मर्यादित ठेवली नसून समस्त जगात मुस्लिम आणि मुस्लिमेतरांतही काहीच भेदभाव न बाळगता न्याय स्थापन करण्याची शिकवण दिली आहे. जे लोक अद्यापही इस्लामच्या न्यायप्रिय छत्रछायेत आलेले नाहीत अशा लोकाशीही धर्माच्या आधारावर द्वेष आणि कलह ठेवण्याची इस्लामने मुळीच परवानगी दिली नाही. न्याय म्हणजेच न्याय आणि तो प्रत्येक मानवाचा जन्मसिद्ध हक्क असल्याने मुस्लिमेतरांनाही सारख्याच प्रमाणात मिळावा, मुस्लिमेतरांशीही मुस्लिमांनी स्नेहपूर्ण संबंध ठेवावेत, समता व बंधुभावाची जोपासना करावी, हीच इस्लामची मुख्य भूमिका आहे. ईश्वराने कुरआनात स्पष्टपणे म्हटले आहे,

"ईश्वर तुम्हास या गोष्टीची मनाई करीत नाही की तुम्ही अशा मुस्लिमेतर जणांशी सदाचार आणि न्यायपूर्ण रितीने वागावे, जे धर्माच्या बाबतीत तुमचा विरोध करीत नाहीत आणि ज्यांनी तुम्हाला तुमचे घरदार सोडण्यास भाग पाडले नाही. (अर्थात घर परिवार त्यागण्यास विवश करण्याचे अत्याचार केले नाही.) ईश्वर न्याय करणाऱ्यांना पसंत करतो."

(संदर्भ : सूरह-ए-मुमतिहना - ८)

याच शिकवणीवर आपले आचरण असावे आणि याच आचरणास प्रकारच्या न्यायपूर्ण आधार बनवून इस्लामी कायदा असलेल्या राज्यात मुस्लिमतरांचेही अधिकार मुस्लिमांसम ठरविण्यात आले आहेत. ज्या सवलती आणि संधी व प्रगतीची दारे मुस्लिमांसाठी उघडी आहेत, तीच दारे मुस्लिमेतरांसाठीही उघडी आहेत. इस्लामी शासनाने ज्या जवाबदाऱ्या मुस्लिम रयतेवर टाकल्या आहेत, त्या मुस्लिमेतर रयतेवरसुद्धा टाकल्या आहेत. मुस्लिम आणि मुस्लिमेतर या दोघांना एकच कायदा अगर दंडविधान लागू असेल. उदाहरणार्थ, खून करण्याची शिक्षा इस्लामी कायद्याने देहदंड अगर मृत्यूदंड निश्चित केली आहे. या संविधानानुसार एखाद्या मुस्लिम व्यक्तीने

मुस्लिमेतराचा खून केला असेल तर खुन्यास देहदंड अगर मृत्यूदंडाची शिक्षा होणारच. (संदर्भ : इस्लामी शासनात मुस्लिमेतरांचे अधिकार, लेखक : सय्यद जलालुद्दीन उमरी, इस्लामिक मराठी पब्लिकेशन्स ट्रस्ट मुंबई) इस्लामी न्यायव्यवस्थेच्या या सर्वसामान्य परिचयातून आपल्या लक्षात आलेलेच असेल की, इस्लामने न्यायव्यवस्थेला किती जबरदस्त महत्त्व दिले आहे. एवढेच नव्हे तर इस्लाम धर्म हा मुळात या विश्वामध्ये न्यायाची स्थापना करण्यासाठीच आला आहे. इस्लामी न्यायप्रणाली ही मानवाच्या प्रत्येक क्षण आणि प्रत्येक पडणारे पाऊल आणि प्रत्येक कर्म व क्षेत्राला व्यापलेले आहे. अगदी धंदा-व्यापारातही आणि माणसाच्या अर्थार्जनातही न्याय हीच कसोटी ठरविण्यात आली आहे. कुरआनात म्हटले आहे,

"हे लोकहो! अगदी तंतोतंत न्यायानुसार मोजमाप करून देवाणघेवाण करा आणि लोकांना त्यांच्या हक्कांच्या वस्तूंमध्ये घट करून देऊ नका आणि भूतलावर उपद्रव माजवू नका!" (संदर्भ : सूरह-ए-हूद - ८५)

## ८) गरिबी व दारिद्र्यावर इस्लामी उपाय

मागील एका प्रकरणात आपण हे पाहिलेच आहे की गरिबी आणि दारिद्र्याच्या जाचास कंटाळून एक सत्यवान आणि निरपराधी वृत्तीचा माणूससुद्धा आपले चारित्र्य, शालीनता व ईमानदारी दोन पैशात विकून आपल्या निष्पाप परिवारजनांच्या पोटापाण्याची व्यवस्था करतो, त्याचे पाय कशाप्रकारे गुन्हेगारीकडे वळतात. तेव्हा गुन्हेगारी संपवायची असेल तर गरिबी आणि दारिद्र्याचे समूळ उच्चाटन व्हावयास हवे, असे इस्लामचे प्रांजळ मत आणि स्पष्ट भूमिका असून यावर इस्लामने अत्यंत ठोस व यशस्वी उपाययोजना केली आहे. या उपाययोजनेमुळे मानवास निश्चितच प्रतिष्ठेची भाकरी, परिपूर्ण पोषाख आणि तनावमुक्त जीवनाचा निवारा लाभून अवघे आयुष्य सार्थक होईल. गरिबी-श्रीमंतीतील वैरभाव आणि इर्श्या व द्वेषाचे धगधगणारे निखारे थंड होतील आणि सर्वत्र स्नेह, प्रेम व बंधुभावाची शीतल छाया आणि मंजूळ वारे वाहतील. आता आपण गरिबी व दारिद्र्य निर्मूलताकरिता इस्लामने योजलेली ठोस उपाय योजना कोणती आणि कशी आहे, ते पाहू या.

### १) जकात आणि तिचा विनियोग

इस्लामी कायद्याने माणसाला आपल्या कष्टाची कमाई खाण्याची शिकवण दिली आहे आणि हा सर्वोत्तम उपजीविका-प्रकार असल्याचे म्हटले आहे. मात्र या ठिकाणी ही शक्यता नाकारता येत नाही की, कधी त्याच्या हाताला कामच मिळू शकत नाही किंवा

काम उपलब्ध असले तरी त्याच्यात काम करण्याची पात्रता असू शकत नाही किंवा त्याच्या कमाईपेक्षाही त्याचा खर्च वाढीव असू शकतो, किंवा त्याच्या कमाईपेक्षाही त्याचा खर्च वाढीव असू शकतो, किंवा त्याच्या घरच्या एखाद्या सदस्यास महारोग जडला असल्याने त्याच्या उपचारार्य कमाईच्या प्रमाणात जास्त खर्च होऊ शकतो, शिवाय तो कर्जबाजारीसुद्धा होऊ शकतो, कधीकधी अत्यंत विवश होऊन त्यास एखाद्या सावकारास अगर भांडवलदारास वेठबिगाराच्या स्वरुपात विकणेही भाग पडू शकते आणि शेवटी गरिबी आणि दारिद्र्याच्या दलदलीत जाऊन पडतो. मात्र इस्लामी व्यवस्थेने मानवास असे वाऱ्यावर सोडून दिलेले नाही. अशा अवस्थेत इस्लामने जकात-व्यवस्था स्थापन करून त्यास प्रतिष्ठापूर्ण जीवनाची साधनसामग्री करून दिली. जकातीची रक्कम कोठे आणि कोणासाठी आहे, याचे विश्लेषण करताना कुरआनात म्हटले आहे,

"हे दान तर खऱ्या अर्थी फकीर आणि गोरगरिबांसाठी आहे, आणि दान वसुलीच्या कामावर नेमलेल्यांसाठी आहे, आणि त्या लोकांसाठी ज्यांची दिलजमाई अपेक्षित आहे, तसेच गुलामांच्या मुक्ततेसाठी व कर्जदारांना मदत करण्यासाठी व ईश्वरी मार्गात आणि वाटसरुंच्या सेवेसाठी उपयोगात आणण्याकरिता आहे."

(संदर्भ : सूरह-ए-तौबा - ६०)

उपरोक्त आयतीवरून स्पष्ट होते की जकातीची रक्कम सर्वप्रथम गोरगरिबांना देऊन गरिबी आणि दारिद्र्याचा समूळ नाश करण्यात यावा. अर्थात संपत्ती ही केवळ श्रीमंतांच्याच हातात न राहता गरिबांनाही मिळावी आणि त्यांचे आर्थिक प्रश्न मार्गी लागून प्रतिष्ठेचे जीवन जगता यावे. संपत्ती ही सर्व सामान्यांमध्ये भ्रमण करीत राहावी. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"जेणेकरून संपत्ती तुमच्या श्रीमंतांदरम्यान भ्रमण करीत राहू नये."

(संदर्भ : सूरह-ए-हश्र - ७)

हीच गोष्ट प्रेषित मुहम्मद (स.) यांनी अशारितीने स्पष्ट केली की,

"त्यांना खबरदार करा की त्यांच्यावर जकात अनिवार्य करण्यात आली आहे, जी श्रीमंतांकडून वसूल करून गरिबांत वाटप करण्यात येईल."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

यासंबंधी इस्लामी कायदा असा आहे की जी व्यक्ती आपल्या संपत्तीमधून ठराविक राशीत जकात देत नाही, इस्लामी शासन तिच्याकडून बलपूर्वक जकात वसूल करून पात्र व्यक्तींना अर्थात गोरगरिबांना देईल. (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

## २) वारसाहक्क संपत्तीचा विनियोग

एका व्यक्तीकडून दुसऱ्या व्यक्तीकडे संपत्ती स्थलांतरित करण्याचे आणखीन एक सशक्त माध्यम असे की मयत व्यक्तीच्या संपत्तीची त्याच्या वारसदारांमध्ये न्यायोचित वाटणी करणे होय. यासंबंधी इस्लामी कायद्यामध्ये काही ठराविक नियम घालून देण्यात आले आहेत. जर या नियमानुसार मयताच्या वारसदारांना संपत्ती मिळाली तर निश्चितच गरिबीला आळा बसून अपराधांचे अगर गुन्हेगारीचे उच्चाटन होईल. या वारसदारांमध्ये स्त्रियांचासुद्धा अधिकार आहे, हे विशेष यामुळे स्त्रियांनासुद्धा प्रतिष्ठेने जगण्याची संधी प्राप्त होते. कुरआनात म्हटले आहे,

"पुरुषांसाठी त्या संपत्तीत वाटा आहे, जी आईवडील आणि जवळच्या नातेवाईकांनी मागे ठेवली आहे आणि स्त्रियांसाठीही त्या संपत्तीत वाटा आहे, जी आईवडील आणि जवळच्या नातेवाईकांनी मागे ठेवली असेल, मग ती कमी असो वा जास्त हा वाटा ईश्वराकडून ठरविलेला आहे." (संदर्भ : सूरह-ए-निसा - ७)

"आणि जेव्हा वाटणीच्या वेळी कुटुंबातील लोक आणि अनाथ आणि गोरगरीब आले तर त्यांनादेखील द्या आणि त्यांच्याशी भल्या माणसासारखे बोला."

(संदर्भ : सूरह-ए-निसा - ८)

## ३) खूनभरपाई व गुन्हेगारीचे आर्थिक दंड

आजच्या या काळामध्ये माणूस गुन्हा करतो आणि शिक्षा होऊ नये म्हणून हजारो नव्हे तर लाखो रुपये खर्च करून तोंड लपवित फिरत असतो. मात्र इस्लामी कायद्याने म्हटले आहे की माणसाने एकतर अपराध करूच नये आणि यदाकदाचित त्याच्याकडून अपराध घडलाच तर त्याने अन्यायग्रस्ताची मनवळणी करून त्यास आर्थिक भरपाई द्यावी. कुरआनात म्हटले आहे,

"कोणत्याही श्रद्धावंताचे (मुस्लिमाचे) हे काम नाही की त्याने इतर दुसऱ्या श्रद्धावंताची हकनाक हत्या करावी, आणि जर चुकून त्याकडून असे जर घडलेच तर याचे प्रायश्चित्त असे आहे की एका श्रद्धावंत गुलामास मुक्त करावे आणि मयताच्या वारसदारांना खून भरपाई द्यावी. मात्र अट अशी आहे की मयतांच्या वारसदारांनी (कोणत्याही दबावास बळी न पडता) खुन्यास माफ करावे."

(संदर्भ : सूरह-ए-निसा - ९२)

अर्थातच जाणूनबुजून व हेतुपुरस्सर नव्हे तर चुकून जर कोणाची हत्या झाली तर हा 'दैयत' म्हणजेच खूनभरपाईचा नियम आहे. हत्या झालेल्या व्यक्तीचे वारसदार जर

खुन्यास संपत्ती वा पैशांच्या मोबदल्यात माफ करण्यास तयार असतील तर खुन्याने पैसा अगर संपत्ती खून भरपाईच्या स्वरुपात ते मागतील तेवढी देऊन स्वत:ला मृत्यूदंडाच्या शिक्षेपासून वाचवावे. याशिवाय 'दैयत' म्हणजेच गुन्ह्याचे आर्थिक प्रायश्चित्त करणे हे केवळ हत्येच्या अपराधास्तवच नव्हे तर एखाद्याने कोणी मारले वा जखमी केले किंवा एखादी शारीरिक इजा पोचविली किंवा हात तोडला, कानास इजा पोचविली अथवा डोळा फोडला तर यासाठीही 'दैयत' अर्थात आर्थिक दंडाचे प्रायश्चित्त निश्चित करण्यात आले आहे. याच न्याय प्रक्रियेतून आर्थिक सुधारणाही होते आणि गुन्हेगारीला आळाही बसतो.

याचप्रमाणे इतर बऱ्याच चुकांसाठी प्रायश्चित्ताची व्यवस्था इस्लामने केली आहे. उदाहरणार्थ, रोजा (उपवासाच्या) च्या अवस्थेत पत्नीशी समागम केले, उपवास तोडला, शपथ तुटली तर यासारख्या चुकांवरसुद्धा गरिबांना आर्थिक मदत करून प्रायश्चित्त करणे भाग आहे. इस्लामी कायद्यात म्हटले आहे की, जर कोणी रोजाच्या (उपवासाच्या) अवस्थेत पत्नीशी समागम केले तर त्याने सतत दोन महिने रोजे ठेवून अगर साठ गरिबांना भोजन करवून आपल्या पापाचे प्रायश्चित्त करावे. अर्थातच या प्रकारांमुळे गरिबांचाच आर्थिक लाभ होय. कुरआनात म्हटले आहे,

"हे लोक आपल्या पत्नींशी 'जिहार' करतील आणि मग त्या आपल्या शब्दांपासून परत फिरतील जे त्यांनी उच्चारले होते, तर यापूर्वी की उभयतांनी एकमेकांस स्पर्श करावे, एक गुलाम मुक्त करावा लागेल. याद्वारे तुम्हाला उपदेश केल जात आहे, आणि जे काही तुम्ही करता अल्लाह त्याची खबर राखणारा आहे आणि ज्या व्यक्तीला गुलाम उपलब्ध होत नसेल, तिने दोन महिने उपवास करावेत, यापूर्वी की उभयतांनी एकमेकास स्पर्ष करावा आणि ज्याव्यक्तीस हे सामर्थ्यही नसेल, तिने साठ गरिबांना जेवण घालावे."

(संदर्भ : सूरह-ए-मुजादिला - ३,४)

शपथ तोडण्याच्या प्रायश्चित्ताविषयी कुरआनात म्हटले आहे,

"शपथ मोडण्याचे प्रायश्चित्त हे की, दहा गरिबांना जेवण घालावे, अथवा वस्त्र द्यावीत किंवा एका गुलामास मुक्त करावे आणि ज्याची ऐपत नसेल, त्याने तीन दिवस उपवास करावेत. हे तुमच्या शपथ मोडण्याचे प्रायश्चित आहे, आपल्या शपथांचे पालन करीत जा. अशा प्रकारे अल्लाह आपल्या आज्ञा तुमच्यासाठी स्पष्ट करीत आहे. कदाचित तुम्ही कृतज्ञता दाखवाल."

(संदर्भ : सूरह-ए-माइदा - ८९)

याचप्रमाणे शरियतचे इतर नियम भंग झाले तर विविध प्रकारचे प्रायश्चित्त करण्याच्या पद्धती घालून दिल्या आहेत.

## ४) वारसाहक्क आणि इतरांना संपत्ती अर्पण करण्याचा इस्लामी कायदा

शरियत अर्थात इस्लामी कायद्याने वारसदारांचा संपत्तीतील वाटा ठरवून दिला असला तरी संपत्तीमालकास या गोष्टीचीसुद्धा परवानगी देण्यात आली आहे की तो आपल्या मृत्यूपूर्वी आपल्या संपत्तीचा जास्तीतजास्त एक तृतियांश भाग गोर-गरिबांच्या कल्याणासाठी दान देण्याचे वारसापत्र तयार करू शकतो अगर दान देऊ शकतो. या ठिकाणी प्रेषित मुहम्मद (स.) यांनी यासंबंधी जी शिकवण दिली ती याप्रमाणे होय,

''साद बिन अबि वक़्क़ास (र.) कथन करतात की, एकदा प्रेषित मुहम्मद (स.) हे माझ्या आजारपणाची चौकशी करण्यासाठी आले असता मी मक्का शहरात होतो आणि प्रेषित मुहम्मद (स.) यांना हे पसंत नव्हते की, ज्या ठिकाणाहून स्थलांतर करण्यात आले, त्या ठिकाणी (मक्का शहरात) मृत्यू व्हावा. त्यांनी म्हटले की, ''हे साद (र.) तुमच्यावर (अर्थात माझ्यावर) ईश्वर दया करो.'' मी म्हणालो, ''हे प्रेषिता (स.)! मी आपली संपूर्ण संपत्ती गोरगरिबांसाठी अर्पण करू इच्छितो.'' यावर प्रेषित मुहम्मद (स.) यांनी नकार दिला. ''निम्मी संपत्ती अर्पण करू इच्छितो,'' .... मात्र प्रेषितांनी नकार दिला. मग मी म्हणालो, ''एकतृतियांश संपत्ती दान करण्याचे वारसापत्र करू इच्छितो.'' यावर प्रेषित मुहम्मद (स.) म्हणाले, ''ठीक आहे मात्र हेसुद्धा खूप आहे. कारण तुम्ही आपल्या वारसदारांना दरिद्री व गरीब परिस्थितीत सोडू नका, अर्थात त्यांच्यावर लोकांसमोर हात पसरण्याची पाळी येऊ नये.'' (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

या प्रेषितशिकवणीवरून दोन गोष्टी सिद्ध होतात. प्रथम ही की आपल्या संपत्तीतून गरिबांच्या कल्याणास्तव दान करता येते. द्वितीय असे की, या गोष्टीची जाणीव ठेवावी की, आपले वारसदारसुद्धा निर्धन होऊन भीक मागत फिरता कामा नये. म्हणून जास्तीतजास्त एक तृतियांश संपत्तीच दान करावी. या दोन्ही गोष्टी गरिबी आणि दारिद्र्य निर्मूलनाकरिताच सहाय्यभूत ठरतात.

याचप्रमाणे मुलाचा अक़ीक़ा करणे, सदक़ा (अर्थात दान-धर्म) आणि कुर्बानी वगैरेमुळेसुद्धा गोर-गरिबांचा लाभ करणेच इस्लामला अभिप्रेत आहे. याशिवाय इतरही प्रकारचे दानधर्म करण्याची इस्लामने शिकवण दिली आहे. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे की,

''प्रत्येक मुस्लिम व्यक्तीने सदका (दान) करणे हे अनिवार्य आहे.'' लोकांनी विचारले की, ''जर माणसाची ऐपत नसेल तर?'' यावर प्रेषित मुहम्मद (स.) उत्तरले, ''माणसाने कष्ट करून पैसा कमवावा आणि स्वत:ही लाभ उचलावा व इतरांनाही सदका (दान) करावे.'' लोकांनी विचारले, ''जर याचीही ऐपत नसेल तर?'' ''तर मग कोण्या

दु:खिताची, अत्याचारपीडिताची मदत करावी; एखाद्या गरजवंताची गरज पूर्ण करावी वा त्याची मदत करावी,'' प्रेषित उत्तरले. ''एवढीही ऐपत नसेल तर?'' प्रतिप्रश्न.

''तर मग लोकांशी चांगला व्यवहार करावा आणि आपल्यामुळे इतरांना मुळीच त्रास होऊ देऊ नये, हेसुद्धा सदका (दान धर्म) समान होय.'' प्रेषित मुहम्मद (स.) उत्तरले. (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

## ९) इस्लामी समाजाची काही खास वैशिष्ट्ये

इस्लाम हा सर्वव्यापी आणि कर्मसिद्ध धर्म आहे. तसेच त्याने समाजात कमालीचा समतोल साधला आहे. यामुळेच इस्लामी तत्त्वांवर उभा करण्यात आलेला समाज हा एक आदर्श समाज असल्याचे इतिहासाने गौरविले आहे. पुढे आपण याची काही खास वैशिष्ट्ये थोडक्यात अभ्यासणार आहोत, जेणेकरून या गोष्टींचा अनुमान येईल की, समाजात नैतिक मूल्ये जोपासण्यासाठी इस्लामी कायद्यांनी कोणत्या गोष्टी तर्क करण्याचा आणि कोणत्या गोष्टी आत्मसात करण्याचा आदेश दिला आहे.

### १) समता

काही स्वार्थी वृत्तींच्या महाभागांनी नेहमीच आपला स्वार्थ साधण्यासाठी, सत्ता भोगण्यासाठी, आयतीच व विनाकष्ट मौजमजा करण्यासाठी, संपत्ती नेहमीच आपल्या ताब्यात ठेवण्यासाठी मानवजातीस विविध वर्गांत विभाजित केले. जातीच्या, वर्ण व वंशाच्या, भाषा आणि प्रदेशाच्या तसेच धर्माच्या आधारांवर श्रेष्ठ आणि कनिष्ठ असण्याचे कुभांड रचले. उच्चकुलीन, श्रेष्ठ जातीचा, श्रेष्ठ वंशाचा, विशिष्ट भाषा आणि प्रदेशाचा भासवून आणि यानुसार जुलमी व अत्याचारी कायदा बनवून काहीजणांनी इतरांवर नीच, कनिष्ठ, कलंकित आणि अस्पृष्य असण्याचा फतवा लावला आणि मग सुरु झाली एक विदारक व भीषण शोकांतिका, एक अतिभयानक दुर्दैवाची हृदयद्रावक कहानी, जी आजही विज्ञानयुगात संपता संपत नाही. मानवानेच जाती-धर्म आणि वर्ण-वंशाच्या आधारे मानवांवरच अगदी प्राण्यापेक्षाही जास्त भयंकर अत्याचार आणि जुलूम करून मानवसंहाराचा इतिहास मानवाच्याच रक्ताने लिहिला. ही शोकांतिका आजही अतिप्रगत आणि अत्याधुनिक काळात आपल्याला आपल्याच डोळ्यांनी पहायचे दुर्दैव ओढावलेले आहे. एवढेच नव्हे तर आज मानवांमध्ये गरिबी-श्रीमंतीच्या आधारांवरसुद्धा एवढी दुही आणि मोठी दरी निर्माण झाली आहे की, कारमध्ये फिरणाऱ्या श्रीमंताच्या कुत्र्याला ब्रँडेड कंपणीची बिस्किटे आणि मानवांना मात्र सडलेल्या कचऱ्यांच्या ढिगाऱ्यांवरून पोट भरावे लागते. मानवतेने यापूर्वी कधीच एवढी दयनीय, कलुषित व

शापित अवस्था इतिहासात पाहिल्याचे आढळत नाही. गरिबांच्या कल्याणासाठी उपलब्ध होणारा शासनाचा पैसा नेत्यांच्या व राजकारण्यांच्या तिजोरीत जमा होत राहतो. गरिबी आणि दारिद्र्यांवर मोठमोठे कार्यक्रम, योजना आणि संमेलने भरतात, चिकन, रम, व्हिस्कीच्या पार्ट्या रंगतात आणि दरिद्री गरिबांचे मात्र कधीच कल्याण होत नाही. दीन-दलितांच्या स्त्रियांवरील आणि मुलांबाळांवरील सवर्णांचे अत्याचार थांबता थांबत नाहीत. जागतिकीकरणाच्या स्पर्धेत उतरलेल्या देशांमध्ये स्त्रियांची नग्न धिंड काढणे, हत्या करणे, मानसिक व लैंगिक शोषण करणे वगैरे सर्रासपणे चालूच आहे. कारण एकच की, त्यांचा कोणी वालीच नाही आणि कायदासुद्धा हतबल आहे.

मात्र इस्लामने मुळात सर्वप्रथम अशी श्रद्धात्मक विचारसरणी प्रदान केली आहे की इस्लाम स्वीकारल्यावर त्याला हे समजतच नाही की मानवांमध्ये फरक अगर भेदभाव असू शकतो. कारण इस्लामने शिकवणच अशी दिली आहे की श्रेष्ठ असण्यासाठी किंवा श्रेष्ठ होण्यासाठी जात-पात, श्रीमंती, वंश अगर भाषा व प्रदेश हे आधार मुळीच नाहीत. तर सदाचार आणि ईशपरायणतेमुळेच मानव हा श्रेष्ठ होऊ शकतो. कोणी म्हणेल की, मी उच्चकुलीन, श्रेष्ठ जातीचा, म्हणून मी कोणावरही अन्याय व अत्याचार केले तर चालते, कोणाचेही शोषण करण्याचा मला अधिकार आहे. कारण मी जन्मतःच श्रेष्ठ वंशाचा, श्रीमंत आहे. मात्र इस्लामने अशी अन्यायी व जुलमी विचारसरणी समूळ नष्ट करून टाकली आणि केवळ सदाचार आणि ईशपरायणतेस मानवाच्या श्रेष्ठत्वाचा आधार बनवून समस्त विश्वातील समस्त मानवजातीला समता व बंधुत्वाच्या सुरेख माळेत गुंफले. ईश्वराने सडेतोडपणे म्हटले आहे,

"हे लोकहो! ईश्वराने तुम्हाला एका पुरुष आणि एका स्त्रीपासून निर्माण केले आणि मग तुमची राष्ट्रे आणि परिवार बनविले, जेणेकरून तुम्ही एकमेकांचा परिचय द्यावा. वस्तुतः ईश्वराजवळ तुमच्यांपैकी सर्वांत जास्त प्रतिष्ठित तो आहे, जो तुमच्यांपैकी सर्वांत जास्त ईशपरायण आहे. निश्चितच ईश्वर सर्वकाही जाणणारा आणि खबर राखणारा आहे." (संदर्भ : सूरह-ए-हुजरात - १३)

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी याचे स्पष्टीकरण करताना म्हटले आहे,

"लोकहो! तुम्हा सर्वांचा ईश्वर (आणि पालनकर्ता व निर्माता) एकच आहे, तुम्हा सर्वांचा पिता (आदम) एकच आहे. (म्हणून तुम्ही सर्वच समान आहात.) म्हणून कोणताही अरब अरबेतरापेक्षा श्रेष्ठ नाही, कोणताही गौरवर्णीय कृष्णवर्णीयापेक्षा श्रेष्ठ नाही. तसेच कोणताही अरबेतर अरबापेक्षा श्रेष्ठ नाही, कोणताही काळा कोणत्याही

गोऱ्यापेक्षा श्रेष्ठ नाही. (अर्थात वर्ण व वंशाच्या आधारावर कोणताही माणूस कोणापेक्षा श्रेष्ठ नसतो.) श्रेष्ठ माणूस हा सदाचार आणि ईशपरायणतेच्याच आधारावर असू शकतो.''

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - मुस्नदे अहमद)

एवढेच नव्हे तर प्रेषित मुहम्मद (स.) यांनी हेदेखील सांगितले की,

''तो माणूस मुस्लिम असूच शकत नाही, जो स्वत:ला (कोणत्याही वर्ण, वंश व भाषा प्रदेशाच्या आधारावर) स्वत:ला श्रेष्ठ समजतो आणि इतरांना तुच्छ समजतो. स्वश्रेष्ठत्वासाठी जो माणूस युद्ध करतो, आपला प्राण देतो, तो मुस्लिम असूच शकत नाहीत.''

(संदर्भ : प्रेषित वचन संग्रह - अबू दाऊद)

## २) पडदा पद्धती

स्त्री-स्वातंत्र्याच्या नावावर स्त्रियांना नग्न करून अमाप संपत्ती गोळा करण्यासाठी भडवेगीरी करणाऱ्या भांडवलशाहीलाही ही गोष्ट आज मान्य करावी लागत आहे की स्त्री-पुरुषांच्या स्वैर मिलनामुळे भांडवलशाह यूरोपीयन देश आज कोणत्या रसातळाला पोचले आहेत, लैंगिक-गुन्हेगारी, खून व रक्तपाताने कसा कळस गाठला आहे. मात्र ही गुन्हेगारी नष्ट करण्यासाठी इस्लामने या गुन्हेगारीच्या ऐन मुळावरच घाव घातला आणि समाजातील हे घोर आणि अघोरी पातककर्म नष्ट करण्यासाठी पडदा पद्धत प्रदान करून स्त्रियांच्या शालीनतेचे आणि आया-बहिणींच्या इज्जतीचे रक्षण केले व समाजात माजणारी अराजकता संपविली. पडदा पद्धतीचा अर्थ केवळ एवढाच नाही की, स्त्रियांनी आपले शरीर आणि चेहऱ्यावर पडदा ठेवावा. तर अशा सर्व कर्मपद्धती आहेत, ज्यामुळे समाजात लैंगिक अराजकता माजू नये. उदाहरणार्थ, स्त्री-पुरुषांची स्वैर भेट, वायफळ आणि वाह्यात गप्पा-टप्पा, हस्तांदोलन, परस्त्रियांच्या आवाजातील रंजन, मिलनाची इच्छा आणि लैंगिक उत्तेजना मिळणाऱ्या सर्वच बाबींवर नियमांची बंधने घालण्यात आली. याकरिता इस्लामी कायद्याने सर्वप्रथम आत्मसुधार करण्याचे यशस्वी प्रशिक्षण दिले आणि ईशपरायणता व पापकर्मांची घृणा स्त्री-पुरुषांच्या मनात ठसविली. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

''ज्याने आपल्या पालनकर्त्यासमोर (जाब देण्यास) उभे राहण्याचे भय बाळगले होते आणि मनाला वाईट इच्छेपासून दूर ठेवले होते, स्वर्ग त्याचे ठिकाण असेल.''

(संदर्भ : सूरह-ए-नाज़िआत - ४०,४१)

आणखीन एके ठिकाणी म्हटले आहे, ''व्यभिचाराच्या जवळही फटकू नका. हे अत्यंत वाईट कर्म आहे आणि खूप वाईट मार्ग आहे.''

(संदर्भ : सूरह-ए-बनीइस्राईल - ३२)

याबरोबरच इस्लामने मानवाच्या स्वभाव गुणधर्मात असलेली लाज-लज्जेची भावना वृद्धिगंत करून त्यास अश्लीलता आणि या आधारावर उद्भवणाऱ्या गुन्हेगारीविषयी घृणा निर्माण केली. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"दोन्ही डोळे व्यभिचार करतात आणि हा व्यभिचार म्हणजे परस्त्रीला आणि परपुरुषाला लैंगिक भावनेने पाहणे होय. दोन्ही हात व्यभिचार करतात आणि हा व्यभिचार म्हणजे परपुरुषाला अगर परस्त्रीला स्पर्श करणे होय. दोन्ही पाय व्यभिचार करतात आणि मुख सुद्धा व्यभिचार करते अर्थात परस्त्रीचे चुंबन घेणे हे मौखिक व्यभिचार होय. मन व्यभिचार करते अर्थात मनामध्ये व्यभिचाराचा विचार येतो आणि लैंगिक अवयव शेवटी हे दुष्कर्म करतो." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - मुस्नदे अहमद)

उपरोक्त सादर करण्यात आलेल्या प्रेषित वचनाचा अर्थ हाच आहे की व्यभिचाराची सुरुवात ही नजरेपासूनच होते, मनात लैंगिक विचार काहूर माजवितात आणि मग हे दुष्कृत्य घडते. अर्थात माणसाच्या मनात लाज-लज्जा असली तर हे कृष्णकृत्य घडत नाही. म्हणूनच इस्लामी कायद्याने स्त्री-पुरुषांना आपल्या नजरा खाली ठेवून वावरण्याचा आदेश दिला आहे. याव्यतिरिक्त स्त्रियांना आपल्या सौंदर्याचे आपल्या पतीशिवाय इतर ठिकाणी प्रदर्शन करण्याची मनाई केली आहे. कुरआनात ईश्वराने म्हटले आहे,

"हे प्रेषिता (स.)! श्रद्धावंत पुरुषांना सांगा की त्यांनी आपल्या दृष्टीची जपणूक करावी आणि आपल्या लज्जास्थानांचे रक्षण करावे. ही त्यांच्यासाठी अधिक पवित्र पद्धत आहे. जे काही ते करतात, ईश्वर त्याची खबर घेणारा आहे. हे प्रेषिता (स.)! श्रद्धावंत स्त्रियांना सांगा की, आपल्या लज्जास्थानांचे रक्षण करावे आणि आपला साज-शृंगार दाखवू नये, त्याव्यतिरिक्त जे सहजासहजी प्रकट होईल आणि आपल्या छातीवर आपल्या ओढणीचा पदर घालून ठेवावा." (संदर्भ : सूरह-ए-नूर - ३०, ३१)

हे सर्वकाही असूनसुद्धा माणूस अश्लीलता आणि व्यभिचाराकडे वळू शकतो. अशा परिस्थितीत या गोष्टीची आवश्यकता आहे की, त्याच्या स्वभावगुणधर्मात असलेल्या भावना जागृत करून त्याला या कृष्णकृत्यापासून दूर ठेवण्यात यावे. याचे एक उत्तम उदाहरण आणि उपाय प्रेषित वचनसंग्रहात पाहायला मिळते. एकदा प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याकडे एक तरुण हजर झाला आणि म्हणाला, "हे प्रेषिता ! मला व्यभिचार करण्याची परवानगी द्या." त्याच्या या विचित्र प्रश्नावर प्रेषित मुहम्मद (स.) म्हणाले,

"बाबा रे! तुझ्या मातेसोबत कोणी व्यभिचार केलेला तुला आवडेल काय? तो म्हणाला...."नाही!"

"तुझ्याप्रमाणेच इतरांनाही ते आवडणारे नाही." प्रेषित उत्तरले. मग परत म्हणाले, "तुझ्या मुलीसोबत, तुझ्या बहिणीसोबत कोणी व्यभिचार केला तर तुला आवडेल काय?"

"नाही! मुळीच नाही!"

"मग इतरांनासुद्धा ते आवडणार नाही." प्रेषित उत्तरले. अर्थातच ज्याप्रमाणे माणूस आपल्या माता, मुलगी आणि बहिणीच्या इज्जतीचे रक्षण करतो आणि त्यांच्यावर इतरांनी डोळा ठेवणे सहन करीत नाही, त्याचप्रमाणे इतरांनाही हेच वाटते. मग आपणही आपल्याप्रमाणेच इतरांची अवस्था जाणावी. याच जाणिवेमुळे माणूस आपल्यातील लैंगिक दुराचारावर ताबा मिळवू शकतो." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह-मुस्नदे अहमद)

आजच्या या अत्यंत प्रगत आणि अत्याधुनिक काळामध्ये मानवाने एवढी प्रगती केली की या प्रगतीच्या झिंगेत रक्ताचे नातेसुद्धा विसरून गेला. आपलीच पोटची मुलगी, आपलीच बहीण आणि तुम्ही जर वाचायचे धैर्य कराल तर जन्मदाती मातेबरोबरसुद्धा लैंगिक अत्याचारांच्या घटना समोर येत आहेत. प्रश्न असा आहे की, जेव्हा नात्यातील पावित्र्यच नष्ट झाले तर गुन्हेगारीवर आळा कसा आवळायचा? याचे एक स्पष्ट उत्तरसुद्धा इस्लामने दिले आहे. ते असे की अशा अपराध्यांना इतकी कठोर शिक्षा दिली पाहिजे की, ही शिक्षा पाहून परत हे कृष्णकृत्य करण्याचे कोणालाही धाडस होणार नाही. जो माणूस हे भयंकर पाप करील त्याला मृत्यूदंडाची शिक्षा देण्याचा आदेश प्रेषित मुहम्मद (स.) यांनी दिला आहे. (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह-इब्ने - माजा)

## ३) सत्याचा आदेश देणे आणि असत्यापासून रोखणे

इस्लामी कायद्यात हे एक अत्यंत महत्त्वाचे दंडविधान तर आहेच, शिवाय प्रत्येक माणसाचे हे परम कर्तव्यच आहे की, त्याने भलाईचा आणि सत्याचा आदेश द्यावा आणि वाईट कर्म घडत असल्याचे पाहून, तसेच अन्याय व अत्याचार होत असलेले पाहून आपल्या शक्ती व सामर्थ्यानुसार ते थांबवावेत. अर्थातच इस्लामने उभारलेली ही व्यवस्था खूप व्यापक आहे. या सद्कार्यात संपूर्ण धर्माची शिकवण आणि प्रचार व प्रसार सामील आहे. मात्र या ठिकाणी यावर सविस्तर वर्णन करण्याची संधी नाही. या ठिकाणी केवळ या व्यवस्थेच्या वैधानिक स्वरुपावर थोडक्यात चर्चा करण्यात येत आहे, जेणेकरून या इस्लामी दंडविधानाच्या माध्यमाने गुन्हेगारी निर्मूलनाचे कार्य कशाप्रकारे होते, हे लक्षात येईल.

जगातील कोणतेही राष्ट्र असो की समाज असो, त्यात सुधारकार्य होत नसेल तर पुण्य-पाप, बरे-वाईट, सत्य-असत्य व यासारख्या सर्वच प्रवृत्ती कमी-जास्त प्रमाणात असतात आणि हे स्वाभाविकसुद्धा आहे. मात्र चिंता आणि काळजीची बाब अशी आहे की, समाजात असत्य, अन्याय व अत्याचाराला वेळीच वेसन घातली नाही आणि वाईट कर्म रोखण्याचा प्रयत्नच करण्यात आला नाही, तर अशी विस्फोटक परिस्थिती निर्माण होते, जशी आज आहे. बळी तो कान पिळीसारखी अवस्था निर्माण होते. अन्याय आणि गुन्हेगारीपासून लोकांना रोखणे म्हणजे लोकांचे कर्म स्वातंत्र्य हिरावून घेण्याची विक्षिप्त व्याख्या करून अपराध्यांसाठी मोकळे रान सोडण्याचे पातक आज सर्रासपणे चालू आहेत. आज प्रत्येकजण म्हणे स्वतंत्र आहे. स्वातंत्र्य हा त्याचा जन्मसिद्ध हक्क आहे. काहीही करण्याचा, कोणावरही अत्याचार करण्याचा, कोणतेही अनैतिक कर्म करण्याचा, व्यभिचार करण्याचा, नग्न नाचण्याचा, सर्वकाही करण्याचा त्याला जन्मजात हक्क आहे म्हणे. हा अधिकार हिरावून घेण्याचा समाजाला, आई-वडील आणि परिवारजणांनासुद्धा अधिकार नाही म्हणे. हेच कारण आहे की आज सर्वत्र अपराधी कर्मांनी शिखर गाठले आहे. स्वातंत्र्याच्या नावावर स्वैराचार बोकाळला आहे. जगण्याचे स्वातंत्र्य आणि स्वैराचारी जीवन यातील फरकच नष्ट झाला आहे. पावसाळ्यात स्वैरपणे वागणाऱ्या कुत्र्या-कुत्रींसारखी अवस्था मानवाची झालेली आहे. अशा या धगधगणाऱ्या स्फोटक परिस्थितीत केवळ एकच पर्याय शिल्लक दिसतो आणि तोपर्याय म्हणजे इस्लामचे हे दंडविधान लागू करणे होय आणि प्रत्येक व्यक्तीस सत्याचा आग्रह आणि काळ्या गुन्हेगारीपासून इतरांना रोखण्याचा अधिकार देण्यात यावा. कुरआनात हे सद्कार्य प्रत्येकाचे परम कर्तव्य असल्याचे म्हटले आहे,

"आता जगात तो सर्वोत्तम जनसमुदाय तुम्ही आहात ज्याला मानवाच्या मार्गदर्शन आणि सुधारणेकरिता उभे करण्यात आले आहे. तुम्ही सदाचाराचा आदेश देता व दुराचारापासून रोखता आणि ईश्वरावर श्रद्धा बाळगता."

(संदर्भ : सूरह-ए-आइल इम्रान - ११०)

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"ज्या ठिकाणी तुम्ही एखादे वाईट कर्म होत असलेले पाहाल, तर ते वाईट कर्म तुम्ही आपल्या बळाचा प्रयोग करून रोखा, हे शक्य नसेल तर तोंडाने त्याचा विरोध करा, हेही शक्य नसेल तर कमीतकमी मनात त्याविषयी घृणा बाळगा, मात्र हा श्रद्धेचा अंतिम दर्जा आहे." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - मुस्लिम)

आणखीन एके ठिकाणी प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"अन्यायी व अत्याचारीस अन्याय व अत्याचार करताना पाहून त्या पातकास जर लोक रोखत नसतील (आणि आपल्याला काय घेणे देणे म्हणून अन्यायी व अत्याचारीस रान मोकळे सोडतील) तर समजा की ईश्वराचा कोप उपस्थित आहे."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - तिर्मिजी)

अपराधी हा गरीब असो की श्रीमंत असो, अधिकारी असो की नोकर असो, लहान असो की मोठा असो, समर्थ असो की असमर्थ असो, दुराचारापासून आणि अन्याय व अत्याचारापासून इतरांना रोखण्याचा प्रत्येकालाच पूर्ण अधिकार आहे. कारण जगातील प्रत्येकाला आपल्या कर्माचा हिशेब द्यावा लागणार आहे. मागे यासंबंधी आपण सविस्तरपणे प्रेषित मुहम्मद (स.) यांचे वचन वाचलेच आहे. त्यात त्यांनी याबाबतीत प्रत्येकालाच खबरदार केले आहे.

इस्लामी कायद्यात ही बाब स्पष्ट करण्यात आली आहे की ज्याप्रमाणे मुलाचे माता-पिता आपल्या मुलाने केलेल्या चुकांची विचारपूस करु शकतात, त्याचप्रमाणे मुलांनासुद्धा या गोष्टीचा पूर्ण अधिकार आहे की त्यांचे आई-वडील एखादी चूक करीत असतील तर त्यांनी आई-वडिलांना त्यापासून रोखावे. नसता मुलांना या गोष्टीचा जाब द्यावा लागणार. त्याचप्रमाणे पत्नी आपल्या पतीला, नोकर मालकाला, लहान मोठ्याला दुराचार आणि गुन्हेगारीपासून रोखण्याचा पूर्ण अधिकार बाळगतात. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"इस्लाम धर्म हा मुळात इतरांचे हित जोपासण्याचे आणि सर्वांचेच भले करण्याचे नाव आहे, ईश्वरासाठी, प्रेषितासाठी, मार्गदर्शनासाठी आणि सर्वसाधारण मुस्लिमांसाठी."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

सत्य स्थापना, भल्याचा आदेश देणे आणि दुराचारापासून रोखण्याचे हे कर्म केवळ वैयक्तिक नसून सामूहिक जवाबदारीचे कर्म आहे. त्यामुळे इस्लामी शासनाचेसुद्धा हे सर्वप्रथम आणि सर्वोच्च कर्तव्य आहे. इस्लामी शासकाचे हे सर्वप्रथम कर्तव्य असेल की, त्याने सत्याची आणि भलाईची आज्ञा लागू करावी आणि असत्य, अन्याय व अत्याचार तसेच गुन्हेगारीस आळा घालण्याची व्यवस्था लागू करावी.

## ९) समस्यांचे समाधान आणि इस्लामी उपाय

समस्या आणि सुटता-सुटता न सुटणाऱ्या अडचणींना वैतागून, वैफल्यग्रस्त होऊन आज माणूस गुन्हेगारीच्या विळख्यात सापडला आणि येथेही त्याची आशा पूर्ण होत नसल्याने तो आत्महत्येसाठी परावृत्त झाला. म्हणूनच गुन्हेगारी संपवायची असेल तर मानवाभोवती आवळलेला हा जुलमी आणि अत्याचारी विळखा नष्ट करावाच लागेल

आणि यासाठी इस्लामशिवाय पर्याय नाही. यासंबंधी इस्लामची भूमिका अशी आहे की या जगात इष्ट असो वा अनिष्ट असो सर्वकाही ईश्वराच्या मर्जीनेच घडते. यात इतर कोणाची किंचितही दखल नाही. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"आम्ही अवश्यरित्या तुम्हाला भय व भीती, उपासमार, प्राण आणि संपत्ती तसेच अर्थार्जनात तोटा देऊन तुमची परीक्षा घेऊ. या परीक्षणस्वरुपी परिस्थितही जे लोक संयम आणि धैर्य ठेवतात, त्यांना (यशस्वीतेची) शुभवार्ता द्या."

(संदर्भ : सूरह-ए-बक़रा - १५५)

"तुमच्या पूर्वी बऱ्याच राष्ट्रांकडे (त्यांच्या मार्गदर्शनासाठी) प्रेषिते पाठविलीत आणि त्यांची विविध प्रकारे परीक्षा घेतली, की त्यांनी नम्रतेने आमच्या (ईश्वराच्या) समोर नतमस्तक व्हावे." (संदर्भ : सूरह-ए-अनआम - ४२)

वरील आयतीच्या शिकवणीवरून हे स्पष्ट होते की, मानवजीवन हे समस्या आणि संकटांनी ग्रस्त आहे. जगी सर्वसुखी असा कोणीच नाही. प्रत्येकाला समस्या आणि दु:खांचा सामना करावाच लागतो. मात्र या समस्या आणि दु:ख म्हणजेच मानवाची परीक्षा होय. समस्यांच्याच कसोटीमध्ये मानवाच्या नैतिकतेला आणि सदाचाराला चकाकी येते. जर माणसाची श्रद्धा आणि ईमान कमकुवत असेल तर माणूस संयम, धैर्य आणि सदाचाराची कास सोडतो. मात्र खरा श्रद्धावंत आणि ईमानदार माणूस ईश्वरावर विश्वास ठेवून पर्वतासारख्या संकटालाही मुळीच घाबरत नाही. तो जर संकटसमयी सत्याची कास धरून राहिला तर ईश्वर त्याच्यावर खूप प्रसन्न होतो. अर्थातच यामुळे श्रद्धावंताचे शौर्य आणि धैर्य वाढते, जगण्याला खरा अर्थ निर्माण होतो. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"ईश्वर ज्याचे भले करू इच्छितो, त्याची ना-ना समस्यांद्वारे परीक्षा घेतो."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी हेसुद्धा म्हटले आहे,

"ईश्वर जेव्हा कोणाचे भले करू इच्छितो, तेव्हा त्याच्या अपराधांची (समस्या व रोगराईच्या स्वरुपात आणि दु:खदायक घटनांच्या स्वरुपात) त्याला शिक्षा देऊन त्यास पापमुक्त करतो. याउलट ईश्वर जेव्हा कोणाची पकड करू इच्छितो तेव्हा त्यास खूप सुख-साधने देतो आणि अपराधांची संधी देतच राहतो, जेणेकरून त्यास भरपूर शिक्षा द्यावी."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - तिर्मिजी)

प्रेषित मुहमम्द (स.) यांचे हे वचन निश्चितच माणसाला आत्मिक समाधान आणि धैर्य व संयमाची प्रचंड शक्ती प्रदान करते. यासाठी आणखीन काही बाबींचा खाली उल्लेख करण्यात येत आहे.

## १) संयम : समस्यांचे समाधान

सहनशीलता आणि संयम हे प्रत्येक यशस्वी मार्गाची जणू गुरुकिल्लीच आहे. यामुळे माणूस समस्या आणि संकटांच्या डोंगरातूनही मोठ्या कौशल्याने आपले लक्ष गाठण्यात यशस्वी होतो. संयमी आणि सहनशील लोकच ऐहिक आणि पारलौकिक जीवनात यशाची मधुर फळे चाखू शकतात. ईश्वराने म्हटले आहे,

''जे तंगीमध्ये आणि संकटसमयी सत्य-असत्याच्या युद्धात संयम आणि धीर बाळगतात, हेच लोक रास्तबाज आणि ईशपरायण आहेत.''

(संदर्भ : सूरह-ए-बक़रा - १७७)

जीवन हे समस्या आणि दु:खाने ग्रस्त आहे. रोगराई, आर्थिक तंगी, अपयश, मृत्यू आणि ना-ना समस्याच समस्या चोहीकडे भोगाव्या लागतात. मात्र इस्लामने त्याला प्रेरित केले आहे की या समस्यांना न घाबरता सत्याची कास सोडता कामा नये. हीच मानवाची खरी कसोटी आहे. उदाहरणार्थ, आर्थिक तंगीमुळे माणूस खचून जातो. मात्र अशा प्रसंगीसुद्धा अर्थार्जनासाठी तो गुन्हेगारीचा अवलंब करता कामा नये, धीर आणि संयमाने परिस्थितीचा सामना करून परिस्थितीवर मात करून सत्याला आणि ईशप्रसन्नतेला उराशी कवटाळल्यानेच जीवन समाधानी होते आणि परलोकी जीवनात मुक्ती मिळते.

याचप्रमाणे रोगराई आणि आजारासारख्या समस्यांतही माणसाला सत्य, ईशपरायणता व संयम आणि धैर्याची प्रेरणा देण्यात आली आहे. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

''जेव्हा श्रद्धावंतास एखादा आजार अगर रोग जडतो, एखाद्या गोष्टीची काळजी आणि हुरहुर लागते अथवा दु:ख आणि त्रास होत असतो, एवढेच नव्हे तर साधा काटाही बोचतो, तेव्हा या समस्यांमुळे ईश्वर त्याचे पाप आणि अपराध माफ करतो.''

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

ही किती आत्मशांती आणि समाधानाची बाब आहे. ज्याची खरोखरच ईश्वरावर श्रद्धा असेल आणि पारलौकिक जीवनात मोक्ष मिळण्याची ज्याला कामना असेल, तो निश्चितच सत्य, ईशपरायणता आणि सदाचाराची कास कोणत्याही समस्या आणि संकटात सोडणार नाही. त्याची पाऊले कधीच गुन्हेगारीकडे वळू शकत नाहीत.

## २) संकटग्रस्तांविषयी सहानुभूती

संकटात सापडायचे, दुःख झेलायचे आणि स्वतःच यातना भोगायच्या, संयमही ठेवायचा आणि धीरही धरायचा, असे सांगितले जाते. मात्र माणूस हा माणूस असतो. त्याला अत्यंत नाजूक आणि हळवे मन असते. या हळव्या आणि नाजुक मनात भावना असतात. तुम्ही कोणाच्या दुःखावर अगर जखमेवर फुंकर घाला, एखाद्या दुःखीताच्या डोक्यावरून मायेचा हात फिरवा, मग पहा त्याच्या भावनात कसे वादळ येते, त्याच्या डोळ्यांतून तुमच्या उपकारांप्रति कृतज्ञतेचे आणि आभाराचे असंख्य झरे वाहू लागतात, हा मानवी स्वभाव आहे.

इस्लाम हा केवळ काही नियम आणि वैधानिक आचार-विचारांवर आधारित धर्म नसून तो एक नैसर्गिक धर्म आहे. त्याने माणसाच्या भावनांचा आदर केला आहे. त्याच्या इच्छा-आकांक्षा दाबून आणि दडपून न टाकता त्यांना नैतिक दिशा दाखविली आहे. अर्थात इस्लाम म्हणजेच नैसर्गिक नियम, याच नियमावर समस्त सजीव आणि निर्जीव सृष्टी अस्तित्वात आहे, त्याचप्रमाणे इस्लाम हाच मानवाचा स्वभाव आहे. म्हणूनच इस्लामने कोणालाही केवळ संयमाची शिकवण देऊन वाऱ्यावर न सोडता त्याच्या समस्या दूर करण्याची पूर्ण निसर्गप्रदत्त व्यवस्था केली आहे. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"मुस्लिम हा मुस्लिमाचा बंधु आहे. तो कोणावरच (मुस्लिमेतरांवरसुद्धा) मुळीच अत्याचार करीत नाही आणि कोणालाही इतर अन्यायी व अत्याचारीच्या स्वाधीन करीत नाही. त्यामुळे जो माणूस आपल्या मानव-बांधवांच्या मदतकार्यात व्यग्र असतो, ईश्वर त्याची मदत करतो. जो माणूस आपल्या मानव-बांधवांचे संकट दूर करतो, ईश्वरही अंतिम निवाड्याच्या दिवशी त्याचे संकट दूर करतो आणि जो माणूस इतरांचे (इतरांना प्रभावित न करणाऱ्या) पापांवर (आणि चुकांवर) पडदा टाकून त्यास इतरांसमोर अपमानित करीत नाही, ईश्वरही अंतिम निवाड्याच्या दिवशी त्याच्या दुर्गुणांवर पडदा टाकून अपमानित करणार नाही." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

## ३) आत्महत्येची निषिद्धता

माणूस संकटांना घाबरून मृत्यूची कामना करतो, आपली जीवनलीला संपवून टाकतो. मात्र ही बाब षंढकार्य आणि न्यूनगंड असून इस्लामने या बाबी मुळीच पसंत केले नाही. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"तुमच्यापैकी कोणत्याही माणसाने (समस्या आणि संकटांना घाबरून जाऊन) मृत्यूची इच्छा बाळगता कामा नये. कारण तो जर भला व सदाचारी माणूस असेल तर त्याच्या पुण्यांत वृद्धी होते आणि गुन्हेगार व पापी असेल तर प्रायश्चित्ताची सद्बुद्धी मिळेल."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

माणसाला वाटते की आत्महत्या करून आपण संकटमुक्त होऊ या. मात्र असे मुळीच नाही. इस्लामने स्पष्ट केले आहे की आत्महत्या केल्याने तो आणखीनच जास्त मोठ्या संकटात सापडतो. कारण तो ज्या पद्धतीने आत्महत्या करतो, तशीच यातना त्याला नेहमीसाठी भोगावी लागणार आहे. त्यामुळे माणसाने आत्महत्येचा मुळी विचारसुद्धा मनात येऊ देता कामा नये. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"जो माणूस पर्वतावरून स्वत:ला झोकून जीव देईल, तो सरळ नरकाग्नीत जाऊन पडेल आणि नरकाग्नीत पडतच राहण्याची यातना नेहमीकरिता भोगावी लागेल. जो माणूस विष पिऊन प्राण देईल, तो नेहमीसाठी नरकाग्नीत विष प्राशन करीत राहील, जो माणूस लोखंडी सळईने स्वत:चा प्राण देईल, त्याला नेहमीसाठी नरकाग्नीत हीच यातना मिळत राहील आणि हा माणूस नरकाग्नीपासून कधीच मुक्त होणार नाही."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

इस्लामच्या या शिकवणी माहीत असलेला श्रद्धावंत कधीच आत्महत्या करण्याचा विचारदेखील करू शकत नाही.

## १०) अपराध निर्मूलनाचे काही तात्काळ उपाय

उपरोक्त मजकुरामध्ये ज्या बाबींचे वर्णन करण्यात आले आहे, त्या बाबी म्हणजे माणसाने स्वत:हून अपराध न करण्यासाठी प्रेरणादायक गोष्टी आहेत. अर्थातच इस्लामी शिकवणींच्या आधारे माणसाने स्वत: प्रेरित होऊन अपराधी कर्मांपासून दूर राहण्यासाठी होय. आता आपण अशा उपायांसंबंधी चर्चा करू या, जे इतरांतर्फे होणाऱ्या संभावित गुन्हेगारींचे निर्मूलन करतात. निश्चितच माणूस हा स्वत:ही अपराध करतो आणि इतरांकडून होणाऱ्या गुन्हेगारींचेही भोग भोगतो. या दोन्ही स्वरुपांच्या समस्यांचे समाधान झाले तरच खऱ्या अर्थाने गुन्हेगारीचे पूर्णत: निर्मूलन शक्य आहे. म्हणजेच माणसाने स्वत:ही अपराध करू नये आणि इतरांनाही अशी संधी उपलब्ध होऊ देऊ नये. या ठिकाणी प्रत्यक्ष इस्लामी कायद्याने दिलेल्या गुन्हेगारी निर्मूलनाचे उपाय आपण पाहणार आहोत.

## १) आक्रमक हल्ल्यापासून बचावाचे उपाय

जणू हा काळच आक्रमक हल्ले आणि रक्तपाताचा दिसतो. यामध्ये दिवसेंदिवस वाढ होत आहे. प्रश्न असा आहे की एखादा गुन्हेगार हा अतिरेकी पद्धतीचा अवलंब का करतो? इतरांच्या रक्ताची आणि प्राणाची त्याच्याकडे काहीच किंमत नसावी काय? याचे एक मूळ कारण द्वेष, वैरभाव, क्रोधाग्नी, ईर्ष्यालूवृत्ती व मत्सर असल्याचे दिसते. या अतिरेकी भावनांचे मूळ विभिन्न प्रकारच्या सामाजिक आणि मानसिक समस्यांत दडलेले आहे. याच समस्यांतून या भावना जन्मास येतात. म्हणूनच इस्लामने अशी प्रेरणाद दिली आहे की, माणसाने स्वत:हून अशा अपराधी कर्मांपासून दूर राहावे. त्याचप्रमाणे क्रोध, क्षोभ, हेवा, द्वेष, मत्सर, ईर्ष्या, वैरभावासारख्या भावना इतरांतही निर्माण करणारी परिस्थिती उद्भवू न देण्याचे उपायसुद्धा योजले आहेत.

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे की, "तुम्ही श्रद्धावंत (अर्थात सच्चे मुस्लिम) होऊ शकत नाहीत, जोपर्यंत (मानवजातीप्रति) प्रेम आणि स्नेहाची भावना ठेवत नाहीत. तुम्हाला असा उपाय दाखवू का, ज्यामुळे आपसात प्रेम व स्नेहाची भावना निर्माण होईल?"

"होय! अवश्य दाखवा!" अनुयायांनी म्हटले.

"तर तुम्ही आपसात एक दुसऱ्यांना 'सलाम' (शुभ चिंतनाची प्रार्थना) करा."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

सलाम करणे म्हणजे आपल्या मानवबंधुविषयी ईश्वरदरबारी शांती व सुरक्षेची प्रार्थना करणे होय. त्याचप्रमाणे याचा अर्थ असाही होतो की ज्याला तुम्ही सलाम करता, त्याच्याविषयी तुमच्या मनात कोणत्याही प्रकारचा वैरभाव नसल्याचे जणू प्रमाणपत्रच आहे. म्हणजेच दोघेही एकमेकांचे हितचिंतक आहेत. बऱ्याच वेळा प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सलाम करण्याबरोबरच एकदुसऱ्यांना भोजन देण्याची, भेटवस्तु देण्याचीसुद्धा शिकवण दिली आहे. यामुळेसुद्धा माणसातील स्नेहसंबंध वाढीस लागतात, मनातील मळ नाहीसा होतो. माणूस हा चुकीचा पुतळा आहे. चुका प्रत्येकाकडून होतच असतात. त्यामुळे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपल्या मानवबंधुच्या चुका माफ करून उदारपूर्ण वर्तन करण्याचीही शिकवण दिली आहे. यामुळेसुद्धा द्वेश, मत्सर, हेवा आणि वैरभावाने प्रदूषित झालेले वातावरण निवळते. (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी, मौत्ता)

कधीकधी माणूस अशी चूक करून बसतो की ती सहसा कोणी माफ करायला तयार होत नाही. म्हणूनच इस्लामने माणसाला संयम आणि धीर राखण्याची शिकवण दिली. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी संयमाबरोबरच न्यायपूर्ण वर्तनाचीसुद्धा शिकवण दिली. त्यांनी म्हटले की,

"तुम्ही एखाद्यावर प्रेम करताना इतकेही भावूक होता कामा नये की सत्य आणि न्यायाचे भान हरवून बसावे. त्याचप्रमाणे तुमचा क्रोध इतका अविवेकी असू नये की तुम्ही एखाद्यास त्याच्या अपराधापेक्षाही जास्त शिक्षा द्यावी."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

अर्थातच या दोन ओळींमध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी संयम आणि धैर्याची परिपूर्ण व्याख्या मानवजगतासमोर मांडली.

अतिरेकी भावनांचे एक मोठे कारण शोषण आणि मानवाधिकारांची पायमल्ली आहे. म्हणूनच मामसाला असे वाटत असेल की आपणाला इतरांपासून त्रास होऊ नये, इतरांच्या अतिरेकास आपण बळी पडू नये तर यासाठी त्याने इतरांचे वैध अधिकार देऊन टाकावे. इतरांचे अधिकार पूर्ण करणे म्हणजे काही इतरांवर उपकार करणे नव्हे. ते सानंद पूर्ण करावेत आणि इतरांचे शोषण करू नये. म्हणजेच आपण इतरांकडून सुरक्षित राहू शकतो.

## २) लैंगिक अपराधांवर इस्लामी उपाय

भूक लागणे, तहान लागणे, राग, क्षोभ, स्नेह, प्रेम, ममत्व या जशा नैसर्गिक गरजा आहेत, त्याचप्रमाणे लैंगिक भावनासुद्धा अगदी नैसर्गिक आहेत. भुकेल्यास भाकर मिळाली नाही, तहानलेल्यास पाणी मिळाले नाही तर ज्याप्रमाणे तो आपली विवेकशक्ती हरवून बसतो, त्याचप्रमाणे लैंगिक तृष्णा जर भागली नाही तर माणूस विवेकशक्ती हरवून बसतो, वेडापिसा होतो. मग जर त्याला सहजरित्या आणि वैध मार्गाने ही तृष्णा भागविता आली नाही, तर निश्चितच तो आपली ही नैसर्गिक गरज पूर्ण करण्याकरिता पिसाळलेल्या श्वापदाप्रमाणे दिसेल त्या वाटेने स्वैर धावत असतो, सापडेल त्याला फाडत असतो, सर्वत्र उपद्रव माजवित असतो. आज याच उपद्रवाचा भीषण उद्रेक सर्वत्र पाहायला मिळतो. याविषयी सविस्तर उल्लेख मागे आपण पाहिलाच आहे. मात्र इस्लामी कायद्याने या अपराधावरसुद्धा त्याचे मूळ शोधून यशस्वी तोडगा काढला आहे. माणसाला भूक लागताच जेवण देणे, तहान लागताच पाणी देणे, तसेच लैंगिक तहान लागताच त्याचे

वैध आणि धर्मसंमत साधन पुरविणे याच निसर्गनियमानुसार इस्लामने मुलगा-मुलगी वयात येताच त्यांचे लग्न करून देण्याची शिकवण दिली आहे. कारण लैंगिक भावना ही नैसर्गिक भावना आहे. कोणीही धर्मात्मा असो, महात्मा असो, त्यागी पुरुष असो की साधू-संत असो. त्याने लग्न करून पारिवारिक जवाबदारी पूर्ण करायलाच हवी. अन्यथा त्यांचे महात्म्य आणि त्यागाला अगर धर्मात्म्याला काहीच अर्थ नसतो. म्हणूनच इस्लामने संन्यास आणि वैराग्य धारण करून समाजाच्या जवाबदाऱ्यांतून पळपुटेपणा करण्यास निषिद्ध ठरविले आहे. अर्थातच संसारत्याग आणि लैंगिक भावनांना दाबून टाकणे हे निसर्गनियमांविरुद्ध बंडखोरी आहे आणि ज्या ज्या वेळी माणूस निसर्गनियमांशी (अर्थातच इस्लामशी) बंडखोरी करतो, तेव्हा अपराध आणि गुन्हेगारीचे तांडव माजते, समाजजीवन विस्कळीत होते. यासाठीच प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"हे वयात आलेल्या तरुणांनो (आणि तरुणींनो)! विवाह करा. यामुळे तुम्ही तुमच्या लैंगिक आचरणाचे पावित्र्य अबाधित राखू शकाल."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - मुस्लिम)

उपरोक्त प्रेषित विधानावरून हे स्पष्ट होते की वयात आलेल्या तरुण-तरुणींनी लवकरात लवकर लग्न आटोपून घ्यावे. यामुळे निश्चितच लैंगिक अपराधांवर आळा बसेल.

याशिवाय स्त्रियांनी विनाकारण घराबाहेर एकट्या फिरू नये. त्याचप्रमाणे परपुरुषांबरोबर विनाकारण अगर कामानिमित्त वावरू नये. पडदापद्धतीचा अंगीकार करावा. विशेषत: लांब पल्ल्याचा प्रवास एकटी अगर परपुरुषासोबत करू नये.

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"ईश्वर आणि परलोकी जीवनावर श्रद्धा ठेवणाऱ्या स्त्रीसाठी हे वैध अगर धर्मसंमत नाही की तिने एका दिवसाकरिताही 'गैर महरम' (परपुरुषाबरोबर) प्रवास करावा."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - मुस्लिम)

'गैर महरम' पुरुष म्हणजे कोण? गैर महरम म्हणजे असा पुरुष, ज्याच्याशी विवाह करणे वैध असते. अर्थात मुलगा, पती, पिता, भाऊ, दूधभाऊ, भाचा, पुतन्या, काका, मामा, नातु, सासरा, सावत्र मुलगा, सावत्र पिता सोडून जेवढे पुरुष असतील, ते सर्व पुरुष इस्लामने गैर महरम ठरविले आहेत व यांच्याबरोबर लांब पल्ल्याचा अगर दिवसभराचा प्रवास आणि एकांतातील सहवास इस्लामने निषिद्ध ठरविला आहे.

(संदर्भ : सूरह-ए-निसा - २२)

याचप्रमाणे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी संध्याकाळ झाल्यावर मुलांनी जास्त वेळ बाहेर न घालविण्याचीही शिकवण दिली आहे. कारण बरीच कृष्णकृत्ये रात्रीच्या वेळी अगर संध्याकाळच्या अंधारात घडतात. (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

## ३) चोरी-डकाईतीपासून बचावाचा इस्लामी उपाय

अपूर्ण अर्थार्जन, जीवनावश्यक गरजा सहसा पूर्ण न होण्यासारखे कामाचे मानधन देणे, आर्थिक शोषण करणे आणि आपल्या संपत्तीचे व वैभवाचे प्रदर्शन करणे, हेसुद्धा चोरी आणि डकाईतींची मुख्य कारणे होय. म्हणूनच इस्लामने इतरांना त्यांच्या कामाचा पुरेपूर, समाधानकारक व तत्काळ मोबदला देण्याची जबरदस्त ताकीद केली आहे. याशिवाय आपल्या वैभव आणि संपत्तीचेही प्रदर्शन करण्याची सक्तीने मनाई केली आहे. कारण संपत्तीचा व्यर्थ आणि फाजील अभिमान हे सर्व माणसाला करण्यास भाग पडतो. यामुळे इतरांच्या मनात ईर्ष्या आणि वैफल्याच्या भावना निर्माण होतात. यासाठी आपल्या संपत्ती आणि वैभवाचे प्रदर्शन इतर सामान्यजनांसमोर करण्याची प्रेषित मुहम्मद (स.) यांनी मनाई केली आहे.

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे, "ईश्वर अंतिम निवाड्याच्या दिवशी त्याच्याकडे मुळीच कृपादृष्टी टाकणार नाही, जो गर्व आणि अहंकाराच्या झिंगेत आपली वस्त्रे लोळवित चालत असतो." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

शिवाय माणूस स्वत:च्या छोट्याशा इच्छेपायी अगर व्यर्थ कामनेपायी पैशांची स्वैर उधळपट्टी करतो, मात्र गोर-गरीब, गरजवंत आणि दीन-दलितांसाठी पाच पैसे खर्च करण्याची माणुसकी दाखवित नाहीत. या कृत्यामुळेसुद्धा सामान्यजन द्वेषाच्या भावनेने पिसाळून चोरी-डकाईतीसारखे अपराध करतात. म्हणूनच इस्लामने कंजुसी आणि संकूचितपणाचा तीव्र धिक्कार केला. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"कंजूसपणा आणि संकुचितवृत्तीपासून दूर राहा. कारण यामुळेच तुमच्या पूर्वीचे जनसमुदाय नष्ट झालेत. या कारणामुळेच त्यांनी आपसात रक्तपात केला आणि रक्तसंबंध नष्ट केलेत आणि अन्याय व अत्याचार हे अंतिम निवाड्याच्या दिवशी तिमिर काळोख आहे." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

## ४) भ्रष्टाचारापासून बचावाचा इस्लामी उपाय

वर्तमानकाळात ईर्ष्या आणि लालसेने माणूस पार पिसाळून गेला आहे. जास्तीतजास्त संपत्ती कशी मिळविता येईल, यासाठी ना-ना काळ्या-पांढऱ्या पद्धतींचा तो अवलंब करीत आहे. यामुळेच आज सर्वच भ्रष्टाचार आणि काळ्या बाजाराचा वणवा पेटला आहे. मामुली चपराशापासून उच्चाधिकाऱ्यांपर्यंत सर्वच यात बरबटलेले आहे. जो जितका शासनकर्त्यांच्या जवळचा चमचेगिरी करणारा आहे, तितका जास्त भ्रष्ट आहे. याचे कारण असे आहे की, आज माणूस संपत्ती आणि पैशांनाच जास्त महत्त्व देत आहे. पैसा असला की, वैभव, प्रतिष्ठा, समाजावर वचक, प्रसिद्धी आणि ऐशो- आरामाचे जीवन, असे जणू समीकरणच तयार झाले आहे. यासाठी वाटेल त्याचा गळा चिरायचा, खिशावर डल्ला मारायचा आणि वाटेल ते कृष्णकृत्य करायचे, मात्र पैसा कमवायचाच, अशी सर्वत्र मानसिकता बळावली आहे. याउलट माणूस कितीही चारित्र्यवान असला, विचारवंत असला, ज्ञानी, सभ्य, आणि उच्चशिक्षित असला, मात्र जर त्याच्याकडे पैसाच नसेल, तर त्याच्या जगण्याला जणू काही अर्थच नाही. त्याला कोणी हुंगतही नाही. त्याला सर्वजण मूर्खात काढतात. त्याला कोणी किंमत देत नाही. कुत्रीही भुंकायला तयार होत नाहीत. त्याला तुच्छ आणि हिनतेच्या भावनेने पाहिले जाते. याच मानसिकतेमुळे समाज दिवसेंदिवस पोकळ होत चालला आहे. मात्र समाजास भ्रष्टाचार आणि काळाबाजारीपासून मुक्त करायचे असेल तर ही विचारमूल्ये बदलायलाच हवी, धन-दौलत आणि संपत्तीला महत्त्व देण्याऐवजी इस्लामी विचारसरणी आत्मसात केल्याशिवाय गत्यंतर नाही. अर्थातच संपत्ती आणि पैशांना महत्त्व देण्याऐवजी चारित्र्य, सभ्यता, ईशपरायणता आणि सदाचाराला महत्त्व देण्याची मानसिकता यावी. ईश्वराने स्पष्टपणे म्हटले आहे की प्रतिष्ठा आणि श्रेष्ठत्वाचा मूळ आधार हा या इहलोकातील धन-संपत्ती आणि वैभवाचा दिखाऊपणा मुळीच नाही.

"वस्तुत: प्रतिष्ठा ही केवळ ईश्वरालाच आहे."

(संदर्भ : सूरह-ए-निसा - १३९)

"वस्तुत: ईश्वराजवळ तुमच्यांपैकी सर्वांत जास्त प्रतिष्ठित आणि श्रेष्ठ माणूस तो आहे, जो सर्वांत जास्त ईशपरायण आणि सदाचारी आहे. निश्चितच केवळ ईश्वरालाच सर्वकाही ज्ञान आहे." (संदर्भ : सूरह-ए-हुजरात - १३)

उपरोक्त आयतीवरून हेच स्पष्ट होते की, पैसा आणि संपत्ती नसल्याने माणूस हा तुच्छ आणि हीन मुळीच असू शकत नाही. तर खरी किंमत ही माणसाच्या सभ्यता,

सदाचार आणि ईशपरायणतेमध्ये असल्याने आपण अशा व्यक्तीचा आदर करावयास हवे, तरच समाज हा अपराधमुक्त होऊ शकतो. पैशांना अवाजवी महत्त्व न देणारा कधीच भ्रष्ट होत नाही, लाच घेत नाही, इतरांचे शोषण करीत नाही, इतरांच्या कल्याणासाठी आपल्या जवळील संपत्तीसुद्धा खर्च करतो.

आज आपण पाहतो की, शासकीय वा निमशासकीय अधिकारी पैसा मिळविण्यासाठीच शासनाचेच नव्हे तर माणुसकीचे नियमसुद्धा धाब्यावर बसवून मनमुरादपणे आणि जणू आपला जन्मसिद्ध हक्क समजून आपल्या पदाचा आणि अधिकाराचा गैरवापर करतात. मात्र इस्लामने अशी शिकवण दिली आहे की सरकारी पद अगर अधिकार आणि हुद्दा हा मुळात एक मोठी जवाबदारी आहे. केवळ ईश्वराप्रतिच नव्हे तर जनतेप्रतिसुद्धा मोठी जवाबदारी आहे. ती मात्र प्रामाणिकपणे पूर्ण करण्यात यावी. प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या काळातील एक घटना आहे,

"प्रेषित मुहम्मद (स.) यांनी इब्ने लतबिया (र.) यांची 'सलीम' कबिल्याच्या लोकांकडून जकात आणि दानाची रक्कम वसूल करण्याच्या कामासाठी नेमणूक केली. जेव्हा त्यांनी जकात आणि दानाची रक्कम वसूल करून प्रेषितांसमोर हजर झाले आणि प्रेषितांनी त्यांचा हिशेब घेतला तेव्हा ते म्हणाले, 'हे प्रेषिता! या काही वस्तु माझ्यासाठी लोकांनी भेट म्हणून दिल्या आहेत. आपण मला भेट म्हणून आलेल्या वस्तु स्वीकारण्याची परवानगी द्यावी.' यावर प्रेषित मुहम्मद (स.) ताडकन म्हणाले, 'तुम्ही तुमच्या आईवडिलांच्या घरीच बसायचे असते, जेणेकरून या वस्तु भेट म्हणून तुम्हाला स्वीकारता आल्या असत्या." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

अर्थातच ज्यांच्याकडून जकात वसुलीकरिता त्यांना पाठविण्यात आले होते, त्यांच्याकडून सप्रेम भेट म्हणून आलेल्या वस्तुसुद्धा स्वीकारण्याची प्रेषित मुहम्मद (स.) यांनी मुळीच परवानगी दिली नाही. तर मागून घेण्यात येणारी लाच तर आणखीनही गंभीर अपराध आहे आणि इस्लामने यासाठी कठोर शिक्षा नेमली आहे.

हा तर झाला लाचलुचपतीचा प्रकार. याशिवाय आर्थिक शोषणाचे आणखीनही बरेच प्रकार आहेत. पैकी ज्याच्याकडून मेहनत-मजुरीचे काम करून घेण्यात येते, त्याला त्याच्या मेहनत-मजुरीचा योग्य मोबदला देण्यात येत नाही. आज भांडवलदार आणि उद्योगपतीवर्ग मजुरांच्या रक्ताचा शेवटचा थेंबसुद्धा शोषून घेत आहे, मात्र त्याला खरा आणि योग्य मोबदला देत नाही. कायदासुद्धा मजुराला न्याय मिळवून देण्यात हतबल

झालेला दिसतो. तुटपुंजा मजुरीतून तो अर्धपोटी आणि उपासमारीचे खडतर जीवन आज कंठित आहे. मात्र इस्लामी कायद्याने अशी शिकवण दिली आहे की मेहनत-मजुरी आणि कारागिरी वगैरे करणाऱ्यांना त्यांच्या पात्रतेनुसार आर्थिक मोबदला देण्यात यावा आणि तेही त्याची प्रतिष्ठा जोपासून द्यावा. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"ईश्वराने म्हटले आहे, अंतिम निवाड्याच्या दिवशी तीन प्रकारच्या गुन्हेगारांना मी अवश्य शिक्षा देणार. पैकी पहिला गुन्हेगार म्हणजे तो माणूस ज्याने माझी शपथ घेऊन कोणाला अभय दिले असेल आणि मग गद्दारी अगर दगा केला असेल, दुसरा गुन्हेगार म्हणजे तो माणूस ज्याने कोण्या एखाद्या गुलाम नसलेल्या व्यक्तीस गुलाम बनवून विकले आणि त्याची रक्कम गिळली आणि तिसरा गुन्हेगार म्हणजे तो माणूस ज्याने कोणाकडून मजुरी वा शारीरिक कष्टाचे काम करून घेतले, मात्र त्याच्या कामाचा मोबदला दिला नाही." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

त्याचप्रमाणे मजुराचे घाम सुकण्यापूर्वी त्याच्या मजुरीचा पूर्ण मोबदला देण्याची सक्तीने ताकीदसुद्धा इस्लामने केली आहे. यामुळे निश्चितच श्रीमंताविषयी मजुराच्या मनात आदर निर्माण होईल आणि तो चोरी, डकाइती आणि भ्रष्टाचाराकडे वळणार नाही.

## ५) राजकीय अपराधापासून बचावाचा इस्लामी उपाय

शासन, सत्ता आणि अधिकार हाती आले की राजकारण्यांना अपराध आणि गुन्हेगारीचे रान मोकळे झाले समजा. कारण त्यांच्या हाती सत्ता असते. शिवाय त्यांच्यापैकी बरेचजण गुन्हेगार आणि गुन्हेगारी जगताशी संबंधित असतात. त्याचप्रमाणे शिक्षण नसताना आणि कोणतीही योग्यता व पात्रता नसताना भविष्य बनविण्याचा सर्वांत सोपा आणि सरळ उपाय म्हणजे राजकारणच. गुंडगिरी, दादागिरी करणारे, समाजासाठी उपद्रवी ठरलेले आणि जनतेचे आर्थिक, मानसिक आणि लैंगिक शोषण केलेले लोक, त्याचप्रमाणे इतर क्षेत्रात शिक्षण नसल्याने काहीही करता येत नसलेले लोकच राज्याची खुर्ची बळकावलेले असल्याचे सध्या पाहायला मिळते. चौथी-पाचवी पास-नापास असलेले लोक थेट मुख्यमंत्री आणि शिक्षणमंत्री होत असल्याचा किळसवाणा इतिहासही या गोष्टीची साक्ष देतो. यामुळे याचे दुष्परिणाम संपूर्ण मानवजातीलाच भोगावे लागत आहेत.

मात्र इस्लामची अशी शिकवण आहे की अपात्र आणि दुराचारींना मुळीच शासकीय हुद्दा देता कामा नये.

प्रेषित मुहम्मद (स.) यांना एकदा विचारण्यात आले की, "हे जग कधी नष्ट होईल?"

यावर प्रेषित मुहम्मद (स.) यांनी अत्यंत गंभीरपणे उत्तर दिले की, "जेव्हा अनामत नष्ट करण्यात येईल तेव्हा जग नष्ट होण्याची वाट पाहा."

लोकांनी विचारले की, "अनामत नष्ट होणे म्हणजे काय?"

"जेव्हा देशाचे शासन नालायक आणि अपात्र लोकांच्या हाती येईल, तेव्हा जग नष्ट होण्याची वाट पाहा!" प्रेषित मुहम्मद (स.) उत्तरले.

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

या प्रेषितवचनांवरून हे लक्षात येते की हे केवळ जग नष्ट होण्याचे संकेत अर्थात महाप्रलयाचे भयानक चित्र आहे. अर्थातच जेव्हा एखाद्या अपात्र आणि नालायक व्यक्तीच्या हाती अधिकार अगर शासनव्यवस्था येते, तेव्हा ती व्यक्ती जनतेला सळो की पळो करून सोडते. सर्वत्र अंधेर नगरी आणि चौपट राजा याचे प्रत्यक्ष चित्र डोळ्यांना पाहण्याचे दुर्दैव ओढावते. जनता इतकी वैतागून जाते की, या लाजिरवाण्या जगण्यापेक्षा मेलेले बरे, असे वाटू लागते. म्हणूनच जनतेचे सर्वप्रथम कर्तव्य हेच आहे की, निवडणुकांच्या वेळी राजकारण्यांच्या गुंडगिरीला न घाबरता आणि कोणत्याही आमिषाला बळी न पडता विवेकबुद्धीचा वापर करूनच मतदान करावे.

## ६) चारित्र्यवान संघटित समाजाची आवश्यकता

समाज सुसंघटित नसला आणि त्यातून नीतिमत्ता आणि चारित्र्यशीलता संपली की, गुन्हेगारी बोकाळत असते. एक काळ असा होता की, माणूस आपले चारित्र्य जपत होता, त्याच्यावर समाजाचा वचक होता. गुन्हेगारी करण्याचा विचारसुद्धा कोणाच्या ध्यानीमनी येत नसे. मात्र आज समाज हा विखुरलेला, आपली वचक आणि धाक हरवून बसलेला आहे. प्रत्येकजण स्वातंत्र्याच्या झिंगेत सर्व काही करायला मोकळा झाला आहे. त्याला समाजाला जाब देण्याची जाणीव तर संपलीच शिवाय सामाजिक बांधिलकीसुद्धा नष्ट पावली आहे. सामाजिक आणि नैतिक मूल्यांची ऐशी-तैशी झाली आहे. यामुळे समाजविघातक प्रवृत्तींना बळ मिळत आहे. अशा या बिकट आणि संकटमय परिस्थितीत मात्र समाजबांधणीचे आणि सकारात्मक व नैतिक मूल्ये जोपासण्यासाठीचे कार्य करणे गरजेचे झाले आहे. यासाठीच प्रेषित मुहम्मद (स.) यांनी वारंवार ताकीद केली आहे की सामूहिकता हा मानवतेचा प्राण आहे. सामाजिकतेपासून विभक्त होता कामा नये. जो माणूस

स्वत:ला समाजापासून विभक्त करतो, त्याचा नाश उपस्थित आहे. प्रेषितांनी हेच तत्त्व या शब्दांत स्पष्ट केले आहे,

"सैतान हा मानवांसाठी लांडगा आहे. (अर्थात शत्रु आहे) लांडगा हा कळपातून एकाकी पडलेल्या शेळीचा फडशा पाडतो, त्याचप्रमाणे समाजविभक्त माणसाची स्थिती असते. म्हणून तुम्ही आपसात गटबाजी करू नका, जमात अगर समाज आणि मस्जिद ह्या तुमच्या संघटिततेसाठी अत्यावश्यक बाबी आहेत."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - मुस्नदे अहमद)

इस्लामी विचारवंतांनी म्हटले आहे की, "समाजातील उपद्रवी घटक नष्ट करायचे असतील आणि गुन्हेगारीचे निर्मूलन करायचे असेल तर चारित्र्यवान सुसंघटित समाज असल्याशिवाय हे शक्य नाही." (संदर्भ : प्रस्तावना, इब्ने अब्दुल बर, २१/२७५)

इस्लामचे थोर विचारवंत 'इब्ने तैमिया' यांनी म्हटले आहे की,

"सामाजिकता आणि सहकाराशिवाय मानवी गरजांपूर्ण होऊ शकत नाहीत. मानवी गरजांची पूर्तता दोन गोष्टींवर अवलंबून आहे, प्रथम हितांची जोपासना आणि उपद्रवांचा खातमा. त्याचप्रमाणे यासाठी या गोष्टीची आवश्यकता आहे की, लोकांनी समाजाच्या नैतिक बंधनात राहावे, सुसंगठित राहावे. मात्र याबरोबरच समाज चालविण्यासाठी एका सुनियोजित व्यवस्थेची नितांत गरज असते आणि ही समाजव्यवस्था अगदी स्पष्ट नियम व तत्त्वावरच शक्य असते. या ठिकाणी हे मात्र विसरता कामा नये की, हे स्पष्ट नियम केवळ इस्लामनेच प्रदान केले आहेत. म्हणून गुन्हेगारीचे समूळ निर्मूलन हे इस्लामी समाजव्यवस्थेतच शक्य आहे. ईश्वराने म्हटले आहे की, "आम्ही (ईश्वराने) प्रेषितांना स्पष्ट संकेत आणि मार्गदर्शनासह पाठविले आहे आणि त्यांच्यासोबत ग्रंथ आणि प्रमाण पाठविले, जेणेकरून लोक न्यायावर कायम राहावेत."

(संदर्भ : सूरह-ए-हदीद - २५)

सुसंघटित आणि सदाचारी समाज उभा करण्यासाठी केवळ लोकांचा बाजार गोळा करून चालत नाही, अथवा एखाद्या क्षणिक गरजेपुरते, केवळ ऐहिक आणि भौतिक गरजेपोटी समाजास संघटित करून चालणार नाही. तर यासाठी मजबूत नैतिक आधार आणि मूल्यांची गरज आहे. इस्लामी सामुदायिकतेचा आधारसुद्धा तोच आहे, जो प्रेषितत्त्वाचा उद्देश आहे. अर्थातच मानवजातीसाठी सौभाग्यप्राप्ती आणि हितांची जोपासना करणे होय. कुरआनात म्हटले आहे,

"हे प्रेषिता ! आम्ही (स्वयं ईश्वराने) तुम्हाला समस्त जगवासीयांसाठी दया आणि कृपा बनवून पाठविले आहे." (संदर्भ : सूरह-ए-अंबिया - १०७)

## सारांश

उपरोक्त स्पष्टीकरणावरून हे लक्षात येते की इस्लामने गुन्हेगारी निर्मूलनाचे जे उपाय योजिले आहेत, ते क्षणिक आणि अस्थायी स्वरुपाचे नसून अर्थपूर्ण आणि स्थायी आहेत. एवढेच नव्हे तर गुन्हेगारी निर्मूलनासाठी इस्लामशिवाय पर्यायच नाही. शिवाय इस्लाममुळे केवळ गुन्हेगारीचे निर्मूलनच होत नाही, तर माणसाच्या ऐहिक आणि पारलौकिक जीवनाचे सार्थक होऊन दोन्ही लोकी सुख, समाधान, शांती आणि वास्तविक यश प्राप्त होते आणि हेच इस्लामचे प्रमुख उद्दिष्ट होय. कारण माणूस जोपर्यंत गुन्हेगारीपासून स्वत:ला दूर ठेवीत नाही, अन्याय व अत्याचार आणि दुष्कर्म सोडून सत्य, न्याय आणि सदाचाराचा मार्ग अवलंबत नाही, अर्थात इस्लामी मार्गावर आपले जीवन व्यतीत करीत नाही, तोपर्यंत ईश्वर प्रसन्न होत नाही आणि जर ईशप्रसन्नतेची आसच नसेल, तर तो कोणत्या अर्थाने मुस्लिम होऊ शकेल? हीच बाब कुरआनात अशा शब्दांत व्यक्त करण्यात आली आहे,

"बरे हे कसे शक्य आहे की, जो मनुष्य नेहमी अल्लाहच्या मर्जीप्रमाणे वागणारा आहे, तो त्या माणसाप्रमाणे कृत्ये करील, जो अल्लाहच्या कोपाने वेढला गेला आहे, आणि ज्याचे अंतिम ठिकाण नरक आहे, जे अत्यंत वाईट स्थान आहे."

(संदर्भ : सूरह-ए-आलि इम्रान - १६२)

म्हणजेच ईश्वराची प्रसन्नता प्राप्त करण्याची तीव्र आस आणि कामना ही सर्वच गुन्हेगारी निर्मूलनाचे आणि सदाचारी, सुख-समाधानी तसेच यशस्वी जीवनाचे मूळ आहे.

दुसरी लक्षणीय गोष्ट अशी की, इस्लामी शिकवणीचा लाभ हा त्यावर आचरण केल्याशिवाय प्राप्त होणार नाही. केवळ इस्लामी नियम अगर विधानाचे प्रगल्भ ज्ञान आत्मसात केले आणि कृतीच मात्र केली नाही, तर काहीच उपयोग होणार नाही. डॉक्टरने कितीही प्रभावी औषध दिले आणि त्या औषधांची व उपचारपद्धतींची केवळ माहितीच ठेवली आणि त्याच्या उपचारपद्धतीनुसार औषध घेतलेच नाही तर आजार बरा होण्याची आशा बाळगणे हे मूर्खपणाचे लक्षण ठरेल. असेच हे देखील आहे. गुन्हेगारी निर्मूलनाचे इस्लामी उपाय अमलात आणल्याशिवाय काहीही शक्य नाही.

# प्रकरण सातवे

# गुन्हेगारीवर इस्लामी उपाय

## पहिले परिशिष्ट

### शरीअतमध्ये गुन्हेगारीवरील उपायाची स्वरुपे

मागील प्रकरणांत आपण अपराध घडू न देण्याविषयी प्रेरणा निर्माण करणारी उपाययोजना पाहिली. इस्लामी शिकवणींमुळे माणूस प्रेरित होऊन गुन्हेगारीपासून स्वत:ला कशा प्रकारे दूर ठेवतो, सदाचारी मार्गाचा अवलंब करण्यासाठी कसा प्रेरित होतो सुसंस्कृत आणि सभ्य समाज कशाप्रकारे उभा राहतो आणि शांती, सुख-समाधान आणि वैभवाचे मंजूळ वारे कसे वाहतात, या गोष्टींचा अभ्यास केला.

असे म्हणतात की पोळून घेण्यापेक्षा विस्तवाजवळ न गेलेलेच बरे. मात्र ही दक्षता पाळूनही यदा कदाचित माणसाकडून अपराध घडलाच, गुन्हेगारीचा जर चटका बसलाच, तर त्यावर उपायदेखील अगदी जालीम आहे. कारण माणसाकडून अपराध घडण्याची शक्यता नाकारता येत नाही. यासाठी अगदी जालीम उपायाची तजवीज इस्लामने आधीच करून ठेवली आहे.

शरीअत अर्थात इस्लामी कायद्याने गुन्हेगारीवरील उपायाची तीन स्वरुपे दाखविली आहेत. पहिले स्वरुप हे अपराधाची 'हद' लागू करणे होय. अर्थातच गुन्हेगाराने पूर्ण शर्तीने गुन्हा केलेला असेल तर स्वत: ईश्वराने ही शिक्षा निश्चित केलेली आहे. यात मुळीच बदल करता येत नाही. म्हणूनच या प्रकारच्या शिक्षा-उपायास शरीअतच्या परिभाषेत 'हद' जारी करणे असे म्हणतात. दुसऱ्या उपायाचे स्वरुप म्हणजे 'क़िसास' होय. क़िसास म्हणजे बदल्याची शिक्षा होय. अर्थात गुन्हेगाराने कोणास शारीरिक हानी पोचविली असेल तर जेवढी हानी पोचविली तेवढाच बदला घेण्याची शिक्षा देणे होय. उदाहरणार्थ, हात कापला असेल तर गुन्हेगाराचा हात कापण्यात येईल, डोळा फोडला असेल तर डोळा फोडण्यात येईल, हत्या केली असेल तर गुन्हेगारास मृत्यूदंड देण्यात येईल. या शिक्षेतही मुळीच बदल करता येणार नाही. तिसरा प्रकार हा 'ताज़ीर'चा होय. म्हणजेच ज्या अपराधांवर शिक्षा लागू करण्यात आल्या आहेत, मात्र आवश्यक शर्तींची पूर्तता होत नसेल, तर अशा परिस्थितीत गुन्हेगारास गरजेनुसार 'ताज़ीर' (म्हणजे निश्चित केलेल्या शिक्षेपेक्षा थोडी कमी शिक्षा) करण्यात येईल. या तिन्ही स्वरुपांच्या शिक्षांवर आपण वेगवेगळी चर्चा करु या.

## 'हद' स्वरुपाची शिक्षा

ही शिक्षा (१) व्यभिचार, (२) व्यभिचाराचा आरोप लावणे, (३) चोरी करणे, (४) दारू पिणे, (५) इस्लामचा त्याग करणे, (६) डकाईती करणे आणि (७) बंडखोरी करणे या अपराधांवर लागू करण्यात आली आहे.

## १) व्यभिचार आणि त्याची व्याख्या

व्यभिचार म्हणजे काय? याविषयी इस्लामने अशी व्याख्या केली आहे की, पत्नीव्यतिरिक्त अगर पतीव्यतिरिक्त अनुक्रमे इतर कोणाही स्त्री अगर पुरुषाशी संभोग करणे म्हणजे व्यभिचार होय. हा संभोग करताना वीर्यस्खलन होवो अथवा न होवो, या संभोगाला व्यभिचार असे म्हणतात.

## अ) व्यभिचारसिद्धीच्या अटी व शर्ती

'शरीअत' म्हणजेच इस्लामी कायद्याने कोणताही गुन्हा सिद्ध करण्याच्या शर्ती आणि अटी निश्चित केल्या आहेत. याप्रमाणेच व्यभिचाराचा अपराध सिद्ध करण्याच्या वा होण्याच्यासुद्धा अटी आणि शर्ती निश्चित केल्या आहेत. याकरिता तीन पद्धती ठरविण्यात आल्या आहेत. प्रथम अशी की, व्यभिचार केलेल्या गुन्हेगाराने स्वत:हून इस्लामी न्यायालयात गुन्हा केल्याची कबुली द्यावी. दुसरे असे की, व्यभिचारी व्यक्तीस व्यभिचार करताना पाहिल्याचे साक्षीदार असावेत आणि तिसरे असे की, संकेत आणि परिणामावरुन व्यभिचार केल्याचे सिद्ध व्हावे. याबाबतीत आपण थोडक्यात चर्चा करु या.

### पहिली पद्धत

शरीअतमध्ये व्यभिचार केलेल्या गुन्हेगाराकडून गुन्हा केल्याची कबुली विश्वसनीय समजण्यात आली आहे. मात्र यासाठी गुन्हेगाराची मानसिक आणि बौद्धिक परिस्थिती चांगली व ठणठणीत असावी. अर्थातच मानसिक वा बौद्धिक स्वास्थ्य ठणठणीत असावे, शिवाय त्याने आपल्या गुन्ह्याची कबुली न्याय-परिषदेत द्यावी. गुन्हेगार प्रौढ असावा.

### दुसरी पद्धत

व्यभिचारानंतर संकेत आणि परिणाम स्पष्ट व्हावेत. उदाहरणार्थ, स्त्रीला गर्भधारणा व्हावी, अथवा वैद्यकीय तपासणीतून संभोग झाल्याचे निष्पन्न व्हावे.

### तिसरी पद्धत

साक्षीदार असावेत. शरीअतमध्ये सामान्य प्रकरणात दोन साक्षीदार पुरेसे असतात, मात्र व्यभिचार सिद्ध करण्यासाठी कमीतकमी चार साक्षीदारांची आवश्यकता

असते. हे साक्षीदारसुद्धा परिपूर्ण आणि प्रौढ व सबळ असावे लागतात. त्यांना व्यभिचाराचा वृत्तान्त सांगण्याचे सामर्थ्य असावे लागते. अर्थात ते मुके आणि बहिरेही नसावेत, मद्यपानाचे व्यसन जडलेलेही नसावेत. ते न्यायप्रिय, सदाचारी व ईशपरायण मुस्लिम असावेत. व्यभिचार करणाऱ्या गुन्हेगारांशी कोणत्याही प्रकारचा तंटा-बखेडा अगर प्रकरण नसावे. कोणत्याही कारणावरून गुन्हेगाराशी वैर नसावे. त्याचप्रमाणे स्त्रीची साक्ष स्वीकारण्यात येणार नाही. हे चारही साक्षीदार एकाच प्रसंगी न्यायपरिषदेत, हजर करण्यात येऊन त्यांच्या साक्षी तपासण्यात येतील.

## ब) व्यभिचाराची शिक्षा

शरीअतमध्ये व्यभिचार करण्याच्या तीन प्रकारच्या शिक्षा लागू करण्यात आल्या आहेत.

१) कोरडे ओढणे

२) शहारतून तडीपार करणे

३) दगडाने ठेचून वध करणे

यापैकी व्यभिचारी गुन्हेगार अविवाहित असेल तर शंभर कोरडे मारण्याची आणि शहराबाहेर तडीपार करण्याची शिक्षा देण्यात येईल आणि गुन्हेगार विवाहित असेल तर दगडाने ठेचून वध करण्याची शिक्षा देण्यात येईल. कुरआनात म्हटले आहे,

"अविवाहित व्यभिचारी स्त्री आणि अविवाहित व्यभिचारी पुरुषाला प्रत्येकी शंभर कोरडे मारावेत आणि त्यांच्यावर दया करता कामा नये, जर तुम्ही ईश्वर आणि पारलौकिक जीवनावर विश्वास ठेवीत असाल तर त्याचप्रमाणे त्यांना शिक्षा देतेवेळेस श्रद्धावंतांचा (अर्थात मुस्लिमांचा) एक समूह तेथे हजर असावा."

(संदर्भ : सूरह-ए-नूर - २)

त्याचप्रमाणे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"कोणत्याही मुस्लिमाची, जो एकेश्वरवाद आणि परलोकावर विश्वास ठेवतो, हत्या करणे वैध नाही, केवळ ते लोक सोडून की जे विवाहित असून व्यभिचार करतात, ज्याने इतराचा वध केला असेल आणि जो मुस्लिम समुदायाबरोबर पडला (अर्थात धर्मभ्रष्ट झाला) असेल. या तीन प्रकारच्या गुन्हेगारांशिवाय इतर कोणाचाही वध करता कामा नये."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या शासनकाळात विवाहित लोकांनी व्यभिचार केल्यास त्यांना 'रजम' म्हणजेच दगडाने ठेचून वध करण्याची शिक्षा देण्यात आली होती. त्याचप्रमाणे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे की,

"अविवाहित तरूण-तरुणींनी व्यभिचार केल्यास त्यांना प्रत्येकी शंभर कोरडे ओढावेत आणि एका वर्षासाठी पुरुषाला शहरातून तडीपार करावे."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - मुस्लिम)

## २) व्यभिचाराचा खोटा आरोप लावणे

व्यभिचाराचा खोटा आरोप लावणे हे महापाप असून याची शिक्षा लागू करण्याच्या निम्नलिखित अटी व शर्ती ठरविण्यात आल्या आहेत.

(१) खोटा आरोप लावणारा वेडा, वयात न आलेला मद्याच्या नशेत नसलेला असावा.

(२) खोटा आरोप लावणारा हा मुखत्यार असावा म्हणजेच स्वत:च्या मर्जीने व कोणाच्या दबाव अगर आमिषाला बळी पडून खोटा आरोप करणारा नसावा.

(३) खोटा आरोप लावणारा हा पिता नसावा. अर्थात एखाद्या पुरुषाने म्हटले की, तू माझी संतती नाही तर त्या आरोप लावणाऱ्याला शिक्षा देण्यात येणार नाही.

(४) खोटा आरोप लावणाऱ्या आणि ज्यावर आरोप लावण्यात येत आहे त्याच्यात पती-पत्नीचे नाते नसावे. कारण पती-पत्नीसाठी आरोपाचा वेगळा कायदा आहे. त्या कायद्यास शरीअतच्या परिभाषेत 'लआन' चा कायदा असे म्हणतात.

(५) ज्याच्यावर खोटा आरोप लावण्यात येत आहे, तो स्वावलंबी आणि मुखत्यार असावा.

(६) तो मुस्लिम असावा. (अपराधी मुस्लिमेतर नसावा)

(७) खोटा आरोप लावणारा अपराधी स्वतंत्र असावा. अर्थात कोणाचा गुलाम अथवा दास नसावा.

(८) तो सज्जन आणि सुशील असावा. कारण आरोप लावणाऱ्याचा आरोप सिद्ध झाल्यास प्रकरणाला वेगळी कलाटणी मिळेल.

(९) ज्यावर आरोप करण्यात आला, त्याच्याविरुद्ध प्रकरण दाखल करणारा असावा. अन्यथा शिक्षा होणार नाही.

(१०) खोटा आरोप लावणाऱ्याने स्पष्ट शब्दांत आरोप लावलेला असावा. सांकेतिक पद्धती अगर इशाऱ्याने आरोप लावल्यास दखल घेतली जाणार नाही.

(११) खोटा आरोप लावणाऱ्यास आरोप सिद्ध करण्याकरिता चार साक्षीदार हजर करणे शक्य नसावे.

या अटींवर खोटा आरोप लावणाऱ्या गुन्हेगारास शरीअतनुसार शिक्षा देण्यात येईल.

## व्यभिचाराचा खोटा आरोप लावण्याची शिक्षा

शरीअतमध्ये व्यभिचाराचा खोटा आरोप लावण्याच्या दोन शिक्षा ठरविण्यात आल्या आहेत. प्रथम मूळ शिक्षा आणि दुसरी अतिरिक्त वाढीव शिक्षा. त्या अशा प्रकारे होय. १) ऐंशी कोरडे मारणे आणि २) नेहमीसाठी त्याची साक्ष स्वीकार न करणे होय. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

''जे लोक चारित्र्यवान आणि सुशील स्त्रियांवर व्यभिचाराचा खोटा आरोप लावतात, मग चार साक्षीदारांसमक्ष आरोप सिद्ध करू शकत नाहीत, त्यांना ऐंशी कोरडे मारावेत आणि त्यांचा साक्ष देण्याचा अधिकार नेहमीसाठी हिरावून घेण्यात यावा कारण ते स्वत: गुन्हेगार आणि दुराचारी आहेत.'' (संदर्भ : सूरह-ए-नूर - ४)

## ३) चोरी आणि चोरीचा अपराध सिद्ध होण्याच्या अटी

शरीअत अर्थात इस्लामी कायद्यामध्ये चोरी करण्याच्या अपराधालासुद्धा 'हद' ची शिक्षा लागू करण्यात आली आहे. चोरीचा अपराध सिद्ध होण्याच्या अटी खालीलप्रमाणे आहेत.

(१) चोर हा वयात आलेला असावा. वयात न आलेल्या, मानसिक संतुलन ठिकाणावर नसलेल्या चोरावर 'हद' ची शिक्षा लागू करण्यात येणार नाही.

(२) चोर हा विवश नसावा. परिस्थितीने विवश होऊन चोरी करणाऱ्यास 'हद' ची शिक्षा देता येणार नाही.

(३) भुकेने आणि तहानेनें तसेच रोगाने व्याकूळ होऊन गरजपूर्तीसाठी चोरी केल्यास 'हद' ची शिक्षा लागू होणार नाही.

(४) मुलाच्या संपत्तीमधून चोरी केल्यास 'हद' ची शिक्षा लागू होणार नाही.

(५) 'बैतुल माल' अर्थात सरकारी जनकल्याणनिधीमधून चोरी केल्यास 'हद' ची शिक्षा लागू होणार नाही. कारण या संपत्तीमध्ये त्याचासुद्धा वाटा आहे.

(६) चोरी करणारा धर्मयुद्धाच्या परिस्थितीत नसावा.

(७) चोरी ही किंमती वस्तु उदाहरणार्थ, सोने, चांदी, पैसा, द्रव्य वगैरेंची असेल तरच 'हद' ची शिक्षा लागू करण्यात येईल. दगड-माती व यासारख्या क्षुल्लक वस्तुंची चोरी केल्यास 'हद' ची शिक्षा लागू करण्यात येणार नाही.

(८) हराम मालाची अर्थात डुक्कर, दारू, गांजा व यासारख्या मालाची चोरी केल्यास 'हद' ची शिक्षा लागू करता येणार नाही.

(९) लवकर खराब होणाऱ्या व सडणाऱ्या वस्तुंची अर्थात पाले-भाज्या, फळे वगैरेंची चोरी केल्यास 'हद' ची शिक्षा लागू करता येणार नाही.

(१०) चोरी करण्यात आलेला माल दुसऱ्याची मिळकत असावी. स्वत:च्या संपत्तीतून चोरीची शिक्षा नाही.

(११) सुरक्षेची व्यवस्था करण्यात आलेल्या संपत्तीतून झालेल्या चोरीवरच 'हद'ची शिक्षा लागू करण्यात येईल. रस्त्यावर अथवा इतरत्र पडलेल्या वस्तुंची चोरी ही चोरीच्या परिभाषेत बसत नाही.

## चोरीची शिक्षा अर्थात 'हद' जारी करणे

शरीअतमध्ये चोरीची शिक्षा अर्थात 'हद' जारी करणे म्हणजे चोराचे हात कापणे होय. वरील अटी आणि शर्ती पूर्ण झाल्याशिवाय ही शिक्षा देता येणार नाही. कुरआनात म्हटले आहे,

"चोरी करणारी व्यक्ती स्त्री असो वा पुरुष असो, त्या व्यक्तीस हात कापण्याची शिक्षा द्यावी, हा त्यांच्या कमाईचा बदला आहे आणि ईश्वराकडून बोध घेण्यासारखी शिक्षा आहे. ईश्वराचे प्रभुत्व सर्वांवर आहे आणि तो जाणणारा आणि पाहणारा आहे."

(संदर्भ : सूरह-ए-माइदा - ३८)

इस्लामी कायद्यानुसार पहिल्यांदा चोरी केल्यास चोराचा उजवा हात कोपरापर्यंत कापण्यात येईल आणि दुसऱ्यांदा केल्यास चोराचा डावा पाय घोट्यापर्यंत कापण्यात येईल.

## ४) डकाईती अगर दरोडा

चोरी म्हणजे इतरांच्या नजरेआड लपून छपून करण्यात येणारे कर्म असते. मात्र डकाईती अगर दरोडा हा बळाचा वापर करून संपत्ती हिसकावणे वा त्यावर ताबा मिळविणे होय. चोरीचा माल चोराच्या ताब्यात आल्याशिवाय चोराला शिक्षा देता येणार नाही, मात्र दरोडा टाकल्यावर दरोडेखोराच्या ताब्यात संपत्ती आली नसली तरी, त्याला शिक्षा देण्यात येईल असा इस्लामी कायद्याचा नियम आहे. दरोड्याचे प्रामुख्याने चार स्वरुप आहेत.

(१) डकाईत हा दरोडा टाकण्याच्या उद्देशाने निघाला मात्र त्याला संपत्तीही मिळाली नाही आणि त्याच्याकडून कोणाचा खूनही झाला नाही.

(२) दरोडा टाकून संपत्ती लुटली मात्र कोणाचा खून झाला नाही.

(३) दरोडा टाकण्यासाठी निघाला मात्र माल हाती लागला नाही आणि त्याच्या हातून खून झाला.

(४) दरोडा टाकून संपत्ती लुटली आणि खूनही केला.

## दरोडेखोरीचा गुन्हा सिध्द होण्याच्या अटी

दरोडा एकट्याने टाको अगर सामूहिकरित्या टाकण्यात येवो, तो दरोड्याच्याच परिभाषेत मोडतो. दरोडेखोर स्त्री असो वा पुरुष, दोघेही समान अपराधी आहेत.

## दरोडा टाकण्याची शिक्षा

शरीअतमध्ये दरोड्याच्या चार प्रकारच्या शिक्षा तजवीज करण्यात आल्या आहेत. १) दरोडेखोराची हत्या करणे, २) फाशी देणे, ३) हात कापणे आणि ४) देशाबाहेर काढणे. ईश्वराने म्हटले आहे,

"जे लोक ईश्वर आणि त्यांच्या प्रेषितांशी युद्ध करतात आणि धरतीवर उपद्रव माजवितात, त्यांची शिक्षा ही आहे की त्यांना ठार मारावे, सुळावर चढवावे अथवा परपस्पर विरुद्ध दिशेने त्यांचे हातपाय कापावेत अथवा देशाबाहेर काढावे. हा अपमान तर या जगात आहेच, शिवाय मरणोत्तर जीवनात यापेक्षाही भयानक शिक्षा आहे."

(संदर्भ : सूरह-ए-माइदा - ३३)

या बाबतीत इस्लामी कायदा असा आहे की या चार स्वरुपाच्या शिक्षा अपराधाच्या गांभीर्याच्या प्रमाणानुसार आहेत. उदाहरणार्थ, ज्याने केवळ दहशथ निर्माण केली, त्यास देशाबाहेर काढण्यात येईल, ज्याने केवळ संपत्ती लुटली, त्याचे हात-पाय विरुद्ध प्रमाणात कापण्यात येतील, ज्याने संपत्ती न लुटता खून केला असेल, त्याची हत्या करण्यात येईल आणि ज्याने संपत्तीही लुटली आणि खूनही केला, त्यास फाशी देण्यात येईल. याशिवाय इस्लामी शासकाला या गोष्टीचा अधिकार आहे की, त्याने या चारपैकी कोणती शिक्षा द्यावी.

## ५) दारु पिणे वा मद्यपान करणे

इस्लाम धर्माने दारू आणि इतर सर्व मादक पदार्थांच्या सेवनास निषिद्ध ठरविले आहे. त्याचप्रमाणे या घोर अपराधावर 'हद' जारी करण्याचा आदेश दिला आहे. ईश्वराने म्हटले आहे,

"हे श्रद्धावंतांनो! ही दारू आणि जुगार व वेदी आणि शकून ही सर्व अमंगल सैतानी कामे होत, यांच्यापासून दूर राहा. सैतानाची हीच इच्छा आहे की, याद्वारे तुमच्यात शत्रुत्व व कपट निर्माण करावे आणि तुम्हास ईशस्मरण आणि नमाजपासून रोखावे."

(संदर्भ : सूरह-ए-माइदा - ९०)

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"झिंग अगर नशा आणणारा प्रत्येक पदार्थ दारुच्या परिभाषेत मोडतो आणि अशा प्रकारचा प्रत्येक पदार्थ (अथवा दारू, मदिरा वगैरे) निषिद्ध आहे."

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - तिर्मिजी)

## मदिरापानाचा गुन्हा सिद्ध होण्याच्या अटी व शर्ती

(१) दारु पिणारी व्यक्ती वयात आलेली आणि विवेक न हरवलेली असावी.

(२) त्या व्यक्तीने कोणाच्याही दबावास बळी न पडता स्वत:च्या मर्जीने दारू पिलेली असावी.

(३) भुकेने आणि रोगाने ग्रस्त झालेला व या ग्रस्ततेमुळे विवेक हरवून दारू पिलेली नसावी.

(४) दारु पिणे हे निषिद्ध असल्याची कल्पना असावी.

(५) दारु पिण्याचा पुरावा असावा, कमीतकमी दोन सज्जन लोकांनी आपल्या डोळ्यांनी पाहिलेले असावे अथवा गुन्हेगाराने स्वत: कबुली द्यावी अथवा त्याच्या तोंडून दारूचा वास यावा, दारूची उलटी व्हावी अथवा वैद्यकीय तपासणीतून दारू पिल्याचे निष्पन्न व्हावे.

## मदिरापानाची शिक्षा

इस्लामी कायद्यामध्ये मदिरापानाची शिक्षा चाळीस कोरडे मारण्याची आहे. वरील अटी व शर्ती पूर्ण झाल्यावर अपराध्याला शिक्षा देण्यात येईल.

## ६) इस्लाम धर्म तर्क करणे

इस्लामी कायद्यानुसार हा एक असा घोर अपराध आहे, जो समाजासाठीही घातक आणि अन्याय आहे तसेच ना-ना स्वरुपांच्या उपद्रवांना जन्म देणारा असून ईश्वराप्रतिही घोर अपराध आहे. त्यामुळे या जगातही याची शिक्षा देण्यात येईल आणि परलोकातसुद्धा याची कठोर शिक्षा मिळेल. परलोकी असलेली शिक्षा किती आणि कशी मिळेल हे ईश्वराच्या हाती आहे, मात्र इस्लामी कायद्याने याची शिक्षा मृत्यूदंड तजवीज केली आहे. कुरआनामध्ये स्पष्टपणे म्हटले आहे,

"तुमच्यापैकी जी व्यक्ती इस्लामचा त्याग करील आणि ईशद्रोहाच्या अवस्थेत तिचा मृत्यू होईल, त्याचे समस्त पुण्यकर्म वाया जातील, ईहलोकी आणि परलोकीसुद्धा. अशा व्यक्ती नेहमीसाठी नरकाग्नीमध्ये जळत राहतील."

(संदर्भ : सूरह-ए-बक़रा - २१७)

ही तर झाली पारलौकिक शिक्षा मात्र या जगामध्ये याची शिक्षा काय आहे, हे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी स्पष्ट करताना म्हटले आहे,

"मुस्लिमांची हत्या करणे या तीन कारणांव्यतिरिक्त वैध नाही, ज्यांपैकी एक कारण हे इस्लाम धर्माचा त्याग करणे होय." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - बुखारी)

कारणही तसेच गंभीर आहे. एकदा माणूस इस्लामविमुख झाला की मग अपराध करायला मोकळा झाला. कारण गुन्हा केला काय, पाप केले काय आणि कोणावर अन्याय-अत्याचार केला काय! शेवटी ईश्वराला जाब देण्याचा प्रश्नच नाही. नैतिकता आणि अनैतिकता, न्याय व अन्याय, सत्य आणि असत्यामधील फरकच संपला. म्हणूनच अशा माणसाकडून शांती व बंधुभावाची आणि फायदा व सुरक्षेची आशाच ठेवता येत नाही. त्यामुळे असा माणूस समाजात उपद्रव माजविणार हे निश्चित.

## गुन्हा सिद्ध होण्याच्या अटी व शर्ती

(१) गुन्हेगार व्यक्ती स्त्री असो की पुरुष वयात आलेली असावी.

(२) जर एखाद्या इस्लामेतर धर्माचा त्याग करून इस्लामेतर धर्म जर स्वीकारण्यात आला असेल तर त्या व्यक्तीस शिक्षा देण्यात येणार नाही. उदाहरणार्थ, ईसाई म्हणजेच ख्रिस्ती धर्म सोडून हिंदू धर्म स्वीकारणाऱ्यास अथवा ज्यू धर्म सोडून ख्रिस्ती धर्म स्वीकारणाऱ्यास शिक्षा देण्यात येणार नाही. केवळ इस्लाम धर्म त्यागून कोणत्याही इस्लामेतर विचारसरणीचा स्वीकार करणाऱ्यास ही शिक्षा लागू आहे.

(३) गुन्हा सिद्ध होण्याचे काही संकेत आहेत. उदाहरणार्थ, माणसाने स्पष्टपणे घोषणा करणे की, मी इस्लामचा त्याग केला, इस्लामी शिकवणींची उघडपणे विभर्त्सना केली, अवैध आणि निषिद्ध ठरविण्यात आलेल्या आणि अन्यायी व अत्याचारी बाबींना वैध ठरविल्या, आपला व्यवहार इस्लामी कायद्याविरुद्ध निश्चित केला, इस्लामी श्रद्धांचा इन्कार केला तर अशा व्यक्तीस इस्लामचा इन्कार करणारी असल्याचे घोषित करून शिक्षा देण्यात येईल.

(४) इस्लाम तर्क करणारी व्यक्ती सबळ आणि मानसिकरित्या सुदृढ़ असेल, तरच शिक्षा देण्यात येईल.

(५) कोणाच्या दबावास बळी पडून इस्लामचा त्याग करणाऱ्यास शिक्षा देता येणार नाही.

(६) इस्लामचा त्याग करणाऱ्या व्यक्तीस तीन दिवसांच्या आत पश्चात्ताप झाला आणि परत जर त्याने इस्लामचा स्वीकार केला तर त्या व्यक्तीस शिक्षा होणार नाही.

वरील अटी व शर्तीनुसार इस्लामचा त्याग करणाऱ्यास मृत्यूदंडाची शिक्षा देऊन मानवजातीस उपद्रवापासून मुक्त करण्यात येईल.

## ७) बंडखोरी

बंडखोरी म्हणजे इस्लामी शासनाविरुद्ध सशस्त्र अगर वैचारिक शक्तीचा आधार घेऊन बंड करणे होय. इस्लामी कायद्याने या अपराधाची शिक्षासुद्धा मृत्युदंडाच्या स्वरुपात तजवीज केली आहे. कुरआनात म्हटले आहे,

"श्रद्धावंतांचे दोन गट जेव्हा आपसात लढतील, तेव्हा त्यांच्यात तह घडवून आणा, मग यांपैकी एक समूह जर दुसऱ्यावर अत्याचार करीत असेल तर, त्या अत्याचारी समूहाशी लढा, इथपावेतो की, तो ईश्वराच्या आदेशाकडे येईल तेव्हा त्यांच्या दरम्यान न्यायासह तडजोड करा आणि न्याय करा. कारण ईश्वर न्याय करणाऱ्यास पसंत करतो."
(संदर्भ : सूरह-ए-हुजरात - ९)

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे, "लवकरच संकट आणि उपद्रव डोके वर काढणार आहे." मग आपला आवाज उंच करून प्रेषित म्हणाले,

"खबरदार! जो कोणी माणूस जनसमुदायाविरुद्ध बंडाचा झेंडा फडकावेल तर तो संघटित जरी असला तरी त्याचे डोके उडवा, मग तो कोणीही असो."
(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह-निसाई)

## गुन्हा सिद्ध होण्याच्या अटी व शर्ती

याच्या तीन अटी आहेत.

१) इस्लामी शासनाविरुद्ध बंड पुकारणे,

२) इस्लामी शासनाविरुद्ध शक्तीचा प्रयोग करणे,

३) बंडखोरीची हिंमत करणे.

## दुसरे परिशिष्ट

### क़िसास (देहदंडाची शिक्षा)

इस्लामी कायद्याचे हे सर्वस्वीकृत वैशिष्ट्य आहे की त्यामध्ये मानवाच्या प्राण, इज्जत व शीलतेला केवळ अमर्याद महत्त्वच दिले नसून त्यांच्या रक्षणाची परिपूर्ण आणि यशस्वी सोय केली आहे. याच कार्यपूर्तीसाठी या कायद्यात 'हद' आणि 'दंडविधानाची' तजवीज केली आहे. इस्लामी कायद्याने या गोष्टीची पूर्ण खबरदारी घेतली की समस्त मानवजातीचे प्राण, प्रतिष्ठा, शीलता आणि संपत्तीचे पूर्ण संरक्षण व्हावे. माणसाने भयमुक्त वातावरणात सुख-समाधानाने जगावे. कुरआनात हाच उद्देशपूर्ण करण्यासाठी म्हटले आहे,

"हे श्रद्धावंतांनो, तुमच्यासाठी हत्या करण्याची शिक्षा मृत्यूदंड ठरविण्यात आली आहे. स्वतंत्र माणसाने हत्या केल्यास त्याच्याकडून स्वतंत्र व्यक्तीच बदला घेईल. गुलामाने हत्या केली असेल, तर गुलामच बदला घेईल, स्त्रीने हत्या केली असेल तर तिलाच मृत्यूदंड देण्यात येईल, मात्र एखाद्या खुन्याबरोबर त्याचा भाऊ दयेपूर्ण वर्तन दाखवीत असेल तर भल्या पद्धतीने खूनभरपाईची तडजोड करण्यात यावी. तसेच खुन्यानेसुद्धा अनिवार्यरित्या खूनभरपाई द्यावी. हे तुमच्या पालनकर्त्याकडून शिक्षेत शिथिलता आणि कृपा आहे. एवढे असूनही कोणी अतिरेक करीत असेल तर त्याच्यासाठी यातनादायक शिक्षा आहे." (संदर्भ : सूरह-ए-बक़रा - १७८)

आता आपण यासंबंधी थोडक्यात माहिती घेऊ या.

### अ) हत्या करण्याची शिक्षा-देहदंड व इतर

एखाद्या माणसाला जीवे मारणे हे किती मोठे पाप आहे, हे वेगळे सांगायची गरज नाही. एका माणसाची हत्या करणे म्हणजे समस्त मानवजातीची हत्या करण्यासम असल्याचे कुरआनात म्हटले आहे. (संदर्भ : सूरह-ए-माइदा : ३२) म्हणूनच इस्लामने मानवहत्या करण्याची शिक्षासुद्धा कठोर स्वरुपाची दिली आहे. शिवाय ही शिक्षा ईह आणि पारलौकिक या दोन्ही जीवनात तजवीज करण्यात आली आहे. मानवहत्या करणारी व्यक्ती नेहमीसाठी नरकाग्नीत राहणार. कुरआनात म्हटले आहे,

"जो माणूस एखाद्या श्रद्धावंतांची हत्या करील, त्याची शिक्षा नरकाग्नी आहे, ज्यात तो नेहमीकरिता राहणार. त्याच्यावर ईश्वराचा क्षोभ आणि धिक्कार आहे आणि ईश्वराने त्याच्यासाठी अत्यंत कठोर शिक्षा ठेवली आहे." (संदर्भ : सूरह-ए-निसा - ९३)

इस्लामी कायद्यात मानवहत्येची शिक्षा विविध पैलूंनी लागू करण्यात आली आहे.

(१) किसास - अर्थात प्राणाच्या बदल्यात प्राण घेणे, म्हणजेच मृत्यूदंडाची शिक्षा देणे.

(२) दैयत - अर्थात खून झालेल्या व्यक्तीच्या वारसांना योग्य खूनभरपाई देणे.

(३) प्रायश्चित्त - यांत गुलाम स्वतंत्र करणे अगर दोन महिने सतत रोजे (इस्लामी उपवास) ठेवणे होय.

(४) वारसासंपत्ती हक्कापासून वंचित ठेवणे-जर खुनी हा खून झालेल्या व्यक्तीचा वारसदार असेल तर ही शिक्षा देण्यात येईल.

(५) वारसापत्राच्या हक्कापासून वंचित ठेवणे-जर मयताने आपल्या संपत्तीमधून काही प्रदान करण्याची सूचना केली असेल तर ते विश्वसनीय नसेल.

कुरआनात म्हटले आहे,

''तौरातमध्ये आम्ही यहूदींवर हा आदेश लिहिला होता की, प्राणाच्या बदल्यात प्राण, डोळ्याच्या बदल्यात डोळा, नाकाच्या बदल्यात नाक, कानाच्या बदल्यात कान, दाताच्या बदल्यात दात आणि सर्व जखमांसाठी बरोबरीचा बदला, मग जो किसासचा सदका करेल, त्याच्यासाठी प्रायश्चित आहे, आणि जे लोक ईश्वराने अवतरित केलेल्या कायद्यानुसार निवाडा करीत नाहीत, तेच अत्याचारी आहेत.''

(संदर्भ : सूरह-ए-माइदा - ४५)

तसेच,

''कोणत्याही श्रद्धावंताचे हे काम नाही की त्याने इतर श्रद्धावंताची हत्या करावी. केवळ याऐवजी की त्याकडून चूक घडावी आणि जी व्यक्ती एखाद्या श्रद्धावंताची चुकून हत्या करते, त्याचे प्रायश्चित्त हे आहे की, एका श्रद्धावंत गुलामास मुक्त करावे आणि जर मयत व्यक्ती तुमच्या शत्रुपक्षाची असेल तर याचे प्रायश्चित्त हेच आहे की एक श्रद्धावंत गुलाम मुक्त करावा आणि ती मयत व्यक्ती जर मुस्लिमेतर समूहाची सदस्य असेल, ज्याच्याशी तुमचा शांतीकरार असेल तर त्या मयताच्या वारसांना खूनभरपाई देण्यात यावी आणि एक श्रद्धावंत गुलाम मुक्त करावा. मग ज्याला गुलाम मुक्त करण्यासाठी मिळाला नाही, त्याने सतत दोन महिने उपवास ठेवावेत. हे या अपराधाचे प्रायश्चित्त करण्याची पद्धत आहे आणि ईश्वर खूप दयाळू वतत्वज्ञानी आहे.'' (संदर्भ : सूरह-ए-निसा - ९२)

## ब) हत्येचे प्रकार

शरीअतमध्ये हत्येचे विविध प्रकार वर्णन करण्यात आले असून त्याच प्रकारांनुसार शिक्षा लागू करण्यात आली आहे.

### १) जाणूनबुजून हत्या करणे

या प्रकारामध्ये खून करणारी व्यक्ती पूर्ण तयारीनिशी आणि जाणूनबुजून माणसाचा प्राण जाईपर्यंत मारते आणि प्राण गेल्यावरच त्याला सोडते. याच्या दोन अटी आहेत. पहिली अशी की मयत जीवंत आणि मानव असावा, अर्थात मृतास ठार करण्यामुळे आणि मयत हा मानव नसेल तर शिक्षा लागू होणार नाही. दुसरी अट अशी की मयत व्यक्तीचे प्राण हल्लेखोराच्या प्रयत्नांमुळे गेलेले असावे. नसता हल्लेखोराच्या प्रयत्नांमुळे त्याचे प्राण न जाता इतर कोणत्याही कारणास्तव गेले असेल तर शिक्षा लागू होणार नाही.

### २) विनाहेतु हत्या होणे

खुन्याने हत्या करण्याच्या उद्देशाने मारले नसेल मात्र खून झाला तर यासाठी गुन्हा सिद्ध होण्याच्या तीन अटी आहेत. पहिली अशी की मयत हा खुन्याच्या प्रयत्नातून मेला असावा, दुसरी अट अशी की खुन्याने मयतावर अतिरेक केला असावा आणि तिसरी अट अशी की मृत्यू आणि मृत्यूच्या सबबीमध्ये संबंध असावा. या अटी आणि शर्ती पूर्ण झाल्या तरच खुन्यास शिक्षा देण्यात येईल.

### ३) चुकून झालेली हत्या

उदाहरणार्थ, एखादा माणूस सिंहाची शिकार करीत होता आणि बंदुकीची गोळी चुकून एखाद्या माणसाला लागली, तर याला चुकून झालेली हत्या म्हणता येईल.

यामध्ये पहिल्या प्रकारची हत्या केल्यास खुन्याला मृत्यूदंडाची शिक्षा देण्यात येईल. अथवा दैयत (खून भरपाई), वारसासंपत्तीचा अधिकार न देणे वगैरेची शिक्षा देण्यात येईल. दुसऱ्या प्रकारची शिक्षा झाल्यास दैयत (खूनभरपाई) प्रायश्चित्त अथवा दंडविधान अथवा दोन महिन्यांचे रोजे (इस्लामी उपवास) ठेवणे, ही शिक्षा लागू होईल. शिवाय अतिरिक्त शिक्षा म्हणून वारसाहक्कापासून वंचित ठेवण्यात येईल. तिसऱ्या प्रकारची मानवहत्या झाल्यास याची मूळ शिक्षा ही दैयत (खूनभरपाई) आणि प्रायश्चित्त होय. यात अतिरिक्त शिक्षा म्हणून दंड आणि रोजे, तसेच वारसासंपत्तीचा हक्क हिसकावणे होय.

## गुन्हा सिद्ध होण्याच्या अटी व शर्ती

हत्येचा गुन्हा सिद्ध होण्यासाठी निम्नलिखित अटी व शर्ती आवश्यक आहेत.

(१) खुनी हा वयात आलेला, मानसिक स्थिती सुदृढ़ असलेला आणि स्वतंत्र असावा.

(२) मृत व्यक्तीने कोणाचीही हत्या केलेली नसावी अथवा ती सामरिक द्रोही नसावी अर्थात धर्मयुद्धातील शत्रुपक्षाची नसावी, इस्लाम त्यागलेली विवाहित आणि व्यभिचारी नसावी.

(३) मयत व्यक्तीने खुन्यावर हल्ला केलेला नसावा, म्हणजेच खुन्याने आत्मरक्षण करण्यासाठी मयताचा खून केलेला नसावा.

(४) मयत व्यक्ती ही मुस्लिम असो वा मुस्लिमेतर खुन्यास मृत्यूदंडाची शिक्षा देण्यात येईल.

५) खुनी आणि मयत व्यक्ती समलिंगी असावी.

या अटी व शर्ती पूर्ण झाल्यावरच खुन्यास मृत्यूदंडाची शिक्षा देण्यात येईल.

## क) आक्रमक हल्लेखोरी आणि याची शिक्षा

इस्लामने ज्याप्रमाणे इतरांचे प्राण घेण्याची शिक्षा तजवीज केली आहे, त्याचप्रमाणे शारीरिक क्षती पोचविण्याची, अवयव कापण्याची वा इतर प्रकारची शारीरिक पीडा देण्याचीसुद्धा शिक्षा लागू केली आहे. अर्थातच या शिक्षेस 'किसास' (बदला घेण्याची) शिक्षा, 'दैयत' (खून वा क्षतीभरपाईची) शिक्षा म्हटले गेले आहे. ईश्वराने कुरआनात म्हटले आहे,

"आणि तौरातमध्ये यहुद्यांवर हा आदेश लिहिण्यात आला होता की, प्राणाच्या बदल्यात प्राण, डोळ्याच्या बदल्यात डोळा, नाकाच्या बदल्यात नाक, कानाच्या बदल्यात कान, दाताच्या बदल्यात दात आणि सर्वच जखमांसाठी बरोबरीचा बदला होय. मग जो 'किसास'चा सदका करील. ते त्याच्याकरीता प्रायश्चित्त आहे आणि जे ईश्वराच्या कायद्यानुसार निवाडा करीत नाहीत, तेच अत्याचारी आहेत."

(संदर्भ : सूरह-ए-माइदा - ४५)

## जखम व तिचे प्रकार

इस्लामी कायद्यात जखमांचे विविध प्रकार वर्णन करण्यात आलेले असून त्यांचा दर्जा ठरविण्यात आला आहे.

(१) एखादा अवयव शरीरापासून विभक्त करणे, उदाहरणार्थ, हात कापणे, डोळा फोडणे वगैरे.

(२) शरीराचा एखादा अवयव निकामी करणे. उदाहरणार्थ, एखाद्या अवयवास अशाप्रकारे क्षती पोचविणे की, तो निकामी व्हावा. म्हणजेच ऐकू न येणे, हाताने पकडता न येणे, पायाने चालता न येणे, डोळ्याने न दिसणे, कानाने ऐकू न येणे, समागम करता न येणे, बोटांनी पकडता न येणे वगैरे.

(३) शरीराच्या वरच्या भागावर अथवा चेहऱ्यावर जखम करणे. यात रक्त वाहणे, मांसाचा लचका तोडणे वगैरे सामील आहे.

(४) डोक्याच्या खाली जखम करणे. उदाहरणार्थ छाती व पोट फाडणे, क्षती पोचविणे वगैरे.

(५) मामुली चोप देणे वगैरे.

## शारीरिक जखमांवर लागू करण्यात आलेली शिक्षा

हत्येप्रमाणेच शारीरिक क्षती पोचविण्याच्या शिक्षेसाठी अटी व शर्ती लागू आहेत. यामध्येसुद्धा जाणूनबुजून, चुकून व नकळत होणाऱ्या हत्येच्या अपराधांप्रमाणेच शिक्षा लागू करण्यात आली आहे.

## जखम पोचविण्याची शिक्षा 'किसास' होय

अर्थातच 'किसास' म्हणजे बदला आणि तोही तंतोतंत. जेवढ्या प्रमाणात जखम करण्यात आली असेल, अगदी त्याच प्रमाणात अपराध्यास जखम करून शिक्षा देण्यात येईल, किंवा क्षतीग्रस्ताने संमती दिल्यास 'दैयत' म्हणजेच जखमेची आर्थिक भरपाई देण्यात येईल अथवा क्षतीग्रस्ताने माफ केल्यास अपराध्यास माफ करण्यात येईल.

# तिसरे परिशिष्ट

## दंडविधान

इस्लामने गुन्हेगारीचे निर्मूलन करण्यासाठी 'हद', मृत्यूदंड व देहदंड अर्थात 'किसास' चे कलम लागू केले आहे. मात्र हे लागू करण्यासाठी ज्या अटी व शर्ती लावण्यात आल्या आहेत, त्या कधीकधी पूर्ण होत नाहीत. मग अशा परिस्थितीत गुन्हेगारास मुक्त सोडावे की अपराधानुसार शिक्षा द्यावी? शरीअत अर्थात इस्लामी कायद्यामध्ये गुन्हेगारास निश्चितच शिक्षा मिळावी, अशी भूमिका आहे. अन्यथा समाज हा उपद्रवमुक्त होणार नाही. याकरिता त्यावर दंडविधान लागू करण्यात आले आहे. म्हणून आपण इस्लामी कायद्याने प्रदाने केलेले दंडविधान आणि त्याचे नियम व पद्धतींचा थोडक्यात अभ्यास करु या. त्याचप्रमाणे इस्लामी दंडविधानाचा वर्तमान दंडविधानाशी तुलणात्मक वेध घेऊ या, जेणेकरून वर्तमान दंडविधानातील त्रुट्या आणि कमतरता दूर करण्याची विवेकबुद्धी मिळावी.

### दंडविधानाचे उद्दिष्ट

'किसास' अर्थात शारीरिक क्षती व हानीचा जशास तसा बदला घेण्याच्या शिक्षेचा जो हेतु आणि उद्देश आहे, तोच दंडविधानाचासुद्धा आहे. इस्लामी तत्त्वज्ञ माननीय जीलई म्हणतात की, अपराध अगर गुन्हेगारीची पुनरावृत्ती होऊ नये, गुन्हेगाराने परत तो गुन्हा करू नये आणि इतरांनीही यापासून बोध घ्यावा, हाच दंडविधानाचा मूळ हेतु आहे. शिवाय विनाकारण आणि अतिरिक्त शिक्षा देण्याची इस्लामने मनाई केली आहे. उदाहरणार्थ, एखाद्या गुन्हेगारास केवळ तंबी केल्यास परत गुन्हा न करण्याची शाश्वती असेल अथवा हलका चोप देऊन किंवा दमदाटी करून तो परत गुन्हा न करण्याची शाश्वती असेल तर एवढ्यावरच काम भागवावे. अथवा त्यास गुन्हा केल्याची जाणीव करून देण्यासाठी धिक्कारून बोलण्यामुळे अथवा कैद करून ठेवल्याने परत गुन्हा न करण्याची शाश्वती असेल तर अतिरिक्त शिक्षा देणे योग्य नसल्याचे इस्लामी कायद्याने म्हटले आहे.

दंडविधानाचा एक हेतु हा अपराध्याचे मनपरिवर्तन करून त्यात सुधारणा घडविणेसुद्धा आहे. त्याला आपल्या पाप अगर अपराधावर पश्चत्ताप झाला. तर समजा हे त्याच्यात सुधार झाल्याचे चिन्ह होय. जर त्यास कैदेची शिक्षा दिली आणि त्याला आपल्या दुष्कर्मावर पश्चात्ताप झाला आणि त्याने ईश्वरासमोर आपल्या करणीची माफी मागितली तर त्यास कैदमुक्त करण्यात येईल.

दंडविधानाचे आणखीन एक उद्दिष्ट असे की गुन्हेगाराने ज्याच्यावर शारीरिक अत्याचार केला, त्याच्या मनात खदखदणारा गुन्हेगाराविषयीचा संताप थंड व्हावा आणि त्याचे मन-मस्तिष्क गुन्हेगाराविषयी द्वेश आणि वैरमुक्त व्हावे.

(संदर्भ : दुर्रे मुख्तार, अल-बहरुर्राइक़, फतावा हिन्दिया आलमगीरिया)

## दंडविधानाची मर्यादा

शरीअतने विविध अपराधांवर दंडविधान लागू केले असले तरी या बाबतीत खबरदार केले की गरज असेल तेवढेच दंडविधान लागू करण्यात यावे. विनाकारण आणि हकनाक अपराध्यास छळू नये. नसता दंडविधानाचा हेतु नष्ट होईल. म्हणूनच अपराध्याचा एखादा अवयव निकामी होण्याइतपत कठोर मारझोड होता कामा नये.

(संदर्भ : अलमुग्नी)

## दंडविधानाचे प्रकार

शरीअत अर्थात इस्लामी कायद्यात दंडविधानाचे विविध स्वरुप व प्रकार वर्णन करण्यात आले आहेत. उदाहरणार्थ, शारीरिक शिक्षा, आर्थिक दंड, कैदेची शिक्षा, शहराबाहेर करणे अर्थात तडीपार करणे वगैरे विशेष उल्लेखनीय होय. शारीरिक शिक्षा म्हणजे गुन्हेगारास दंडात्मकरित्या मृत्यूची शिक्षा देणे, कोरडे मारणे ही विशेष शिक्षा होय. पुढे या प्रकारांवर थोडी वर्णनात्मक चर्चा करण्यात येत आहे.

## दंडविधानानुसार मृत्यूदंड

इस्लामी कायद्यात 'किसास' (बदला घेण्याची शिक्षा) नुसार मृत्यूदंड देता येतो, याव्यतिरिक्त दंडविधानानुसारसुद्धा मृत्यूदंड देण्याची शिक्षा देणे वैध आहे. त्याचप्रमाणे समलिंगी संभोग करणाऱ्यांना मृत्यूदंड देता येईल, चोरी करणाऱ्यांचे हात कापता येतील, धारदार शस्त्रांचा वापर न करता (लाठी, दगडांचा वापर करून) खून करणाऱ्याससुद्धा दंडविधानानुसार मृत्यूदंडाची शिक्षा देता येईल, जादूगिरी करणाऱ्यालासुद्धा मृत्यूदंडाची शिक्षा देण्यात येईल. याशिवाय दारू पिणाऱ्यास चौथ्यांदा हा अपराध केला असेल तर त्यासही मृत्यूदंडाची शिक्षा देण्यात येईल. या दंडविधानासाठी प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या या वचनाचा आधार घेण्यात आला आहे,

"माननीय वैलहम हुमैरी (र.) यांनी म्हटले की मी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांना विचारले,

'आम्ही एका थंड प्रदेशात राहतो. तेथे खूप थंडी लागत असल्याने गव्हापासून

मदिरा तयार करण्यात येते व ती मदिरा उष्णता व शक्ती प्राप्त करण्यासाठी पिण्यात येते. तेव्हा अशा परिस्थितीत दारू पिणे वैध आहे काय?'

"त्या दारूमध्ये नशा आहे काय?" प्रेषितांनी विचारले.

"होय! ती दारू पिल्याने झिंग चढते," मी उत्तरलो.

"मग ती दारू पिऊ नये." प्रेषित म्हणाले.

"मात्र लोक ऐकणार नाहीत." मी म्हणालो.

"तर मग ते दारू सोडेपर्यंत त्यांच्याशी सशस्त्र लढाई करा." प्रेषित म्हणाले.

(संदर्भ : प्रेषितवचन संग्रह - अबू दाऊद)

याशिवाय आणखीन एका प्रेषितवचनाचा या दंडविधानास आधार आहे, तो असा की एकदा प्रेषित मुहम्मद (स.) यानी म्हटले,

"ईश्वर एक आहे, अशी ग्वाही देणाऱ्या कोणत्याही मुस्लिमाची हत्या वैध (हलाल) नाही, मात्र तीन कारणास्तव त्याची हत्या वैध ठरते. प्रथम असे की, विवाहित असूनही व्यभिचार करण्याच्या अपराधास्तव, त्याची हत्या करण्यात येईल. दुसरे असे की, त्याने एखाद्याची हत्या केली असेल तर 'किसास' (मृत्यूदंडाच्या शिक्षे) नुसार त्याची हत्या करण्यात येईल आणि तिसरे असे की त्याने इस्लामचा त्याग केला असेल तर त्याची हत्या करण्यात येईल." (संदर्भ : प्रेषितवचन संग्रह-मुस्लिम)

आणखीनही अशा बऱ्याच प्रेषितवचनांच्या आधारे इस्लामी दंडविधानानुसार मृत्युदंडाची शिक्षा देता येते.

## कोरड्यांची शिक्षा

व्यभिचार, दारू पिणे वगैरेची कोरडे मारून शिक्षा देण्याचे प्रमाण कुरआन व प्रेषितवचन शास्त्रात आहे. मात्र दंडविधानानुसार कोरडे मारण्याची शिक्षा देण्याचे प्रमाण आहे काय? तर याबाबतीत इस्लामी कायदातज्ञांची भूमिका आहे की, दंडविधानानुसारही अपराध्यास कोरडे मारण्याची शिक्षा देता येते. कारण पत्नीने पतीची अवज्ञा केल्यास हलक्या-फुलक्या पद्धतीने पत्नीस मारण्याची परवानगी कुरआनात देण्यात आली आहे. त्याचप्रमाणे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे की 'हद'च्या शिक्षेव्यतिरिक्त इस्लामी दंडविधानानुसार कोरडे मारण्याची शिक्षा देता येते, मात्र जास्तीतजास्त दहाच कोरडे मारण्याची प्रेषित मुहम्मद (स.) यांनी परवानगी दिली आहे. इस्लामी विधीशास्त्रज्ञ

माननीय कासानी यांनी म्हटले आहे की ज्या अपराधांची 'हद'नुसार शिक्षा तजवीज करण्यात आलेली नाही, त्यासंबंधी तत्कालीन शासकाने अथवा न्यायाधीशाने चोप देण्याची, कैद करण्याची, दमदाटी करण्याची शिक्षा अपराधाच्या गांभीर्यानुसार ठरवावी. शिवाय इस्लामी दंडविधानात कोरडे मारण्याची शिक्षा द्यावी. (संदर्भ : बदायुस सनाएअ)

## कोरडे मारण्याची मर्यादा

इस्लामी कायद्याची अशी भूमिका आहे की अपराधानुसार जी शिक्षा 'हद'च्या प्रमाणात असते, त्यापेक्षा थोडी कमी असावी. उदाहरणार्थ, व्यभिचाराच्या अपराधाची 'हद' स्वरुपाची शिक्षा शंभर कोड्याची आहे, मात्र दंडविधानानुसार ऐंशी कोरडे मारण्यात येतील, व्यभिचाराचा चुकीचा आरोप लावण्याच्या अपराधास्तव 'हद' स्वरुपाची शिक्षा जी काही असेल, त्यापेक्षा दंडविधानात कमी देण्यात येईल. त्याचप्रमाणे दारु पिणे, चोरी करणे वगैरेच्या शिक्षेसंबंधी नियम आहे.

## कोरड्यांची किमान मर्यादा

जेवढे कोरडे मारून दंडविधानाच्या शिक्षेचा हेतु पूर्ण होत असेल, तेवढे कोरडे मारावेत. अर्थात कमीतकमी तीन आणि जास्तीतजास्त एकोणचाळीस कोरडे मारता येतील. (संदर्भ : अलमुग़नी)

## कैद व बंदीवान बनविण्याची शिक्षा

अर्थातच माणसाचे व्यक्तिगत स्वातंत्र्य हिरावून घेणे म्हणजे कैद करण्याची शिक्षा देणे होय. म्हणजे त्याला आपल्या मर्जीने काहीही करता येऊ नये. अशा रितीने म्हणजेच अपराध्याला कैद करून ठेवण्याची शिक्षा इस्लामी दंड विधानात आहे.

(संदर्भ : अलमुग़नी)

इस्लामी कायद्यात असेदेखील आहे की वेळ पडल्यास कैदेबरोबरच गुन्हेगारास कोरड्यांचीही शिक्षा देण्यात येईल. अर्थातच हे अपराधाचे गांभीर्य समोर ठेवूनच निश्चित करण्यात येईल आणि आर्थिक दंडही आकाण्यात येईल. (संदर्भ : अल बहरुराईक़)

## कैदेच्या शिक्षेचे प्रकार

कैदेचे दोन प्रकार आहेत, एक विशिष्ट मुदतीपर्यंतची कैद आणि मुदत निश्चित न केलेली कैद अथवा आजीवन कैद. आजीवन कैद ही अपराध्याच्या सुधारणास्तव असो की इतर कोणत्याही हितासाठी असो, यांचा आपण खाली अभ्यास करणारच आहोत.

## पहिला प्रकार - विशिष्ट मुदतीपर्यंतची कैद

इस्लामी कायद्याने काही अपराधांची कैदेची शिक्षा देण्याची मुदत निश्चित केली आहे. उदाहरणार्थ, शिवीगाळ करणे अथवा अभद्र शब्दांचा वापर करण्याची कैदेची शिक्षा देण्याची मुदत निश्चित केली आहे. त्याचप्रमाणे दारू पिणे, व्यापारात दगाबाजी करणे अगर व्याजाचा व्यवहार करण्याची शिक्षा कैदेच्या स्वरुपात निश्चित केली आहे. म्हणजे आपल्या अपराधाचा पश्चात्ताप होऊन ईश्वरासमोर क्षमा-याचना केल्यास ही मुदत पूर्ण होते.

खोटी साक्ष देणाऱ्या गुन्हेगारास एका वर्षाची कैद, इस्लामी शासनाच्या कारभारावर विनाकारण टीका करण्याच्या अपराधास्तव एका महिन्याची कैद ठरविण्यात आली आहे. (संदर्भ : एहकामुस सुलतानिया)

## दुसरा प्रकार - बेमुदत कैदेची शिक्षा

एखाद्या व्यक्तीस बांधून सिंह अगर हिंस्र पशुसमोर टाकणे, कडक उन्हात हातपाय बांधून ठेवणे, समलिंगी संभोग करणे वगैरेसारख्या घोर अपराधांवर बेमुदत कैदेची शिक्षा देण्याची दंडविधानात्मक कार्यवाही करण्यात येईल. त्याचप्रमाणे एखाद्या स्त्रीला फूस लावून नेणे, तिच्या आईवडिलांविरुद्ध भडकावणे वगैरेसारख्या अपराधांसाठीही बेमुदत कैदेची शिक्षा देण्यात येईल. याशिवाय समाजात अंधश्रद्धा पसरविण्याच्या धर्माचा आधार घेऊन धर्मविरोधी गोष्टी पसरविण्याच्या अपराधास्तव गुन्हेगारास आजीवन कैदेची शिक्षा देण्याची इस्लामी दंडविधानात निश्चित करण्यात आली आहे.

## कैदेचे स्वरुप

कारागृह स्वच्छ असावे. लघवी, शौच आणि स्नान करण्याची, कपडे धुण्याची मुबलक व्यवस्था असावी. कैद्याला पोटभरून मात्र अत्यंत साधे जेवण असावे. त्याच्या आरोग्याची पूर्ण काळजी घेण्यात यावी. झोपायला नरम गादी वगैरे न देता अत्यंत साधे बिछाणे व पांघरून द्यावे. थंडी, ऊन्ह, पाऊस वगैरेसारख्या बाबींपासून पूर्ण संरक्षण होण्यासारखी स्वच्छ खोली असावी. कैद्याला जर एखादी कला-कौशल्य येत असेल अथवा काम करण्याची पात्रता त्याच्यात असेल तर त्यानुसार त्याच्याकडून सेवा करून घेतली जाऊ शकते. मात्र त्याला जमातीसह नमाज पढण्याची, जुमाची नमाज पढण्याची, ईदची नमाज पढण्याची, हज करण्याची, एवढेच नव्हे तर कोणाच्या अंत्यविधित सामील होण्याची आणि एखाद्या रोग्याची विचारपूस करण्याची परवानगी नसेल. कारण हे सर्व करण्यासाठी त्याला कैदेच्या बाहेर जावे लागेल.

## शहरातून बाहेर काढण्याची शिक्षा

'हद' आणि 'दंडविधान' या दोन्ही प्रकारात शहराबाहेर घालण्याची शिक्षा तजवीज करण्यात आली आहे. 'हद' प्रकारच्या शिक्षेमध्ये अविवाहित असलेल्या व्यभिचारी व्यक्तींना आणि धर्मद्वेशी पक्षाकडून लढणाऱ्यास शहराबाहेर घालवण्याची शिक्षा देण्यात येते. त्याचप्रमाणे व्यभिचाऱ्याला दंडविधानानुसार शहराबाहेर करण्याची शिक्षा देण्यात येईल. (संदर्भ : इब्ने आबेदीन)

## शहराबाहेर घालवण्याच्या शिक्षेचे स्वरुप

शहराबाहेर घालवण्याची अगर तडीपार करण्याची अट अशी आहे की, अपराध्यास शहरापासून सत्तर किलोमीटर दूर टाकण्यात यावे. अर्थात शहराच्या चारी दिशांना तो कमीतकमी सत्तर किलोमीटरच्या अंतराबाहेर असावा. (संदर्भ : अलमुग़्नी)

## आर्थिक दंडाची शिक्षा

दंडविधानानुसार गुन्हेगारास आर्थिक दंड करण्याचा अर्थ असा आहे की, इस्लामी शासक अथवा न्यायाधीश त्याच्या दंडाची रक्कम शासकीय खात्यात जमा करील आणि अपराधी जेव्हा आपल्यात सुधारणा घडवून आणील तेव्हा त्याची जमा करण्यात आलेली संपत्ती परत करण्यात येईल. मात्र तो जर स्वत:ची सुधारणा करण्यासाठी तयार नसेल तर त्याची रक्कम त्यास परत न करता शासकीय ताब्यात घेण्यात येईल. अपराध्याकडून घेण्यात आलेल्या संपत्तीचे तीन प्रकार असू शकतात. पहिला प्रकार निधिद्ध संपत्तीचा. उदाहरणार्थ, दारु विक्रीचा पैसा, नाच गाण्याचा आणि मूर्ती विकून मिळविलेला पैसा अगर इतर अवैध मार्गाने मिळविलेली संपत्ती होय. हा पैसा अगर संपत्ती नष्ट करण्यात येईल. दुसऱ्या प्रकारची संपत्ती ही परिवर्तनीय असू शकते. उदाहरणार्थ, क्रीडा व खेळातून मिळविलेला पैसा वा त्याची साधने आणि आर्थिक चलन वगैरे ही संपत्ती परिवर्तीत करण्यात येईल. तिसरा प्रकार म्हणजे जंगम अगर स्थायी संपत्तीचा होय. उदाहरणार्थ, जमीन-जुमला, घर-इमारत वगैरे या प्रकारच्या संपत्तीवर शासन ताबा मिळवील. (संदर्भ : अल-फतावा हिंदिया)

# दंडविधानाची काही इतर स्वरुपे

शरीअतमध्ये दंडविधानाच्या स्वरुपात शारीरिक आणि आर्थिक शिक्षांव्यतिरिक्त काही हलक्याफुलक्या स्वरुपाच्या शिक्षासुद्धा लागू करण्यात आल्या आहेत. त्या आपण थोडक्यात अभ्यासू.

## १) विचारपूस करणे

इस्लामी शासक अथवा न्यायाधीशाला या गोष्टीचा अधिकार आहे की गुन्हेगारास न्यायालयात हजर राहण्याची नोटिस बजावावी अगर त्याची कसून विचारपूस करावी.

(संदर्भ : बदायुन नसाया)

## २) तंबी करणे

ईश्वराने पुरुषास आदेश दिला आहे की त्याने आपल्या पत्नीस तिच्याकडून चूक घडल्यास तंबी करावी. यावरूनच विधीतज्ज्ञांनी ही भूमिका घेतली की चूक अगर छोटा अपराध केल्यास गुन्हेगारास तंबी करावी, अर्थात गुन्हेगारास दमदाटी करावी. तंबी करण्याच्या विविध पद्धती असू शकतात. उदाहरणार्थ, न्यायाधीशाने अपराध्यास धिक्कारावे, दमदाटी करून त्याला त्याच्या चुकीची जाणीव करुन द्यावी, वगैरे.

(संदर्भ : अस् सियासतुल शरीआ)

## ३) सामाजिक बहिष्कार

समाजाचे हित जोपासण्याकरिता गुन्हेगारावर सामाजिक बहिष्कार टाकता येतो. त्याच्याशी देवाण-घेवाण, इतर कोणत्याही प्रकारचा व्यवहार न करता त्याच्याशी संबंध-विच्छेद करण्याचा निवाडा न्यायाधीश अगर इस्लामी शासक देऊ शकतो.

(संदर्भ : अस् सियासतुल शरीआ)

## ४) अधिकार अगर हुद्यावरून कमी करणे

त्याचप्रमाणे गुन्हेगार हा शासकीय अधिकारी, कर्मचारी अगर हुद्देदार असेल तर त्याला न्यायाधीश त्याच्या हुद्यावरून कमी करू शकतो. दारू पिल्यास, लाच मागितल्यास, भ्रष्टाचाराचा प्रयत्न केल्यास, अन्याय केल्यास, कामात दिरंगाई केल्यास प्रत्यक्षरित्या अशा अधिकाऱ्यास निलंबित करण्याचा आदेश न्यायाधीश देऊ शकतो.

(संदर्भ : अस् सियासतुल शरीआ)

### ५) समाजात बदनामी करणे

हीसुद्धा इस्लामी दंड विधानाची एक शिक्षा आहे. गुन्हेगारास सार्वजनिक ठिकाणी म्हणजे बाजार-हाटसारख्या ठिकाणी आणून किंवा वृत्तपत्रात त्याची बातमी देऊन लोकांना दक्ष करण्यात येईल की ही व्यक्ती गुन्हेगार आहे. एवढ़ेच नव्हे तर अपराधाचे गांभीर्य लक्षात घेऊन गुन्हेगाराच्या तोंडाला काळे फासण्याचा आदेशसुद्धा न्यायाधीश देऊ शकतो. ही शिक्षा खोटी साक्ष देणाऱ्या, चोरी करणाऱ्या, उपद्रव माजविणाऱ्या, अनैतिकतेस खतपाणी घालणाऱ्यास आणि मृत प्राण्याचे मांस विकणाऱ्या गुन्हेगारास देण्यात येईल. (संदर्भ : इब्ने आबेदीन)

## इस्लामी दंडविधान लागू करणे आणि न्यायाधीशाचा निवाडा

उपरोक्त मजकुरात दंडविधानात्मक शिक्षांचे विविध स्वरुप वर्णण करण्यात आले असून यावरून हे स्पष्ट करण्यात आले आहे की 'शरीअत'मध्ये याबाबतीत बराच वाव आहे. मात्र प्रश्न असा उठतो की, या शिक्षा कशाप्रकारे लागू करणे शक्य होईल? त्याचप्रमाणे गुन्हेगारावर कशा प्रकारची शिक्षा लागू करण्यात येईल? याबाबतीत प्रामुख्याने दोन गोष्टींचा विचार करण्यात आली आहे. प्रथम अशी की, न्यायाधीशाला या गोष्टीचा अधिकार देण्यात आला आहे की गुन्ह्याचे गांभीर्य आणि समाजाचे हित पाहून तो गरजेनुसार कोणतीही शिक्षा देऊ शकतो. दुसरे असे की न्यायाधीशाला शिक्षा तजवीज करण्याचा पूर्ण अधिकार असल्याचा अर्थ असा मुळीच नाही की वाटेल ती आणि वाटेल तशी शिक्षा तजवीज करावी. तर यासाठी ही अनिवार्य अट आहे की न्यायाधीश हा शरीअत अर्थात इस्लामी कायद्याचा गाढा अभ्यासक आणि प्रगल्भ विद्‌वान असावा, शिवाय त्याच्यात परिपूर्ण साकल्यबुद्धी असावी. (संदर्भ : अल फतावा हिंदिया)

## दंड विधान लागू करण्याचे स्वरुप

मागेच आपण पाहिले आहे की गुन्हेगारावर त्याच्या अपराधाची 'हद' आणि 'प्रायश्चित्त' स्वरुपाची शिक्षा निश्चित अटी आणि शर्ती पूर्ण होत नसल्याने देता येत नसल्यास गुन्हेगारास इस्लामी दंड विधानानुसार शिक्षा देण्यात येईल. म्हणूनच अनिवार्य असलेले इस्लामी आदेश, उदाहरणार्थ, नमाज, रोजा, ज़कात वगैरे तर्क करणाऱ्या गुन्हेगारासुद्धा दंडविधानात्मक शिक्षा देण्यात येईल. याव्यतिरिक्त चोरी, व्यभिचार मादक पदार्थांचा वापर करणाऱ्या गुन्हेगारासुद्धा दंडविधानात्मक शिक्षा देण्यात येईल. पुढील मजकुरात आपण थोडक्यात या गोष्टींचा वेध घेऊ या.

## हत्या करण्याच्या अपराधात दंडविधात्मक शिक्षेची स्वरुपे

शरीअतमध्ये हत्या करण्याची शिक्षा 'किसास' (जशास तसा बदला अर्थात हत्येचा बदला हत्या) तजवीज करण्यात आली आहे. मात्र ही शिक्षा लागू करण्यासाठी असलेल्या अटी व शर्तींची पूर्तता न झाल्यास अगर समस्त अटींपैकी एकही अटीची कमतरता आढळून आल्यास खुन्यावर दंडविधानात्मक कार्यवाही करण्यात येईल. अर्थातच गुन्हेगारास शंभर कोरडे मारण्याची आणि एक वर्ष कैदेची शिक्षा देण्यात येईल. याशिवाय चोप देणे, कोरड्याने अथवा लाठीने मारणे वगैरेसारख्या गुन्ह्यात हल्ला झालेल्या व्यक्तीचा एखादा अवयव निकामी जर झाला नसेल, जखम झालेली नसेल, तर दंडविधानात्मक कार्यवाही करण्यात येईल. मात्र जर जखम पूर्ण भरून निघत असेल आणि जखम झाल्याचे चिन्ह मिटले असेल तर दंडात्मक कार्यवाही होणार नाही. त्याचप्रमाणे चुकून आणि विनाहेतू झालेल्या हत्येवर अपराध्यास दंडविधानात्मक शिक्षा देण्यात येणार नाही.

## व्यभिचाराच्या अपराधात दंडविधानात्मक शिक्षेची स्वरुपे

व्यभिचार करण्याची शिक्षा शंभर कोरडे आणि 'रजम' (अर्थात दगडाने ठेचून मारणे) होय. मात्र यासाठीसुद्धा अटी आणि शर्तींची पूर्तता न झाल्यास अथवा एखाद्या अटीची पूर्तता न झाल्यास अगर व्यभिचार करण्यात शंका उत्पन्न झाल्यास या दोन्ही प्रकारच्या शिक्षांमध्ये कमतरता अगर शिथिलता होऊ शकते. यावर आपण थोडक्यात चर्चा करू या. प्रथम आपण शंका असण्याच्या अवस्थेवर चर्चा करु या.

व्यभिचारकर्मात शंका उत्पन्न होणे, उदाहरणार्थ, तीन वेळेस अगर दोन वेळेस तलाक़ देण्यात आलेल्या स्त्रीशी संभोग करणे, तेही अशा अवस्थेत की पत्नीशी अशा अवस्थेत संभोग करणे निषिद्ध असल्याचे पतीला ज्ञान नसताना, पती म्हणजेच अपराध्यास व्यभिचार करण्याची 'रजम'ची शिक्षा देता येणार नाही. मात्र जर पतीला हे माहीत असेल की, दोन अथवा तीन तलाक़ देण्यात आलेल्या पत्नीबरोबर संभोग करणे निषिद्ध आहे आणि हे माहीत असूनदेखील त्याने जर पत्नीशी संभोग केला तर हा संभोग मात्र व्यभिचार ठरेल आणि व्यभिचाऱ्यास 'रजम'ची शिक्षा देण्यात येईल.

त्याचप्रमाणे अटी आणि शर्ती पूर्ण होत नसल्यास अथवा एखादी अटी पूर्ण होत नसल्यास 'हद' ची शिक्षा शिथिल होऊन दंडविधिनात्मक शिक्षेत ती परावर्तीत होते. उदाहरणार्थ, व्यभिचार सिद्ध होण्यासाठी स्त्री-पुरुष जीवंत असावे लागतात. मात्र पुरुषाने जर एखाद्या मृत स्त्रीशी संभोग केला असेल तर, येथे व्यभिचाराचा गुन्हा सिद्ध होणार नाही. म्हणून 'हद'च्या स्वरुपाची शिक्षा लागू न होता पुरुषावर दंडविधानात्मक शिक्षा देण्यात येईल. कारण त्याचे हे दुष्कर्म अत्यंत मोठे पाप आहे. (संदर्भ : बदायुन नसाया)

त्याचप्रमाणे एखाद्या स्त्रीने व्यभिचार केला. मात्र पुरुषाशी लैंगिक वासना न भागविता कुत्र्याकरवी अथवा वानराकरवी संभोग केला. या ठिकाणीसुद्धा एक अट अशी आहे की व्यभिचार सिद्ध होण्यासाठी पुरुष-स्त्रीमध्ये संभोग व्हावा. मात्र ही अट या ठिकाणी पूर्ण होत नसल्याने व्यभिचाराची शिक्षा न देता दंडविधानात्मक शिक्षा देण्यात येईल. एखाद्या वयात न आलेल्या मुला-मुलीच्या जोडप्यात संभोग झाला तरी हा 'हद'च्या स्वरुपाच्या शिक्षेस पात्र अपराध ठरणार नाही. कारण दोघेही अल्पवयीन असल्याने व्यभिचार सिद्ध होत नाही. व्यभिचार सिद्ध होण्यासाठी स्त्री-पुरुष वयात आलेले असण्याची अट लावण्यात आली आहे. म्हणून या प्रकारच्या अपराधास्तव 'रजम'ऐवजी दंडविधानात्मक शिक्षा देण्यात येईल. (संदर्भ : अल फतावा हिंदिया)

व्यभिचारापेक्षा कमी स्वरुपाच्या अपराधावर 'हद' स्वरुपाची शिक्षा लागू होणार नाही. मात्र हेसुद्धा व्यभिचाराकडे नेणारे कृत्य असल्याने घोर पाप समजले गेले. म्हणूनच त्यावर दंडविधानाची कार्यवाही होईल. त्याचप्रमाणे अश्लील चाळे करणे, निर्लज्ज वर्तन करणे, स्त्रीला तिच्या पतीच्या अनदेखत इतर ठिकाणी घेऊन जाणे, स्त्रियांशी वाह्यात व अश्लील चाळे करणे वा अश्लील बोलणे वगैरेसारख्या अपराधांवर दंडविधीनात्मक कार्यवाही करण्यात येईल.

## खोटा आरोप लावण्यावर दंडविधानात्मक शिक्षेचे स्वरुप

इस्लामी कायद्यात खोटा आरोप लावण्याच्या अपराध सिद्धीस्तव ज्या अटी व शर्तीवर 'क़ज़फ़'ची शिक्षा देण्यात आली आहे, त्या अटींपैकी एकही अट बाकी राहिल्यास अपराध्याला शिक्षा न देता दंडविधानात्मक कार्यवाही करण्यात येईल. उदाहरणार्थ, ज्या व्यक्तीवर व्यभिचाराचा अगर निषिद्ध संतती असल्याचा आरोप लावण्यात आला असेल आणि अटी व शर्तींच्या अभावामुळे गुन्हा सिद्ध होत नसेल तर 'क़ज़फ़' ची शिक्षा लागू करण्यात येणार नाही. उदाहरणार्थ, तो मानसिक सुदृढ़ असलेला, चारित्र्यशील, मुस्लिम व सबळ असेल तर आरोप लावणाऱ्यावर शिक्षा लागू होणार नसून दंडविधानात्मक कार्यवाही करण्यात येईल. त्याचप्रमाणे ज्या व्यक्तीवर खोटा आरोप लावण्यात येत आहे, ती व्यक्ती नेमकी कोणती, ही गोष्ट स्पष्ट होत नसेल. उदाहरणार्थ, एखाद्याने आरोप लावला की अमक्याचा भाऊ व्यभिचारी आहे, मात्र त्या अमक्यास बरेच भाऊ असतील तर नेमक्या कोणत्या व्यक्तीवर आरोप लावण्यात आला, हे स्पष्ट होत नसेल तर खोटा आरोप लावण्याचा गुन्हा सिद्ध होण्यासाठी आवश्यक

अटीचा अभाव आहे. म्हणून या अपराध्यास दंडविधानात्मक शिक्षा देण्यात येईल.

(संदर्भ : बदाया वननसाया)

## शिवीगाळ करण्यावर दंडविधानात्मक शिक्षा

शिवीगाळ केल्यामुळे माणसाचा अहं दुखावतो, आत्मप्रतिष्ठेस धक्का पोचतो, पानउतारा होतो. म्हणूनच कोणास जर शिवीगाळ केली अथवा तू यहूदी आहेस, ख्रिस्ती आहेस, 'ज्यू' ची अवलाद आहेस, काफिराची औलाद आहेस अथवा दांभिक, दारुड्या, चोर, हरामखोर आहेस तर या अपराधास्तव गुन्हेगारास दंडविधात्मक शिक्षा देण्यात येईल.

(संदर्भ : शरह-ए-फतहुल क़दीर)

## चोरी करण्याची दंडविधानात्मक शिक्षा

इस्लामी कायद्यात चोरी करण्याची शिक्षा हात कापण्याची तजवीज केली आहे. मात्र हा अपराध सिद्ध करण्यासाठी निम्नलिखित अटी व शर्ती लावण्यात आल्या आहेत.

(१) चोरी ही गुपितरित्या करण्यात आलेली असावी. पाकिटमारी, भुरटेचोरी यासारख्या छोट्या-मोठ्या चोऱ्यांवर हात कापण्याची शिक्षा होणार नाही.

(२) कुत्रा, मृत प्राणी, चिमणी, कावळा, क्रीडा-साहित्य, ढोलबाजा व संगीत-वाद्याचे साहित्य तसेच निषिद्ध वस्तु उदाहरणार्थ, दारू, डुक्कर व इतर बाबींची चोरी केल्यास हात कापण्याची शिक्षा होणार नाही. म्हणून या गुन्हेगारास दंडविधानात्मक शिक्षा देण्यात येईल. पुस्तके, ग्रंथ वगैरेसारख्या अभ्यासाच्या साहित्यांची चोरी केल्याससुद्धा हातकापण्याची शिक्षा न देता दंडविधानाची शिक्षा देण्यात येईल. फळे, भाजीपाला अगर खाण्याच्या वस्तु ज्या नासत असतात, त्यांची चोरी केल्यास शिक्षा न होता दंडविधानात्मक शिक्षा करण्यात येईल.

(३) चोराच्या मालाची चोरी केल्यास, युद्धलुटीचा आणि बैतुल माल (सरकारी जनकल्याण निधी) चा माल चोरी केल्यास शिक्षा न होता दंडविधानात्मक कार्यवाही करण्यात येईल.

(४) सुरक्षित नसलेल्या संपत्तीतून चोरी झाल्यास हात कापण्याची शिक्षा होणार नाही. यासाठीसुद्धा दंडविधानात्मक शिक्षा देण्यात येईल.

या अटीची पूर्तता न झाल्यास गुन्हेगारास हात कापण्याची शिक्षा देण्याऐवजी दंडविधानात्मक शिक्षा देण्यात येईल.

## इतर अपराधांवर दंडविधानात्मक शिक्षांचे स्वरुप

याशिवाय खोटी साक्ष देणे, खोट्या अफवा फैलावणे, कोणाच्या घरात विनापरवानगी दाखल होणे, इतरांच्या घरात विनापरवानगी डोकावून व चोरून पाहणे, इतरांचे गुपित पत्र वाचणे, लाच मागणे, लाच खाणे, कर्मचारी अथवा अधिकाऱ्याने आपल्या कर्तव्य बजावणीत हलगर्जीपणा करणे, कामात दिरंगाई करणे, अधिकाऱ्याने आपल्या अधिकारांचा गैरवापर करणे, प्रत्येक असे कृत्य ज्यामुळे सामाजिक हितास बाधा पोचत असेल, गुन्हेगार कैद्यास पळवून नेणे, नकली नोटा छापणे, सरकारी स्टँप पेपरचा शासनाच्या परवानगीशिवाय गैरवापर करणे, रमजान महिन्यात कोणतेही वैध कारण नसताना रोजा (इस्लामी पद्धतीचा उपवास) तर्क करणे, 'शरीअत'च्या नियमांची खिल्ली उडविणे, अनैतिक वर्तन करणे, बाजारभावापेक्षा जास्त भावाने वस्तु विकणे, जीवनावश्यक वस्तुंचा साठा करून कृत्रिम तुटवडा निर्माण करणे, निषिद्ध वस्तुंचा वापर करणे, मोजमापात गडबड करणे, भ्रष्टाचार माजविणे व यासारख्या अपराधांवर गरजेनुसार दंडविधानात्मक कार्यवाही करण्यात येईल.(संदर्भ : अस् सियासतुल शरीआ)

कधीकधी समाजाचे हित जोपासण्यासाठी अपराध करण्याचा ज्या व्यक्तीकडून संभव आहे, त्यांच्यावरसुद्धा दंडविधानात्मक कार्यवाही करण्यात येईल. ज्या लोकांविषयी समाजास विश्वास नसेल आणि काही जणांना काही लोकांविषयी असुरक्षिततेची भावना असेल, अशा साशंक व्यक्तिमत्वाच्या लोकांवर दंडविधानात्मक कार्यवाही करण्यात येईल. (संदर्भ : अल-मुग़्नी)

## दंडविधानात्मक कार्यवाहीत गुन्हेगाराचा मृत्यू

दंडविधानात्मक शिक्षा देत असताना उदाहरणार्थ, गुन्हेगारास कोरडे लगावताना, कैदेची शिक्षा भोगत असताना, शहरातून तडीपार झाल्यास जीवघेणा त्रास होत असताना गुन्हेगाराचा मृत्यू झाल्यास त्यावर शासनास अगर न्यायाधीशास जवाबदार ठरविण्यात येणार नाही. (संदर्भ : अलमुग्नी)

# चौथे परिशिष्ट

## इस्लामी शिक्षांवरील आक्षेपांचा आढावा

इस्लामी कायद्याने निश्चित केलेल्या शिक्षा या अत्यंत निष्ठूर, निर्दयी, क्रूर स्वरुपाच्या आहेत. त्यात दया-माया नावाची बाबच नाही. अशा ना-ना प्रकारचे आक्षेप घेऊन विरोधकांनी रान उठविले. मात्र विरोधकांच्या आक्षेपांमध्ये किती तथ्य आहे, याचा आपण अगदी निष्पक्षपणे आढावा घेणार आहोत.

वस्तुस्थिती अशी आहे की इस्लामी शिक्षा व्यवस्थेवर आक्षेप घेण्याची दोन करणे स्पष्ट आहेत. प्रथम असे की इस्लामी शिकवणींना समजण्याचा प्रयत्न न करणे आणि द्वितीय असे की 'नावडतीचे मीठ आळणी' या म्हणीप्रमाणे इस्लामची प्रत्येक गोष्ट दुष्ट बुद्धीने पेटून सहन न करणे. शिवाय बऱ्याचजणांचे अपराधी जगताशी साटे-लोटे असल्याने त्यांना मनापासून असे वाटते की पुळचट कायदाही केवळ दाखविण्यासाठी असावा आणि आपले काळे धंदेसुद्धा व्यवस्थितपणे चालू असावेत आणि आपण कायद्याच्याच चोरमार्गाने पळवाट काढण्यात यशस्वी व्हावे. या द्वितीय प्रकारची विचारसरणी असलेल्या महाभागांचे समाधान करणे म्हणजे पालथ्या घागरीवर पाणी टाकणे होय. मात्र पहिल्या प्रकारच्या लोकांना सबळ पुराव्यानिशी बुद्धीसंमत गोष्टीच्या आधारे समाधानित करणे शक्य आहे. मात्र समजून घेणाऱ्यांनीसुद्धा अगदी सद्सद्विवेक बुद्धीने आणि निष्पक्ष व निष्कपटणे आक्षेपांची उत्तरे समजून घेण्याचा प्रयत्न करावा. खालील मजकुरात आपण काही आक्षेपांचा बुध्दीसंमत आढावा घेऊ या.

१) पहिला आक्षेप असा घेण्यात येतो की इस्लामने लागू केलेली शिक्षा आणि दंडविधान हे अत्यंत निष्ठूर, क्रूर आणि निर्दयी स्वरुपाचे आहे. हे मानवी दयाभावाच्या विरुद्ध असून आजच्या सुसंस्कृत आणि आधुनिक काळाशी हा शिक्षाप्रकार समरुप असू शकत नाही. शिवाय या शिक्षा मानवाच्या नैसर्गिक सहनशक्तीपेक्षा कितीतरी पटीने जास्त आहेत.

याचे उत्तर असे आहे की ही गोष्ट खरोखरच बरोबर आहे की क्रौर्य आणि निष्ठूरता ही मानवधर्मास शोभत नाही. दया-भाव आणि कणव हा मानवाचा परमोच्च धर्म आहे. अन्यथा मानव आणि श्वापदामध्ये काहीच फरक राहणार नाही. मग इस्लाम हा तर दया, शांती आणि समाधानाचा धर्म आहे. मात्र एक गोष्ट विसरता कामा नये. समजा, तुमच्या एखाद्या अवयवास कर्क रोग झाला आणि तो इतर सर्व शरीरात फैलावण्याची शक्यता असेल तर वेळप्रसंगी कर्करोगाने ग्रस्त झालेला अवयव हा निश्चितच कापून इतर शरीर सुरक्षित ठेवण्याचा शहाणपणा करणे आवश्यक आहे. डॉक्टरास आपल्या हाती शस्त्रक्रिया करण्याची शस्त्रे घ्यावीच लागतील आणि कर्करोगाने ग्रस्त असलेल्या अवयवास निष्ठूरपणे व कोणतीही दया-माया न दाखविता कापून फेकावेच लागेल, यातच शरीराचे

हित आहे. नसता पुढे काय होईल,याची कल्पना न केलेलीच बरी. मग अत्यंत दयाळू असलेल्या या डॉक्टरला आपण क्रूर आणि निष्ठूर म्हणू शकतो काय? त्याने केलेली शस्त्रक्रिया निष्ठूरता आणि क्रौर्य आहे, असे म्हणता येईल काय? लहान मुलगा सुदृढ आणि निरोगी राहावा म्हणून त्याला पाजण्यात येणारे बाळकडू हे त्याच्यावर अत्याचार आहे काय? तर एकच उत्तर मिळेल की, नहाी. मुळीच नाही वर्तमानकाळात जी कारावासाची शिक्षा देण्यात येते, त्या स्वरुपाची शिक्षा इस्लामने दिली नाही. यासंबंधी सविस्तर वर्णन आपण मागे वाचलेलेच आहे. इस्लामी शासनातील कारावास हा अत्याधुनिक आणि सुधारलेल्या व पुढारलेल्या वर्तमान काळातील कैदेच्या शिक्षेपेक्षा कितीतरी जास्त पटीने मानवहित जोपासणारे आहे.

२) दुसऱ्या प्रकारचा जो आक्षेप येण्यात येत आहे तो असा आहे की, इस्लामने गुन्हेगारांसाठी ठोठावलेली शिक्षा ही बुद्धीसंमत नसून त्यात शारीरिक हानीबरोबरच माणसाच्या प्रतिष्ठेला जबर धक्का बसतो. यासाठी पर्यायी शिक्षासुद्धा देता येते. उदाहरणार्थ, व्यभिचार करण्याच्या अपराधास्तव 'रजम' अर्थात दगडाने ठेचून सर्वांसमक्ष वध करण्याची शिक्षा देण्याऐवजी विजेचा शॉक देऊन अथवा गोळी मारून व एकांतामध्ये ही शिक्षा दिली जावी, जेणेकरून अपराध्यास जास्त त्रास होणार नाही आणि त्याच्या प्रतिष्ठेला धक्का बसणार नाही. तसेच शिक्षा देण्यात प्रेरित असलेली निष्ठूरता आणि क्रौर्याचे दर्शन होणार नाही.

याचे उत्तर असे आहे की, कोण म्हणतो की गोळी मारून ठार केल्याने अथवा विजेचा शॉक देऊन मारल्याने मरणाऱ्यास त्रास होत नाही? त्रास तर होणारच. शिवाय ज्या लोकांना गुन्हेगाराच्या आत्म सन्मान आणि प्रतिष्ठेचा इतका पुळका आला तर त्यांना गुन्हेगाराने केलेल्या बलात्कारीत स्त्रीच्या सन्मान आणि प्रतिष्ठेचा काळजी करण्याचा माणुसकीपणा का आला नाही? गुन्हेगाराची दया करणाऱ्यांना पीडित स्त्रीच्या आरोळ्या का ऐकू येत नाहीत? तिच्या सन्मान, प्रतिष्ठा व शालीनतेची नग्न धिंड निघाली, तिच्या अब्रूची लक्तरे उडाली, तिच्याविषयी या आक्षेप घेणाऱ्याच्या अंतकरणात का पाझर फुटत नाही? याच गुन्हेगारांविषयी पुळचट सहानुभुतीच्या नेभळट विचारसरणीचा हा परिणाम आज समस्त यूरोपला आणि त्याचे अंधानुकरण करणाऱ्या आधुनिक पिढीला भोगावा लागत आहे, हे दिसत नाही काय? याच नेभळट विचारावर आधारित असलेल्या सध्याच्या कायद्यामुळे भारतात दर चोवीस तासांत बत्तीस स्त्रिया वासनांध गुन्हेगारांच्या लैंगिक शोषणास बळी पडतात, त्या बिचाऱ्या आयाबहिणींचे जगणे असह्य होऊन बसते, हे आक्षेप घेणाऱ्या महाभागांना दिसत नाही काय? शिवाय हे पातक घडू नये म्हणून इस्लामने पूर्वतयारी किती जबरदस्त केली आणि यदाकदाचित असे घडलेच तर हा

'रजम'चा प्रसंग माणसावर ओढावेल. त्याचप्रमाणे जर दोघां स्त्री-पुरुषांच्या राजी मर्जीमुळे व्यभिचार घडत असेल तर याचे समाज-जीवनावर किती भयानक परिणाम होतात, याची जाणीव नसावी का? तर इतरांच्या शालीनतेची लक्तरे उडविणाऱ्या आणि समाजाचे हित धोक्यात घालणाऱ्या गुन्हेगारास हीच शिक्षा योग्य आहे की, सर्वांसमक्ष त्याला जमिनीत अर्धवट गाडून समाजजणांनी दगडांचा वर्षाव करून त्यास नष्ट करावे, जेणेकरून यानंतर कोणत्याच माणसाच्या मनात हे पातक कर्म करण्याचे धाडस होऊ नये.

३) तिसरा आक्षेप असा घेण्यात येतो की हत्या करण्यासारख्या अपराधामध्ये 'क़िसास' (मृत्यूदंड) ची शिक्षा खूपच निष्ठूर आणि मानवी दया-भावास न शोभणारी आहे. यामुळे गुन्हेगाराच्या जगण्याचा अधिकार हिसकावून घेण्यात येतो.

याचे उत्तरही जवळपास मागील उत्तराप्रमाणेच आहे. या ठिकाणीसुद्धा केवळ गुन्हेगाराचाच पुळका आलेला दिसतो. मात्र गुन्हेगाराने ज्याची निर्घृणपणे हत्या केली, त्यास न्याय मिळू नये का? त्याचा जगण्याचा अधिकार हिसकाऊन घेण्यात आला नाही का? मस्तेवेळेस त्यानेसुद्धा दयेची भीक मागीतली असेल, पाय धरले असतील, डोके आपटून खुन्यासमोर प्राण न घेण्याची केविलवाणी याचना केली असेल. मग त्या वेळी गुन्हेगाराचे अंत:करण ज्या अर्थी पाझरले नाही, त्याच्यावर गुन्हेगाराने दया केली नाही आणि अत्यंत क्रूरपणे त्याचा जगण्याचा अधिकार मोठ्या निष्ठूर आणि क्रौर्याने हिसकावून घेतला. मग अशा निर्दयी आणि निष्ठूर गुन्हेगारास जगण्याचा काय अधिकार आहे. शिवाय गुन्हेगारांविषयी सहानुभूती असणाऱ्यांना म्हणा की त्या बिचाऱ्या मयताचे प्राण परत आणून द्या, अथवा गुन्हेगाराच्या ठिकाणी तुम्हीच मृत्यूदंडाची शिक्षा भोगा, म्हणजे कळेल की सहानुभूतीचे पोवाडे गाणाऱ्यांना खरी किती सहानुभूती आहे. याच नेभळह सहानुभूतीचा परिणाम आज आपण रक्तपाताच्या स्वरुपात पाहत आहोत. शिवाय इस्लामने गुन्हेगारास योग्य शिक्षा देऊन समस्त मानवजातीला रक्षा आणि भयमुक्त जीवन प्रदान करण्याचा विश्वविक्रम केला आहे. खरी गोष्ट अशी आहे की गुन्हेगारांविषयी सहानुभूती दाखविणाऱ्यांना स्वत:च्या प्राणांची किंमत दिसते, मात्र खून झालेल्यांच्या व समाजाच्या इतर जणांच्या प्राणांची व जीवनाधिकाराची किंमत दिसत नाही. मात्र इस्लामच्या दृष्टिकोनात समस्त मानवजातीच्या प्राण, प्रतिष्ठा, शील व संपत्तीचे खूप मोल आणि किंमत आहे. इस्लामने किसास (मृत्यूदंड, देहदंड, हाताचा बदला हात, प्राणाचा बदला प्राण, जखमेचा बदला जखम) ची शिक्षा लागू करण्यामागे हाच हेतु प्रेरित आहे.

दुसरी गोष्ट अशी आहे की गुन्हेगारास शिक्षा देणे हे केवळ समाजास वा मानवजातीस न्याय देण्याचाच हेतु नसून गुन्हेगारास पापमुक्त करणेसुद्धा आहे अर्थात गुन्हेगाराच्या हितात आहे.

**समाप्त**